SELECTIONS FROM THE SÁTÁRÁ RÁJÁS
AND
THE PESHWÁ'S DIARIES.

# II.

# BÁLÁJI BÁJIRÁV PEISHWÁ.

## *Volume II.*

PREPARED BY

**RÁV BÁHÁDUR GANESH CHIMNÁJI VÁD** B. A.
NATIVE ASSISTANT TO THE COMMISSIONER C. D.

EDITED UNDER THE ORDERS OF THE DECCAN VERNACULAR
TRANSLATION SOCIETY, POONA,
BY

**D. B. PÁRASNIS**

AND

*Published by the Society with the permission of the Government of Bombay.*
1906.
**BOMBAY.**

"INDU-PRAKÁSH PRESS."

PRICE 2¼ RUPEES.

# अनुक्रमणिका.

विषय. — पृष्ठ.

विषय. पृष्ठ.

८४३६

# बाळाजी बाजीराव पेशवे यांची रोजनिशी.

## भाग २ रा.

## न्याय खातें.

### (अ) दिवाणी.

[ १ ] प्रांत कल्याण भिवडी येथील ऐवजी राजश्री वासुदेव जोशी यांनीं सरकारचे रुपये २०० दोनशें येवजी लोहट यास कर्ज देऊन खत लिहून घेतलें आहे. त्याचा तगादा तुह्मी हल्लीं मशारनिल्हेस करून याचा पुत्र आनंदराव लोहट यास किल्ले कोथळा येथें अटकेंत ठेविलें, त्यावरून येवजी लोहट हुजूर येऊन कित्येक प्रकारें विनंति केली. ती मनास आणून येवजी लोहट याजवर नजर देऊन व्याज माफ करून मुद्दल रुपये दोनशें घ्यावयाचा करार करून हुजूर निशा करून घेतली आहे. तरी सदरहू दोनशें रुपयांचा कतबा मशारनिल्हेचा घेतला आहे तो माघारा देणें. व्याजाचा तगादा एकंदर न करणें. आनंदराव लोहट मशारनिल्हेचा पुत्र किल्ले कोथळा येथें अटकेंत ठेविला आहे, तो पत्र पावतांच सोडून देणें; एक घडी विलंब न लावणें, ह्मणोन चिरंजीव राजश्री सदाशिव चिमणाजी यास पत्र सादर.

इ. स. १७४२--४३
सल्लास अर्बैन
मया व अलफ.
मोहरम ३.

[ २ ] जेऊजी शिंदा व वाल्होजी सुतार मौजे कानोर तर्फ नाणे मावळ याचे नांवें पत्र कीं तुवां हुजूर येऊन विदित केलें कीं मौजे करंजगांव येथील सुतारकीचा कजिया आपाल्याशीं व तुकोजी सुतार याजशी लागला होता; त्यास आह्मां हरदु वादी यांचा निवाडा गोतानीं व देशमुख व देशपांडे यांनीं करून आपल्यास खरें केलें; तुकोजी सुतार खोटा केला; तर आपल्यास पत्र द्यावें ह्मणून विदित केलें. त्याजवरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तुह्मां हरदु जणांचा निवाडा देशमुख व देशपांडे व गोत तर्फ मजकूर यांनीं करून तुह्मांस निवाडपत्र दिल्हें असेल, त्याप्रमाणें सुदामत तुझें सुतारकीचें वतन असेल त्या बमोजीब अनुभवणें ह्मणून पत्र १.

इ. स. १७४३–४४
अर्बा अर्बैन
मया व अलफ.
सफर २५

---

## Administration of Justice. ( A ) Civil.

( 1 ) Wasudeo Joshi lent out at interest to Yewaji Lohat a portion of the Government balance in Prant Bhiwandi. It was not repaid. Yewaji's son was therefore kept under imprisonment by Sadâshiw Chimnaji. Yewaji came to Poona, and represented his poverty to Government. The interest due from him was remitted and surety was taken for the payment of the principal, and his son was then ordered to be released.

A. D. 1742-43.

( 2 ) A dispute regarding the office of Carpenter between Wálhoji of Karanjgaum in Tarf Nane Máwal, and another person, was decided by the castemen and the Deshmukh and Deshpánde, in favour of Walhoji. At the request of Wálhoji order was issued by the Peshwa for giving effect to the said decision.

A. D. 1743-44.

[ ३ ] गोविंद व गोपाळ पराडकर व जनार्दन कपाट्या व गोपाळ पराडकर महानुभाव यांचा मौजे कनासी परगणे भडगांव येथील देवाचे तीर्थपूजेचा कजिया होता तो निवडून समजावीस केली. सबब सदरहू जणांकडे नजर करार केली रुपये १००. हवाला जिवाजी गणेश छ. ११ रजब. सदरहु ऐवज खाजगी निसबत शिवराम कृष्ण याजकडे देविले असेत.

इ. स. १७४३–४४
आर्बा अर्बन
मया व अलफ.
रबिलावल ५.

[ ४ ] राघो नारायण व खंडो नारायण देशपांडे परगणे साकसे प्रांत कल्याण यांचा व गणेश दत्ताजी यांचा देशपांडेपणाचा कजिया बहुत वर्षें होता. यास्तव राघो नारायण याशीं दिव्य करावयाची आज्ञा केली. याणीं मान्य करून कसबे कोपरगांव परगणे कुंभारी येथें गंगातीरीं दिव्य केलें. खरा जाहला. गणेश दत्ताजी खोटा जाहला. त्याजवरून राघो नारायण व खंडो नारायण यांचे दुमाला देशपांडेपणाचें वतन करून पत्रें सादर केलीं आहेत. तर तुह्मीं यांचे हातून देशपांडेपणाचें काज काम घेऊन हक रुसुम सुदामत असेल त्याप्रमाणें चालवणें. देशपांडेपणास सरकारचा गुमास्ता ठेविला आहे तो दूर करून देशपांडेपणाचें दफ्तर यांचे हवालीं करणें ह्मणोन त्रिंबक विनायक यास पत्र १.

इ. स. १७४४–४५
खमस अर्बन
मया व अलफ.
जिल्हेज २८.

[ ५ ] भुलोजी ढमढेरे यास पत्र कीं, गोंधळे माहुरकर व भुत्ये तुळजापुरकर यांचा परस्परें कजिया आहे तो विल्हेस लावण्यास मौजे कनेरसर तर्फ खेड प्रांत जुन्नर येथें थल नेमून दिल्हें आहे, त्यास मनसुबीमुळें गोंधळे व भुते यांजपासून उत्पन्न होईल, त्यापैकीं निमें श्री माहूरच्या भवानीस व गोत खर्चास द्यावें व निमें सरकारांत घ्यावें याप्रमाणें करार करून दिल्हा असे. तरी हरदु जणांची मनसुबी मनास आणून बरहक इनसाफ करून उत्पन्न होईल, त्यापैकीं निमें माहूरच्या देवीस व गोतखर्चास देणें, बाकी निमें राहिलें तें सरकारांत जमा करणें ह्मणोन पत्र.

इ. स. १७४५–४६
शित अर्बन
मया व अलफ.
सवाल २१.

---

(3) A dispute between the family of Kapatya and that of Paràdkar, regarding the worship of the idol at Kanashi in Pargana Bhadgaum, was settled, and a nazar of Rs. 100 was received from both the parties.

A. D. 1743-44.

(4) There was a dispute regarding the Deshpànde watan between Ragho Narayan Deshpande of Pargana Sakse in Prant Kalyan and others. Ragho was directed to prove his right by passing through an ordeal. This he did at Kopergaum on the banks of the Godavari. The watan was thereupon continued to him.

A. D. 1744-45.

(5) The settlement of a dispute between the Gondhales of Mahur, and the Bhutyas of Tuljapur, was ordered to be effected at a village in Tarf Khed in Prant Junnar and Bhuloji Dhamdhere was directed to dispose of the amount that might be recovered from the parties in consequence of the adjudication, as follows:–half to the Goddess of Mahur, and to the caste people for their expenses and half to Government.

A. D. 1745-46.

[ ६ ] रामाजी बाबाजी हवालदार तर्फ पाली याशीं पत्र कीं, तर्फ मजकूर येथील शूद्र ग्रहीचें ज्योतीषपण व उपाध्यपण व धर्माधिकारीपण या तिन्ही वृत्तींचा कजिया हुजूर आला आहे. ऐशास मनसुफी मनास आणितां जमीदाराचा दाखला असला पाहिजे. त्यास जमीदार हुजूर आणावे तों स्वारीची गडबड आहे, याजकरितां जमीदार आणावयाचा मजकूर ठेऊन तर्फ मजकूरचें शुद्रग्रहीचें ज्योतीषपण व उपाध्येपण व धर्माधिकारीपण अमानत करून सरकारांत ठेविलें आहे. तरी तुह्मी तर्फ मजकूरचे सदरहु तिन्ही वृत्तींवर परकी ब्राह्मण ठेवून वृत्ती चालवणें. वृत्तीसंबंधें उत्पन्न होईल तें सरकारांत जमा करणें. पेस्तर जमीदार हुजूर आणून मनसुबीमुळें वृत्ती ज्याची होईल, त्याच्या स्वाधीन केलें जाईल ह्मणून पत्र.

इ. स. १७४६–४७
सबा अर्बैन
मया व अलफ.
रबीलावल १८.

[ ७ ] रामाजी महादेव नामजाद प्रांत साष्टी यासी पत्र कीं फकीरा चांभार वस्ती मौजे वावले तर्फ ठाणें याणें हुजूर येऊन विदित केलें कीं, आपला सासरा पद्या चाम्हार वस्ती विरार प्रांत सायेवान येथें होता तो निपुत्रिक होता; भाऊबंद होते; त्यास मरतेसमयीं कांहीं वस्तभाव होती त्यापैकीं कांहीं आपले स्त्रीस दिली, व कांहीं आपले भावास दिली. त्यास आज बहुत वर्षें झालीं. सांप्रत माझा भाऊ गणा चांभार याणें अदावतीनें सुभा जाऊन चुगली केली. त्याजवरू सुभाहून माणसें पाठवून आपलें घर खणोन नेलें. असें वर्तमान फकीरा मजकूर याणें विदित केलें. त्याजवरून बहुत वर्षांचा फिरंगीयाचे अमलांतील कजिया आणि पद्या जिवंत असतां आपले लेकीस कांहीं दिल्हें, कांहीं आपले भावबंदास दिल्हें, त्याजवरून चांभार मजकुरावर नजर देऊन निमे ऐवज सरकारांत घेऊन निमे ऐवज चांभारास द्यावा असा करार झाला असे. तर निमे सरकारांत जमा करणें व निमे चांभार मजकुराचे हवाला करणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७४७–४८
सबान अर्बैन
मया व अलफ.
मोहरम १२

---

( 6 ) A complaint regarding the watan of village-astrologer and village-priest, was received at the Huzur. The evidence of the district officers was necessary for the determination of the matter in dispute. As the Peshwa was about to proceed on a campaign, it was not possible to secure their attendance in Poona before his departure. The watans were therefore temporarily kept under attachment.

A. D. 1746-47.

( 7 ) Padya, shoe-maker of Wirar in Pargana Sayewan died without a son, and at the time of his death gave a portion of his property to his daughter, wife of Fakira of Wavle in Tarf Thanna and the rest to his brother *viz*, Ganu Chambhar. The latter however complained to the Subha, who sent men to Fakira's house and took away his property Ramaji Mahadev, officer of Prant Salsette was informed that having regard to the fact that the dispute had originated in the time of the Portuguese, and that more over Padya had during his life time distributed his property between his daughter and his relations, Government were pleased to direct that half the property should be restored to Fakira, the remaining half being taken for Government.

A. D. 1747-48.

[ ८ ] शंकराजी केशव नामजाद प्रांत वसई यांशीं पत्र कीं पाताणे परभू वसई प्रांतीं आहेत. त्यांचे घरचें उपाध्यपण पळशे आपलें ह्मणतात. पाताणे परभु ह्मणतात कीं आपले वडिलांनीं पळशे नेलें नाहींत. उपाध्यपण ब्राह्मण चालवितात. हल्लीं दोन वर्षें ब्राह्मणांस पाताणे यांचे घरीं पळशे जाऊं देत नाहींत. याकरितां त्यांचा व यांचा कजिया लागला आहे ह्मणोन वर्तमान विदित झालें. त्यावरून पाताणे परभु यांचें घरचें उपाध्यपण सरकारांत अमानत केलें असे. तर अमानत ठेऊन ब्राह्मणांकडून उपाध्येपण चालवीत जाणें आणि उत्पन्न होईल तें सरकारांत जमा करणें. पेस्तर इनसाफ होऊन ज्यांचे करार होईल त्यांस देविलें जाईल. सदरहू उपाध्येपणाचें उत्पन्न होईल त्यापैकीं निमें गुमास्ते यास देऊन निमें सरकारांत जमा करणें ह्मणून पत्र.

इ. स. १७४७-४८
सबान अर्बैन
मया व अलफ.
सफर १२

[ ९ ] मौजे साई तर्फ हवेली प्रांत पुणें येथील पाटिलकी पुरातन तुमची. कासार नाहक कजिया करीत होता तो खोटा झाला. मोकदमी दरोबस्त तुमची खरी झाली. तुह्मास दुमाले पत्रें करून दिल्हीं आहेत. त्याजबद्दल वतन संबंध्यें तुह्माकडे हरकी रुपये करार केले रुपये १००० एक हजार सनसितामध्यें करार केले. त्याचा वसूल सरकारांत जमा आले.

इ. स. १७४८-४९
तिस्सा अर्बैन
मया व अलफ.
जिलकाद ८

९०० सन सित छ. ८ रविलाखर. जमा पोता गुजारत कल्याण निळकंठ आनहत देशमुख प्रांत मजकूर.

९०० सन समान छ. १६ जमादिलाखर. देणे दुर्जनसिंग राजे मांडवीकर शिलेदार रोजमरा.

१०००

एक हजार रुपये जमा झाले. सदरहू हरकी पैकीं तुह्माकडे बाकी राहिली नाहीं ह्मणोन शिदोजी नरसिंहराव शितोळे देशमुख प्रांत मजकूर याशीं.

---

(8) The Palses claimed the right of officiating as priests at the houses of Patane Parbhus of Bassein. The Patanes denied the claim, and alleged that Brahmins acted as priests at their houses. The priestly watan was therefore attached, and pending final decision, a Brahmin was appointed to carry on the duties of the watan. It was ordered that half the profits of the watan should be paid to him as remuneration, and that the remaining half should be credited to Government.

A. D. 1747-48.

(9) The Patil Watan of Mouze Sai in Pargana Haveli of Prant Poona, was proved to belong to Narsingrao Sitole, Deshmukh. A nazar of Rs. 1000 was imposed on him.

A. D. 1748-49

[ १० ] दस पाटील बिन येस पाटील सातकर मोकदम कसबे खेड तर्फ मजकूर प्रांत जुन्नर याणें कतबा लिहून दिल्हा कीं, कसबे मंजकूरची निमे मोकदमी आपली आहे. वडील घर आपलें असतां धाकटा चुलत भाऊ सुलतानजी पाटील सातकर वगवाशिलीयाचे बलात्कारें मोकदमी करितो. याजकरितां पांढरीचे साक्षीनिशीं गोत न्यायें आपला वाजवी इनसाफ करावा. त्याजवरून साहेबीं आज्ञा केली कीं, वाजवी इनसाफ करून याजकरितां नजर कबूल केली. सन हजार ११९८ नक्त रुपये १००१ एक हजार एक रुपाया. याशी वायदेबंदी मार्गेश्वर अखेर ५०० रुपये. पौष अखेर ५०१. एकूण एक हजार एक रुपाया सदरहू मुदतीप्रमाणें वसूल देऊं. न देऊं तर दिवाणचे गुन्हेगार असा कतबा लिहून दिला असे. १

इ. स. १७४८–४९
**तिस्सा अर्बैन मया व अलफ.**
जिलकाद २२

[ ११ ] नानाजी गोविंद व भानाजी गोविंद कुलकर्णी मौजे आणे तर्फ बेल्हें व मौजे राहुरी तर्फ आलें यांणीं कतबा लिहून दिल्हा ऐसाजे कीं, आबाजी गोविंद कुळकर्णी मौजे फाकटे तर्फ पाबल प्रांत जुन्नर याचा बाप गोविंद विठ्ठल मौजे लोणी तर्फ पाबल येथें खंडो शिवदेव कुळकर्णी याचे वाड्यांत सुखवस्तु राहत होता. त्यानें आपली ठेवी घरांत मोहरा ७९१ सातशें एक्याणव व रुपये ३६०० छत्तीसशें ठेविल होते. त्यास गोविंद विठ्ठल साल गुदस्त आपले लेकीचें लग्न करावयास आपले वतनी गांवास गेला, तेथें लग्न केलें आणि महिना पंधरा रोजानें मृत्यु पावला. त्या दिवसांत खंडो शिवदेव याणीं मशारनिल्हेच ठेवीपैकीं मोहरा १७९ पावणे दोनशे व रुपये २०० दोनशे येणें प्रमाणें अभिलाष करून नाकबूल गेला. त्याजवरून आबाजी गोविंद याची आई हुजूर फिर्याद आली. त्यावरून खंडो शिवदेव यास हुजूर

इ. स. १७४८–४९
**तिस्सा अर्बैन मया व अलफ.**
जिल्हेज १७

---

( 10 ) A Patil of the Satkar family of Kasba Khed in Prant Junner complained that his cousin of the younger branch was forcibly enjoying the office of Mokadum, through his influence with Government officers, and prayed that justice might be done to him after taking the evidence of the villagers and of his kinsmen. The Peshwa consented to do so, and a bond promising to pay a nazar of Rs. 1001 was taken from the Patil in question.

A. D. 1748-49.

( 11 ) Govind Vithal, Kulkarni of Fakte in Tarf Pabal, was residing at Loni in Tarf Pabal, in Khando Sivdeo Kulkarni's house. He went for the marriage of his daughter to his own village, leaving at his residence at Loni, Mohars 791 and Rs. 3,600, and died there shortly afterwards. During his absence, Khando Sivdeo appropriated a part of the property. Govind Vithal's mother complained to the Peshwa. An inquiry was made, and Khando was made to return the amount appropriated by him. One-fourth of the amount appropriated, was credited to Government as usual, and as regards the rest, it was ordered that Govind Vithal's son Abaji being a minor it shoud be deposited with Nanaji Govind and Bhanaji Govind, Kulkarnis of Ane and Rahuri. These two persons were instructed to pay Rs. 350 annually to Abaji, and on his

A. D. 1748-49.

आणून इनसाफ करून सदरहु मोहरा व रुपये त्याजकडून आणविले. त्यांपैकीं सरकारांत चौथाई मोहरा ४४ चवेताळीस व रुपये ५० पन्नास घेऊन बाकी बीतपशीलः—

मोहरा.
६१६ ऐन ठेवीपैकीं
१३१ अभिलाष १७५
पैकीं वजा सरकारची
चौथाई मोहरा ४४ चवेताळीस बाकी.
७४७

रुपये.
३४०० ऐन ठेवीपैकीं
१५० अभिलाष २०० पैकीं चौथाई
सरकारांत ५०
३५५०

एकूण मोहरा ७४७ सातशे सत्तेचाळीस व रुपये ३५५० साडे पसतीसशे पैकीं आबाजी गोविंद याचे बहिणीचे लग्नास वगैरे खर्च व सालमजकूरचे खर्चास अजमासे रुपये

६२९ लग्नास लागले मागील देणें.
३५० सालमजकूरचे खर्चास
१०० पोटास पुण्यांत
१०७९

एकूण एक हजार एकूणऐशी रुपये त्यास दिल्हे. बाकी

मोहरा नाणे ७४७ नगद रुपये २४७१

एकूण मोहरा सातशे सत्तेचाळीस व रुपये दोन हजार चारशे एकाहत्तर **राहिले.** त्यास आबाजी गोविंद लहान मूल आहे व थोर होई तोंपावेतों मोहरा व रुपये आह्मांजवळ स्वामींनीं ठेवावयास दिल्हे ते आह्मीं आपणाजवळ ठेविले. ज्या समयीं आबाजी गोविंद थोर होईल तेव्हां सदरहु मोहरा व रुपये द्यावयाची आज्ञा होईल, तेव्हां मोहरा व रुपये सरकारची परवानगी घेऊन त्यास देऊं. पेस्तर सालापासून आबाजी गोविंद यास दरसाल खर्चास रुपये ३५० साडे तीनशे प्रमाणें देत जाऊं. बाकी ऐवज राहील तो सरकारचे विद्यमानें आज्ञा होईल, तेव्हां आबाजी गोविंद यास देऊं. यास अंतर झालें तरी आपले हरदु गांवचे कुळकरण सरकारांत द्यावें व आबाजी गोविंद याचा पैकाही देऊं ह्मणोन सरकारांत कतबा घेतला असे. १

सदरहु ऐवजाचे ठेवीचें पत्र आबाजी गोविंद याचे नांवाचें घेऊन आबाजी गोविंद याचे हवाला केलें असें १

नानाजी गोविंद व भानाजी गोविंद कुळकर्णी मौजे आणे तर्फ बेल्हे व मौजे राहुरी तर्फ आलें प्रांत जुन्नर यांस सरकारचें आज्ञापत्र दिल्हें कीं आबाजी गोविंद कुळकर्णी मौजे फाकटें तर्फ पाबल प्रांत जुन्नर हा लहान आहे. याची ठेवी तुह्माजवळ मोहरा ७४७ सातशे सत्तेताळीस व रुपये २४७१ चोवीसशे एकाहत्तर. पैकीं दरसाल पेस्तर सालापासून रुपये ३५० साडेतीनशे देत जाणें. बाकी ऐवज राहील तो सरकारची आज्ञा होईल तेव्हां देणें ह्मणोन पत्र १

attaining majority, to return the whole of the deposit to him with the permission of Government. A bond embodying the above terms was taken from the two persons.

[ १२ ] राणोजी वल्लद साळोजी माळी दरवडा मौजे दहीटणे परगणे रांजणगांव सरकार जुन्नर याशीं अभयपत्र दिल्हें एसाजे, फिरगोजी बिन त्रिंबकजी परीट मौज मजकूर याणें हुजूर येऊन विदित केलें कीं, मौजे मजकुरीं आपली मिरास जिरायत बागायत जमीन कास रुके ८६ सहा एकूण बिघ ६०० पैकीं जिरायत बिघे पंचताळीस व बागाईत बिघ पंधरा आहेत. त्यास राणोजी माळी दरवडा आपली मिरास रुके साहा बळेंच वाहोन खातो. तरी त्यास आणून मनसुबी करून आपली जमीन आपल्यास दिली पाहिजे ह्मणून विदित केलें. त्यास मनास आणितां फिरगोजी बिन त्रिंबकजी परीट खोटा झाला आणि राणोजी मजकूर खरा झाला. याजकडे करार रुपये २९

इ. स. १७४८–४९
तिस्सा अर्बैन
मया व अलफ.
जिल्हेज २८

सदरहुची उगवणी नवलोजी वागमारा खिजमतगार याणें सहा महिन्यांनीं द्यावे याप्रमाणें करार. रसानगी बाळाजी महादेव मांडोगणे. सदरहू अभयपत्राची नकल करून ठेविली असे.

[ १३ ] हरशेट व सोमशेट वीरकर यांस पत्रकीं तुमचे लष्करचे बाजारचें शेटपण तुह्मां उभयतांचे कजियामुळें अमानत केलें होतें. त्यास तुह्मीं उभयतां समजलेत हें जाणून सालमजकुरापासून तुमचें लष्करचें बाजारचें शेटेपण मोकळें केलं असे. तरी तुह्मीं शेटेपणाची सेवा चाकरी करून पेशजी हक्क दस्तूर घेत होते त्याप्रमाणें घेत जाणें. तुमचे माथा शेरणी करार केले रुपये ८५०८ याशी मुदत फाल्गून अखेर देणें ते.

इ. स. १७४८–४९
तिस्सा अर्बैन
मया व अलफ.
मोहरम १२

या शिवाय राजश्री माहादाजी अंबाजी याचा जिन्नस

| हल्लीं सालमजकुरीं जिन्नस द्यावा. वजन पक्कें. | पेस्तरसाल सन खमसेनापासून दरसाल जिन्नस द्यावा. वजन पक्कें. |
|---|---|
| ८८२॥ लवंग | ८८१। पत्री |
| ८८२॥ जायफळ | ८८१। लवंग |
| ८८२॥ पत्री | ८८१। जायफळ |
| ८८२॥ बेलदोडे | ८८१। बेलदोडे |
| ८१. | ८८५ |

(12) Firangoji washerman, complained that Ranoji Mali was in wrongful possession of his land at Dahitane in Pargana Ranjangaum of Sirkar Junner. Inquiry was made, and the complaint proved to be false. A letter of assurance was granted to Ranoji and Rs. 25 were levied from him.

A. D. 1748-49.

(13) The Shetye's watan of the Cantonment was attached in consequence of a dispute regarding it between Harshet and Somshet Virkar. The parties afterwards came to an amicable settlement and the watan was restored. A present of Rs. 8,508 was levied from

A. D. 1748-49.

येणेंप्रमाणें दहा शेर वजन पैकीं सालमजकुरीं द्यावें व पेस्तर साल सन खमसेनापासूना दरसाल पांच शेराप्रमाणें द्यावें, येणेंप्रमाणें करार.

इ. स. १७४८–४९
**तिस्सा अर्बैन मया व अलफ.**
रबिलावल ४

[ १४ ] समस्त भाऊ कामथे निमे मोकदम मौजे चांबली तर्फ कऱ्हे पठार प्रांत पुणें यांचा व आयाजी बिन शिवजी सेडगर यांचा कजीया निमे मोकदमीचा मौजे मजकूरचा होता. कामथे दरोबस्त पाटिलकी आपली ह्मणोन ह्मणत होते. सेडगर आपली निमे ह्मणून भांडत होते. याजकरितां हरदो जणांचा इनसाफ हुजूर करून सिद्धांत झाला कीं, सेडगरांनीं दिव्य करावें. खरें निघालें तर निमे मोकदमी करावी. त्याच्या दिव्यास अयाजी राजी जाहला. त्याजवरून अयाजी सेडगर यानें मौजे पाषाण तर्फ हवेली कर्यात मावळ येथें श्रीसान्निध अग्नि दिव्य केलें. दिव्यास खरा निघाला ह्मणोन निम मोकदमी बरोबरी त्यांच्या दुमाला केली. आपण दरोबस्त आपली ह्मणत होते ते गोष्टीस बातल झालों. निमे मोकदमी बरोबरी आमचे दुमाला केली. आजी सबब आपले माथा देशमुख व देशपांड्ये यांच्या विद्यमानें स्वराज्य मोंगलाई व सरदेशमुखी सावोत्रा कुलबाब रुपये २५०० अडीच हजार करार केले ते आपण कबूल असलों उगवणी करून वायदे बीतपशील रुपये.

५०० तूर्त ज्येष्ठ शुद्ध ९ रुपये.
१००० सन ११५९ माघमाशीं एक हजार द्यावे.
१००० सन ११६० श्रावण अखेर पावेतों द्यावे रुपये.
२५००

येणेप्रमाणें झाडा करून देऊन ऐसा कतबा लिहून घेतला असे. कतबा १

इ. स. १७४८–४९
**तिस्सा अर्बैन मया व अलफ.**
रबीलावल ४

[ १५ ] कसबे पाबल प्रांत जुन्नर येथील पाटिलकीचा व कुळकर्णीपणाचा कजिया आहे. सबब अमानत वतनें सरकारांत करावयाची आज्ञा केली होती; परंतु इनसाफ होईपर्यंत अमानत न करावे सबब नजर करार केली. बरहुकूम कतबेः—

---

them, and they were further required to give annually 5 Seers of cardamom, cloves and other groceries to Mahadaji Ambaji.

A. D. 1748-49.

( 14 ) In a dispute regarding the Patilki watan of Chambhali in Tarf Kare Pathar, which was inquired into at the Huzur it was ordered that one of the parties surnamed Shedgar should undergo a religious ordeal. He underwent the fire ordeal, and the dispute was decided in his favour.

A. D. 1748-49.

( 15 ) The Patel and Kulkarni watan of Kasba Pabal were in consequence of a dispute, between the watandars, attached. The watandars prayed that the attachment might be raised, and the watans continued in their possession, pending decision of the dispute.

| | |
|---|---|
| ह्मालजी पाटील बिन शिव राम जाधव पाटील निमे मोकदम याजकडे करार केले रुपये १२०१ याशी मुदती रुपये | बापुजी नागनाथ व गोविंद बाबाजी कुलकर्णी याजकडे रुपये ८०० याशी मुदती रुपये |
| ६०१ चैत्र शुद्ध १ | ४०० चैत्र शुद्ध १ |
| ६०० जेष्ठ शुद्ध १ | ४०० जेष्ठ शुद्ध १ |
| १२०१ | ८०० |

एकूण दोन हजार एक रुपाया करार केला असे.

इ. स. १७४९–५० खमसेन मया व अलफ. जिल्हेज २७

[ १६ ] कमाविस बाबत जाखोजी व यमाजी बिन संताजी न्हावी अवटी मेहेत्रे मौजे चिंचोडी तर्फ शिराळ परगणे नेवासे यांणीं हुजूर विदित केलें कीं, मौजे मजकूरचें न्हावीपणाचें वतन मेहेत्रेपण आपलें आहे. त्यास आपला आजा दुकाळामुळें परगंदा झाला; गांवचें काम चालवावयास पाटलानें सखोजी बिन बहिरजी व रघोजी बिन सखोजी यांचा आजा गोंद महाला ठेविला तो चालवीत होता; हल्लीं सखोजी व रघोजी गांवचें काम चालवितात; आपणास लागो देत नाहीं; तरी त्यांस आणून इनसाफ करावा. ह्मणून त्यावरून हरदुजणांस हुजूर आणून वर्तमान मनास आणितां या हरदुजणांनीं विदित केलें कीं, मौजे मजकूरचें न्हावीपणाचें मेहेत्रेपण जाखोजी व यमाजी यांचें खरें; आपले आजास गांवचें कामकाज चालवावयास ठेविलें होतें; त्यापासून आपण चालवितों. परंतु आपलें वतन नव्हे ह्मणून विदित केलें; आणि मौजेमजकूरचें जातपणाचें कजियाबद्दल मौजेमजकूरचे पाटील कुळकर्णी बलुते हुजूर आले होते. त्यांचे साक्षीनें येजितखत लिहून दिल्हें; त्यावरून मनास आणून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी मौजे मजकूरचे न्हावीपणाचें मेहेत्रेपत्र तुह्मी आपले पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें अनुभवून सुखरुप राहणें. तुमचे मिराशीचा वाडा घर असेल त्यांत सुखरूप नांदणें. वतन संबंधें तुमचे माथा शेरणी कुलबाब कुलकानू करार रुपये ५१ एकावन करार केले आहेत. सरकारांत वसूल देऊन सुखरूप राहणें. अभय असें. ह्मणून वतनपत्र करून न्हावी मजकूर यास दिलें असे १

---

The prayer was granted, and a nazar of Rs. 1,201 from the Patil, and Rs. 800 from the Kulkarni, was levied.

A. D. 1749-50.

( 16 ) Jakhoji and Yamaji bin Santaji Barber represented that the barber's watan at Chinchodi in Tarf Sirale in Pargana Newase, belonged to him, that his grand-father left the village during the famine, that the Patil thereupon employed other persons for the performance of the village service, and that the said persons refused to hand over the watan to him. These persons on being called to the Huzur admitted the correctness of the above facts, and gave in a writing to that effect, duly attested by the Patil, Kulkarnis and Balutas. The Watan was there upon given to Jakhoji and others. A nazar of Rs. 51 was levied.

[ १७ ] नरसावा बिडवाई ममदापुरकर याचें कर्ज जमीदार परगणे संगमनेर याजकडे होतें, त्याचा करार पंचाइत न्यायें रुपये २००० दोन हजार द्यावयाचा करार केला. यासी हप्ते रुपये:—

इ. स. १७४९–५०
खमसेन
मया व अलफ,
मोहरम १९

१००० सालमजकुरीं माघमासीं द्यावे.
१००० पेस्तर सालीं सन इहिदेंत माघमासीं द्यावे.

———
२०००

येणप्रमाणें दोन हजार रुपयांचे हप्ते करार केले आहेत. सदरहू प्रमाणें वसूल घेऊन हुजूर पाठवून देणें. जमीदाराचें खत बिडवाई मजकुराजवळ होतें तें तुम्हाकडे पाठविलें आहे. तरी ऐवजाची निशा करून घेऊन मग खत जमीदाराचे हवालीं करणें. सदरहू ऐवजाची जमीदार आपले भाऊपणीयांत वाटणी करून देतील त्याप्रमाणें निशा करून घेणें ह्मणोन रावो गोविंद यास सनद १.

[ १८ ] राघो गोविंद यास पत्र कीं पुरुषोत्तम माणकेश्वर कुळकर्णी मौजे करजगांव परगणे नेवासे याचें कर्ज हरजी कंक चौगुला मौजे मजकूर याजकडे वगैरे गांवगन्ना कुळांकडे आहे व माधवराव देशपांडे परगणे संगमनेर यांजकडे कर्ज आहे तें देत नाहींत, तरी त्यांस ताकीद करून वाजवी खताप्रमाणें कर्ज वसूल करून देववावें ह्मणून विदित केलें. त्यावरून हें पत्र तुह्मास सादर केलें असे. तरी कुळकर्णी मजकूर याचें कर्ज वाजवी खताप्रमाणें वसूल होऊन कुळकर्णी यास पावतें करणें, आणि सदरहू ऐवज वसूल होईल त्यापैकीं सरकारची चौथाई कुळकर्णी मजकूर याजपासोन घेऊन हुजूर पाठवून देणें ह्मणोन पत्र.

इ. स. १७५०–५१
इहिदे खमसेन
मया व. अलफ.
रजब १

---

A. D. 1749-50.

(17) The amount of a debt, due by the Jamindars of Sangamner to Narsawa Bidwai, was fixed with the assistance of a Panch.

A. D. 1750-51.

(18) A letter addressed to Ragho Govind, to the following effect:—Purshotam Mankeshwar, Kulkarni of Mouza Karajgaon, Pargana Nevase, represented that Harji Kank, Choughula of the said village, some ryots of other villages, and Madhavrao Deshpande of Pargana Sangamner did not liquidate the amount due by them to the said Kulkarni, and prayed that they be warned to pay off the debt in accordance with the terms of their bonds. It is therefore ordered that the said debts be collected in accordance with the terms of the bonds, and made over to the said Kulkarni after deducting one-fourth of the sum collected, which should be remitted to the Huzur.

[ १९ ] नरहरी नारायण कमाविसदार तर्फ देवपुर बेलापूर, दिमत दीक्षित यांस पत्र कीं पुरुषोत्तम माणकेश्वर कुळकर्णी मौजे भरडापूर याचें कर्ज माधवराव देशपांडे परगणे संगमनेर यांजकडे रुपये १०० एकशे व तर्फ मजकुरीं गांवगन्ना कुळांकडे कर्ज येणें आहे, त्याचें खत पत्र असतां देत नाहींत; तरी कुळकर्णी मजकूर याचें कर्ज ज्यांज्यांकडे आहे, त्यांस ताकीद करून खतांप्रमाणें व्याजासुद्धां पैका वसूल होईल त्यापैकीं सरकारची चौथाई कुळकर्णी मजकुरापासून घेऊन हुजूर पाठवणें. बाकी ऐवज कुळकर्णी मजकुरास देणें ह्मणोन पत्र सादर १

इ. स. १७५०-५१
इहिदे खमसेन
मया व अलफ
रजब १

[ २० ] जगथाप निमे मोकदम व समस्त दाहीजण मौजे आबळे तर्फ करेपठार प्रांत पुणें येथील मौजे मजकूरची निमे मोकदमी दरेकराची आहे. त्यामध्यें मानाजी बिन पुंजाजी व मानाजी बिन सयाजी पाटील दरेकर यांमध्यें व गिरजोजी बिन कृष्णाजी व पिलाजी बिन चांदजी पाटील दरेकर यांमध्यें मोकदमीचा कजिया आहे. त्याचा इनसाफ पेस्तर होऊन विल्हे लागेतोंपर्यंत दरेकराची निमे मोकदमी अमानत केली असे. तरी दरेकराचे मोकदमीचे मानपान हक्क लवाजिमे गिरजोजी व पिलाजी घेत आहेत, ते कुल जप्त करून रा. श्रीपतराव बापूजी यांजकडे देणें ह्मणोन मोकदमास सनद १.

इ. स. १७५०-५१
इहिदे खमसेन
मया व अलफ.
रजब १०

येविशीं श्रीपतराव बापूजी कमाविसदार प्रांत पुणें यांस पत्र कीं सदरहू पाटीलकीचे हक्क मानपान जप्त करून आपले हिशेबीं जमा करणें ह्मणोन सनद १.

---

( 19 ) A letter addressed to Narhari Narayan, Kamavisdar of Tarf Devpur Belapur, in the service of the Dixit to the following effect:—Madhavrao Deshpande of Paragana Sangamner is indebted to Purshotam Mankeshwar, Kulkarni of Mouze Bhardapur in the sum of Rs. 100 ( one hundred ). Money is also due to the said Kulkarni from ryots in the villages of the said Tarf, but they refuse to pay. It is therefore ordered that the parties be warned to liquidate their debts with interest according to the terms of their bonds, and that from the amounts collected, one-forth be remitted to the Huzur, the remainder being made over to the said Kulkarni.

A. D. 1750-51.

( 20 ) A Sanad issued to Jagatap, ( owner of half the Patel Watan ) and samast Dahijan ( village community ), of the village Ambale of Tarf Karepathar in Prant Poona to the following effect:—Half the Watan of the said village, which belongs to Darekar family has become the subject of a dispute, between Manaji bin Punjaji and Manaji bin Sayaji Patil Darekar on the one side and Girjoji bin Krishnaji and Pilaji bin Chandji Patil Darekar on the other. The said Watan should therefore be kept under attachment pending the settlement of the dispute in the following year. It is orderd that the privileges, hucks, and perquisites, pertaining to the said Darekars, which are now enjoyed by Girjoji and Pilaji, be attached, and made over to Shripatrao Bapuji.

A. D. 1750-51.

इ. स. १७५०–५१
इहिदे खमसेन
मया व अलफ.
रजब २९

[ २१ ] माणको नारायण व याचे भाऊबंद कुळकर्णी कसबे महालुंगे तर्फ मजकूर प्रांत जुन्नर यांजकडे रा. मोरो बल्लाळ यांचें कर्ज येणें तें वारून देत नाहींत; यास्तव कसबे मजकूरचें कुळकर्ण सरकारांतून जप्त करून त्याची गुमास्तगिरी धोंडो विश्वनाथ यास सांगितली असे. तरी याचे हातें कुळकर्णाचें कामकाज घेऊन हक्क लवाजिमे असतील ते मशारनिल्हेकडे चालवणें ह्मणोन मोकदम कसबे मजकुर याचे नांवें सनद १.

धोंडो विश्वनाथ यास सनद कीं सदरहू कुळकर्णाची गुमास्तगिरी तुह्मांस सांगितली असे. तरी कुळकर्णाचें काम करून हक्क लवाजिमे उत्पन्न होईल तें रा. मारो बल्लाळ यांजकडे देत जाणें ह्मणोन सनद १.

इ. स. १७५०–५१
इहिदे खमसेन
मया व अलफ.
साबान ५

[ २२ ] काशीबा बोरगुडे व कानडे यांचा देशमुखीचा कजिया आहे, सबब प्रांत मजकूरची देशमुखी अमानत करून सरकारांत ठेविली असे. तरी देशमुखीचा कजिया विल्हेस लागेतोंपावेतों देशमुखीचा हकदक मानपान जुन्या देशमुखाकडे न देणें. देशमुखीचे मानपान हकदक कुल राजश्री अंताजी मल्हार सुभेदार प्रांत गंगथडी यांजकडे देत जाणें, ह्मणोन मोकदम देहाय प्रांत चांदवड यांस पत्र.

येविशीं अंताजी मल्हार यांस पत्र कीं परगणे मजकूरची देशमुखी अमानत केली असे, तरी परगणे मजकूरची देशमुखी अमानत करून देशमुखीचे गुमास्तगिरीस एक कारकून पाठवून देशमुखीचे मानपान हकदक कुल जप्त करून सरकारचे हिशेबीं जमा धरणें ह्मणोन सनद १.

---

A. D. 1750-51.

( 21 ) A Sanad issued to Mokadams of Kasba Mahalunga of the said Tarf in Prant Junnar to the following effect: Manko Narayan and his brethren, Kulkarnis of the said village, owe debt to Moro Ballal, which they do not liquidate. The Watan of Kulkarni is therefore placed under attachment and Dhondo Vishwanath is appointed as deputy. You should take service from him, and continue to him the perquisites appertaining to the said Watan.

A. D. 1750-51.

( 22 ) A letter addressed to the Mokadams of villages in Pargana Chandwad to the following effect:—There exists a dispute between Kasiba Borguda on the one side, and Kanada on the other, regarding the Deshmukhi watan of the said Pargana. The said Deshmukhi watan is therefore placed under attachment; it is directed that pending final settlement of the dispute the proceeds of the said watan, including the rights and privileges appertaining thereto should not be paid to the old Deshmukh, but to Antaji Malhar Subhedar, of Prant Gangthadi.

[ २३ ] प्रांत जुन्नर निसबत चि. रा. सदाशिव चिमणाजी यांस पत्र कीं कानुशा मारवाडी मौजे अवसरी खुर्द येथें राहत होता; तो साल गुदस्त मृत्यु पावला. त्याचा नकद ऐवज व जिन्नस व खताचा ऐवज वसूल करून सुभा जमा करून ठेवणें. पेस्तर आज्ञा करणें ती केली जाईल, ह्मणून रा. हरी दामोदर यांचे नांवें सनद सादर आहे. त्यास कानुशा मजकुराचे ऐवजाची वगैर यादी तुह्मीं पाठविली येणेंप्रमाणें:—

इ. स. १७५०–५१
इहिदे खमसेन
मया व अलफ.
साबान ६

नकद —————— रुपये

१७०८ ऐन रोख

८८९ जिवंत असतां

८१९ मयत झाले वरी खोलींत ऐवज सांपडला.

———

१७०८

९४३॥ कर्ज येणें रुपये १०४९॥ पैकीं वसूल सतराशांत आला १०२ बाकी येणें,

२॥।= कित्ता जिनसा रुपये.

-॥- निमचा

ऽ= चंदन खोड

२।- पागोटीं ३ दर -॥-

———

२॥।=

———

२६५४।=

गल्ला कैली खंडी ——————

.।२॥। बाजरी तसलतमात जावजी शिंदा कर्ज येणें कुळ नादार

.।३॥२ऽ= शिल्लक तसलमात मोत्याजी शिंदा

-।-॥ मीठ

ऽ॥।=॥ तांदुळ असडी

ऽऽ१ऽ= गहू

ऽ=ऽ१॥ बाजरी

———

.।३॥२ऽ=

-॥१।२ऽ=

वजन पक्कें

ऽ॥-॥९ भांडी वजन

ऽ।३॥ तांबे तराजू वगैरे.

ऽऽ७ऽ९ पितळ समई वगैरे.

———

ऽ॥-॥९

---

( 23 ) A letter addressed to Sadashiv Chimnaji in charge of Prant Junnar:—

A. D. 1750-51.

A Sanad has already been issued to Hari Damodhar to the effect that the property of Kanusha, Marwadi, who was residing at the village, Awasari Khurd and who died last year, should be in placed to the credit of the Subha Account, pending further instructions. A memo of the property of the deceased Kanusha has now been sent by you. The details of it are as follows:—

READY CASH

| | |
|---|---|
| While alive | Rs. 889 |
| Found in his room after death | Rs. 819 |
| | Rs. 1708 |

नकद —————— रुपयें

१००० कानुशा जीवंत असतां देऊळ
बांधावयास रुपये दिल्हे. गुजारत
बाबाजी गोविंद कुळकर्णी.

———

३६५४।=

शेंदुर पुडा १

गल्ला कैली खंडी ——————

ᐤᐤ५। लोखंड

-।१।५ तंबाखू

ᐤ१ᐤᐤ९ किराणा बाब

ᐤ।४ खोबरें.

ᐤᐤ६॥ खारिक.

ᐤᐤ४ सुपारी.

ᐤᐤ१॥ हळद.

ᐤᐤ३ जिरें.

ᐤᐤ१ᐤ९ मिरें.

ᐤᐤ=।। कुंकु.

ᐤᐤ।।। पापडखार.

ᐤᐤ१ मोहऱ्या.

ᐤᐤ२॥ कात.

ᐤᐤ३ ओवा.

———

ᐤ१ᐤᐤ९

———

-।३ᐤ१

---

Debt to be recovered amounting to Rs. 1045-8-0 of which Rs. 102 have been recovered. The balance yet to be recovered is........................................Rs. 943--8-0

VALUE OF THE ARTICLES.

| | | |
|---|---|---|
| One small sword........................................ | ,, | 0--8-0 |
| One piece of sandal wood .................................. | ,, | 0--2-0 |
| Three turbans, at 12 annas each .......................... | ,, | 2--4-0 |
| | Rs. | 2-14-0 |

Total.........Rs. 2654--6-0

Amount paid by Kanusha to Babaji Govind Kulkarni while he was alive for the purpose of erecting a temple...... ,, 1000--0-0

Grand Total...... Rs. 3654--6-0

एकूण छत्तीसशे सवाचौपन रुपये चवल व गल्ला सव्वासोळा मण दोन पायली निठवें व वजन आठ मण एक शेर व शेंदूर पुडा एक येणेंप्रमाणें तुह्मीं यादी समजाविली. ऐशास महादाजी गोविंद कुळकर्णी मौजे मजकूर यांनीं विनंती केली कीं, कानुशा जिवंत असतां मौजे मजकुरीं श्री शिद्धेश्वराचें देवालय बांधावयास एक हजार रुपये आह्माजवळ दिले आहेत. ते सदरहू सदरचे बेरजेंत आले आहेत, तरी बाकी ऐवज राहिला तो वगैरे जिन्नस देवावा. देवालय श्रीचें बांधों. त्याजवरून मनास आणून सदरहू प्रमाणें रुपये व जिन्नस महादाजी गोविंद कुळकर्णी यांजकडे देविला आहे, तरी मशारनिल्हेकडे देणें. देवालय तयार होय ते गोष्टी करणें. लोकांकडे नक्त व गल्ला कर्ज येणें आहे तो वसूल करून देववणें ह्मणोन सनद १.

इं. स. १७५०–५१ इहिदे खमसेन मया व अलफ. रमजान ६

[ २४ ] शंकरराव देशमुख परगणे संगमनेर याचे नांवें निवाडपत्र लिहून दिलें कीं, सटवोजी दिघा तळेगांवकर चाकर सरकार यानें हुजूर विदित केलें कीं परगणे मजकूरची देशमुखी कदीम आमच्या वडिलांची आहे. याविषयीं सनद पत्रही आहे ह्मणोन. त्यावरून तुह्मास तलब करून हूजूर आणिलें. दिघा मजकूराची तहकीकात मनास आणितां चारशें वर्षें पर्यंत कोठें दखलगिरी अगर नांवही नाहीं. कागदपत्र दाखविला तो गलुफी दिसून आला. तुह्मी पहिल्यापासून आहां. दिघा मजकुराचा लाझ्या नाहीं असें जाणून तुह्मांवर कृपाळू होऊन हें निवाडपत्र सादर केलें असे. तरी परगणे मजकुरची देशमुखी सुदामत प्रमाणें करून परगणे मजकूरची आबादी व कामकाज करीत जाणें ह्मणून निवाडपत्र लिहून देऊन शेरणी करार केली. ते जमाः—

---

He had advanced him Rs. 1000 one thousand for erecting a temple of the idol Sidheshwar. This sum has been shown in the above details and he prays that the remaining property of the deceased should also be made over to him for the same purpose. Having taken into consideration his prayer, it is directed that the property be made over to the said Mahadaji Govind Kulkarni for the said purpose that measures be adopted towards the completion of the temple; aud that the cash and grain due to the deceased be recovered and made over to Mahadaji.

A. D. 1750-51.

( 24 ) A decree passed in favor of Shankarrao Deshmukh of Pargana Sangamner to the following effect:—One Satwoji Digha of Talegaon in the service of Government represented to the Peshwa that the Deshmukhi watan of the said Pargana belonged to his ancestors from former times, and that there were in his possession Sanads and letters in connection with it. Shankarrao was then summoned and brought to the Huzur. On enquiry into the matter it was found that the said Digha had no connection with the Watan for the last 400 years, that there was no entry of his name (in the accounts), and that the document he had produced was a forgery. Taking these circumstances, into consideration Government were pleased to decree that the said Shankarrao should continue to enjoy the Deshmukhi Watan of the Pargana aforesaid, to make the Pargana populated and flourishing, and to manage the affairs of the same. It was ordered that the said Shankrrao should pay to Government a nazar, of Rs. 5001

| | रुपये. |
|---|---|
| बरहुकूम निवाड पत्र.... .... .... .... .... | १००१ |
| खेरीज निवाडपत्र .... .... .... .... .... | ४००० |
| | ५००१ |

सदरीचा करार छ. ६ रमजानीं कीर्दीस बार करून दिला असे. तारीख मजकूर. ये विषयीं रा. रामचंद्र मल्हार याशीं साहित्य पत्र सादर केलें असे.

[ २५ ] शंभुदास रघुनाथ देशपांडे परगणे गालणा याचे कर्ज लोकांकडून येणें.

इ. स. १७५०–५१ **इहिदे खमसेन मया व अलफ.** सवाल २४

परगणे वाखारी येथें गांवगन्ना
परगणे चिखलवाहल येथील देशमुखांकडे.

राघोजी देशमुख व हेबा चौधारी व चांदु चौधरी परगणे टोकडे यांजकडे येणें.

मौजे निकुंबे याजकडे गोविंद गांगुर्डा मौजे पलसदरे परगणे झोडगे वगैरे.

सदरहू जणांकडे कर्ज वाजवी येणें आहे तें देत नाहींत ह्मणून हुजूर विदित झालें. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तुह्मीं ताकीद करून खताप्रमाणें व्याजासुद्धां रुपये देववणें आणि सरकारची चौथाई घेऊन हुजूर पाठवणें ह्मणोन रामचंद्र महादेव दिमत त्रिंबकराव विश्वनाथ यांस पत्र.

महिपतराव लाळे यांस सदरहुप्रमाणें पत्र कीं खताप्रमाणें ऐवज वसूल करून देववणें, आणि सरकारची चौथाई हुजूर पाठवणें ह्मणोन पत्र.

---

| | |
|---|---|
| As per decree.............................................. | Rs. 1001 |
| Extra.......................................................... | ,, 4000 |
| Total......Rs. | 5001 |

(25) A letter to Ramchandra Mahadeo in the employ of Trimbakrao Vishwanath to the following effect:—

A. D. 1750-51.

The following debt is due to Sambhudas Raghunath Deshpande of Pargana Galna.

From the several villages, of Pargana Vakhare.

From the Deshmukh of Pargana Chikalwahal.

From Raghoji Deshmukh and Heba Choudhari and Chandu Choudhari of Pargana Tokade.

From the village of Mouze Nikamba.

From Govind Gangurda of Mouza Palasdare in Pargana Zodge &c.

रामचंद्र महादेव दिमत त्रिंबकराव विश्वनाथ यास पत्र कीं, येसशेठ याचें कर्ज कुये पाटील परगणें कसबें वडेल याजकडे वगैरे लोकांकडे येणें आहे ते देत नाहींत ह्मणोन विदित केलें. त्यावरून वाजवी खताप्रमाणें व्याजासुद्धां रुपये उगवून देववणें. त्यांपैकीं सरकारची चौथाई घेऊन हुजूर पाठवणें ह्मणोन पत्र १.

[ २६ ] रामचंद्र मल्हार प्रांत गंगथडी यांस पत्र कीं, हरबाजी ठाकूर वस्ती मातबरपुरा कसबें नाशिक यांचा व केशव नरसिंह गुजर कसबें संगमनेर यांचा सरकतीचा हिशेब आहे तो वारून देत नाहीं. त्यास, गुजर मजकुराकडे हिशेबाच्या वह्या आहेत त्या त्याजकडून आणवून याचा व त्याचा हिशेब कसकसा आहे तो मनास आणून हरबाजी मजकुराचे वाजवी रुपये वसूल होतील त्याजपैकीं चवथाई सरकारची घेऊन हुजूर पाठवणें; तीन तक्षीमा हरबाजी मजकूर यास देणें म्हणोन पत्र.

इ. स. १७५०–५१.
इहिदे खमसेन
मया अलफ.
जिल्काद २४.

[ २७ ] कसबे पुणतांबे परगणे संगमनेर यांस पत्र कीं त्रिंबकजी बिन जाखोजी उगले व कानोजी बिन कृष्णाजी ठुपके यांचा व दमाजी बिन जगदेवराव धनवले व धुलाणी बिन देवाजी वाहाडणे यांचा कसबे मजकूर येथील पाटिलकीचा कजिया आहे. याजकरितां हरदु वादे हुजूर फिर्याद आले. त्याजवरून दोघांचे जामीन तकरीरा घेऊन पेस्तर इनसाफ करून खरा खोटा निवाडा होई तोंपर्यंत मोकदमी अमानत केली असे. मोकदमीच्या कामकाजास रा. चतुरभुज मल्हार

इ० स० १७५०-५१.
इहिदे खमसेन
मया व अलफ.
मोहरम ३.

---

It has been represented to the Huzur that these men refuse to pay the debt really due by them. This order is therefore issued. You should warn these men, and arrange to have the amounts paid back with interest, acccording to the documents, and remit one fourth of each amount to the Huzur.

( 26 ) A letter to Ramchandra Malhar of Gangthadi:—There is a dispute regarding a partnership account between Harbaji Thakur of Matburpura Nasik, and Keshav Narsing Gujar of Sangamner. You should get the account books from the Gujar, and after examining the accounts, recover the amount that might be found to be due to Harbaji. One fourth of the amount recovered should be sent to Government, and the remainder should be handed over to Harbaji.

A. D. 1750-51.

( 27 ) A letter to Kasba Puntambe in Pargana Sangamner. There being a dispute regarding the Patilki Watan of the said village between Trimbakji bin Jakoji Ugle and Kanoji bin Krishnaji Tupake on one side, and Damaji bin Jagdeorao Dhanwala and Dhulani bin Dewji Wahadane on the other, both the parties have made a complaint to the Huzur. Their Statements have been recorded, and securities have also been taken from them. The Patilki Watan is therefore ordered to be attached pending decision, and Chatarbhuj Malhar is sent to perform the duties of the office. You should therefore

A. D. 1750-51.

पाठविले आहेत. तरी तुह्मी याजपाशी रुजू होऊन पाटिलकीचे हकदक, मानपान, शेतें, कुल असेल तें मशारनिल्हेस रुजू करून देणें. मोकदमीचा कारभार हे करतील. पट्टी, पासोडी, लावणी हे करतील ह्मणोन गावास सनद १.

[ २८ ] निसबत बाबाभट बिन हरभट व सखंभट बिन रामभट पावशे जोशी वाजश्नी जोशी, देहाये परगणे नेवासे, व परगणे शेवगांव, यांचा व साखरभट व सखभट व सदाशिवभट काळे यांचा मौजे चिंचोडी व मौजे कोल्हार व मौजे शिराळे तिजाई परगणे नेवासे येथील जोशीपणाचें भांडण होतें. त्याचा इनसाफ झाला. काळे खोटे जाहाले. पावशे खरे जाहाले. सबब यास निवाड पत्र करून देऊन शेरणी करार केली बरहुकूम कतबा रुपये.:–

इ. स. १७५०-५१.
इहिदे खमसेन मया व अलफ.
मोहरम २०.

१०१ निवाड पत्रांत बेरीज.

२५० खेरीज निवाड पत्र.

----

३५१.

यासी मुदती,

१७६ सालमजकुरीं ज्येष्ठमासीं द्यावे.

१७५ पेस्तर सालीं सन इसनेंत ज्येष्ठमासीं द्यावे.

----

३५१.

---

acknowledge him as Patel and hand over to him the rights and honors and fields pertaining to the office. He will do the duties of the Patel, and make collections and give out land for cultivation.

( 28 ) The dispute regarding the Joshi Watan of Mouze Chinchodi Kolhar Sirale Tijai in Pargana Newase between Babbhat bin Harbhat, Sakambhat bin Rambhat Pawashe Joshi Wajasni Joshi of various villages in Parganas Newase and Sheogaon on one side, and Sakharbhat, Sakhbhat, and Sadashivbhat Kale on the other, has been decided in favor of the former. A sanad embodying the decision has been given and the following amount has been fined as शेरणी 'Sherani' (fee to be given to Government by the successful litigant ).

A. D. 1750-51.

Rs. 101 According to the decree.
Rs. 250 Extra.

----

Rs. 351. Instalments.

[ २९ ] नरहर लक्ष्मणराव यांस पत्र कीं, भानजी काळे व सुभानजी शिंदे वस्ती मौजे देऊळगांव गाडा तर्फ पाटस यांचें कर्ज परगणें शेवगांव येथें आहे. त्यास, पूर्वी तुह्मास पत्र सादर केलें कीं, वाजवी कर्ज वसूल करून देऊन सरकारची चौथाई घेऊन हुजूर पाठवणें ह्मणोन लिहिलें. त्यास तुह्मीं जाबसाल केला कीं, पाऊसपाणी जाहल्यावर वसूल करून देऊं ह्मणोन सांगितलें. त्यावरून हल्लीं हें पत्र सादर केलें असे. तरी खताप्रमाणें रुपये वसूल करून देऊन सरकारची चौथाई घेऊन हुजूर पाठविणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७५०-५१.
**इहिदे खमसेन मया व अलफ.**
मोहरम २४.

[ ३० ] लक्ष्मण शंकर यास सनद कीं, अलंदाज खान सौदागर गंजबसोदेकर याचा भाऊ गुजराथेस जाऊन घोडे ६ साहा व रथ एक हस्तीदंती बैल सुद्धां, व उंट १ एक, वगैरे जिन्नस मिळोन माल रुपये १३०६५ तेराहजार पासष्ट रुपयेयांचा सिरोंजेस आणून संतोखराव वाणी याचे घरीं ठेविला आहे. तो देत नाहीं. तर त्यास संतोखी याजपासून सदरहू माल घेऊन अलंदाजखान यास तीन हिस्से देऊन बाकी चौथाई ऐवज सरकारांस वसूल करून पाठवून देणें ह्मणोन सनद १.

इ. स. १७५०-५१.
**इसने खमसैन मया व अलफ.**
जमादिलाखर १०.

---

176 To be paid in month Jeshta of the current year.

175 So he paid in month Jeshta of the next year, that is, A. D. 1751-52.

---

351

( 29 ) A letter to Narahar Laxmanrao. Bhanji Kale, and Subhanji Sinde of Deulgaum gada in Tarf Patas have some debts to recover from Pargana Sheogaon. You were therefore previously directed to recover the amounts that might be really due and remit ¼ of them to Government. You wrote in reply that the recovery would be made after the rains. This letter is, therefore, now sent. You should recover the debts and pay the amounts to the above persons, after deducting one fourth which should be remitted to Governmet.

A. D. 1750-51.

( 30 ) A Sanad to Laxman Shankar. A brother of Alandaj Khan trader of Ganj Basode, brought from Gujarath to Sironj, 6 horses, one ivory carriage with bullocks, one camel and other articles, in all worth Rupees 13,065, and kept it with Santokrao Wani. Santokrao refuses to give back the articles. You should take them from him, and restore them to Alandaj Khan, remitting to Government one fourth of the value of the property restored.

A. D. 1751-52.

(३१) विश्वासराव यांस पत्र कीं, सदाशिव नाईक काळे पुणतांबेकर यांचें कर्ज चतुर्भुज मल्हार याजकडे येणें. त्याविषयीं उभयतांचा परस्परें कजिया आहे. त्यास चतुर्भुज मल्हार याचे देशपांडेपणाचे गांव पेशजी आहेत ते व हल्लीं नवे साधिले आहेत ते कुल गांव जप्त करावे या विषयीं तुह्मांस हें पत्र लिहिलें. तरी याचे देशपांडेपणाचे गांव जे असतील ते कुल सरकारांत जप्त करणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७५२–५३. सलास खमसैन मया व अलफ जिल्हेज २१.

(३२) महिपतराव कवडे यांस पत्र कीं, नारायणदास अंबाईदास नंदुरबारकर व संभुदास केसोजी यांचा दुकानाचा कजिया आहे. त्यास संभुदास कुकरमुडें येथें राहतो. त्यास आणावयास सरकारचे ढालाईत व तुमचा महामुनी गोपिनाथ यांसीं हुजूरचें पत्र सादर जाहलें कीं, संभुदास मजकुरास हुजूर पाठवणें. असें असतां महामुनी गोपिनाथ यानें संभुदास मजकुरास गांवांत छपावून राखिले. सरकारचे ढालाइतास वीस पंचवीस रुपये देऊन माघारे हुजूर पाठविले ह्मणून नारायणदास मजकुरानें सांगितलें. ऐशास संभुदास गांवांत असतां महामुनीनें छपावून राखिले असा लबाड. त्यास, महामुनीकडे अन्याय लागला तरी अमलावरून दूर करणें. आणि संभुदासास ताकीद करून त्याचा याचा कजिया दुकानाचा असेल तो मनास आणून वाजवी कजिया विल्हेस लावून कर्जाचे ऐवजाची सरकारची चौथाई कर्जाची घेऊन बाकी ऐवज नारायणदासास देणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७५३–५४ अर्बाख खमसैन मया व अलफ. जिल्हेज ९.

---

(31) A letter to Wishwasrao—Chaturbhuj Malhar owes a debt to Sadasiva Naik Kale of Puntambe, and there is a dispute between the two about it. This is to direct you that the villages appertaning to the Deshapande Watan of Chaturbhuj, both, those which belong to him of old, and those newly acquired, should be attached.

A. D. 1752-53.

(32) There being a dispute between Narayan Ambaidas of Nadurbar, and Sambhudas Kesoji of kukarmude, in regard to a shop. 2 horsemen were sent to get him to Poona, and the agent of Mahipatrao Kawade was directed to assist them. The agent however concealed Sambhudas and sent away the horsemen by paying them Rs. 20 or 25. Mahipatrao was now asked to remove the agent from his office and to settle the dispute between the parties, remitting one-fourth of the amount of debt to Government.

A. D. 1753-54.

[ ३३ ] बाबुराव हरी कमाविसदार परगणे संगमनेर यांस सनद कीं, कसबे संगमनेर येथें सन इहिदेंत दमाजी गाईकवाड आले ते समयीं कसबे मजकुराकडे घास दाणीयाचा ऐवज रुपये १०५०१ साडे दहा हजार एक रुपया करार केले. ते गांवकरी यांस द्यावयास न मिळत; तेव्हां प्रीतीराज देशमूख व देशपांडे व समस्त गांवकरी येऊन आह्मांपासून साडे दहा हजार रुपये घेऊन गायकवाडास दिले. पुढें गांवावर पट्टी करून ऐवज आमचा आह्मांस द्यावा तो न देत ह्मणोन नथोबा नाईक व सोयरोबा नाईक वगैरे सराफ कसबे मजकूर यांणीं हुजूर येऊन विनंति केली त्यावरून सनद सादर केली असे. तरी कसबे मजकुरीं कुल खुम (कुळें?) असतील त्यांजवर साडे दहा हजार रुपयांची पट्टी करून व्याजसुद्धां सराफाचे रुपये देववणें. आणि सराफाकडे सरकारची नजर १००० रुपये एक हजार करार केले आहेत ते वसूल करून हुजूर पाठवून देणें ह्मणोन सनद १.

इ. स. १७५३-५४.
आर्बा खमसेन
मया व अलफ
मोहरम १७

हजार रुपये सरकारची नजर करार केली याचा कतबा नथोबा नाईक वगैरे सराफ कसबें संगमनेर यांचा घेऊन दप्तरीं ठेविला असे.

रसानगी यादी.

[ ३४ ] चतुर्भुज मल्हार शिवणेकर देशपांडे तर्फ पोनमावळ याचा व सदाशिव नाईक कोल्हे यांचा गुजराथ प्रांतीचे मामलतीचा देववेवीचा कजियामुळें वर्तणुकेचा जामीन चतुर्भुज मल्हार यांजवळ मागितला तो याणीं न दिला; याजकारितां याचें देशपांडेपण गांवकुळकर्ण व जोतिषपण व गांव इनाम व इनाम शेतें कुल सरकारांत जप्त करून मनाजी सुंदर कारकून जप्तीस पाठ-

इ. स. १७५३-५४.
अर्बा खमसैन
मया व अलफ.
मोहरम ३०.

---

(33) A sanad to Baburao Hari. Kamavisdar of Sangamner, In San Ihide (A. D. 1750-51,) Damaji Gaikawad encamped at Sangamner and demanded Rupees 10,501 from the towns-people on account of Ghasdana. The people were unable to raise the sum required. Pritiraj Deshmukh, the Deshapande, and the rest of the towns-people then went Nothoba Naik, Soyaraba Naik and other money-lenders, and collecting the amount of Rs. 10,500, paid it to the Gaikwad. The above money-lenders have come to the Huzur at Poona, and represent that the persons above referred to, to whom the money was advanced, have yet taken no steps to return the same by levying a cess on the town. This sanad is therefore issued. You should levy the amount of Rupees 10,500, from the residents and pay the money with interest to the lenders. A nazar of Rupees 1000 is imposed on the lenders, which should be recovered, and sent to the Huzur.

A. D. 1753-54.

( 34 ) Chaturbhuj Malhar Siwanekar Deshapande of Tarf Pawan Mawal having failed to give security for his abiding by the decision of Government in a dispute that existed between him and Sadasiva Naik Kolhe, in regard to certain money-transactions connected

A. D. 1753-54.

विला आहे. त्यास हल्लीं मशार निल्हेचें वतन मोकळें केलें असे. सरकारच्या कारकुनास हुजूर यावयाची आज्ञा केली असे. ते येतील. त्यास, सदरहू प्रमाणें मशार निल्हेचें वतन सुदामत चालत आल्याप्रमाणें याजकडे चालवणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन अस्सल पत्र याजवळ परतोन देणें ह्मणोन पत्रें,

१ नारो रामचंद्र कमाविसदार तर्फ नाणेमावळ यांस पत्र.
१ गोमाजी दत्तो यांस पत्र.
१ चतुर्भुज मल्हार शिवणेकर देशपांडे याचें नांवें पत्र.
१ जमीनदार तर्फ पोन मावळ यास पत्र.
१ गांवास देइ १६ ऐकूण पत्र.

—

५

१ मनाजी सुंदर यास पत्र कीं तुह्मीं उठोन येणेंह्मणोन पत्र.

—

६

[ ३५ ] महिमाजी बिन मळजी पाटील निमे मोकदम व खेलोजी बिन नरसोजी परगणे मौजे आंबले तर्फ करेपठार प्रांत पुणें याचे नांवें सनद लिहून दिल्ही. तुह्मा मौजे मजकूरचे पाटिलकीचा कजिया होता तो निवडून तुह्मांकडे सरकारची हरकी करार रुपये २५०१ अडीच हजार एक रुपाया करार करार केला; त्यांपैकीं तुह्मांकडे रा. अमृतराव दातार याशीं वरात रुपये १२५० साडेबाराशें रुपयांची केली. ते मशारनिल्हेस सुभानजी पाटील याचे गुजारतीनें रुपये पावले. सरकारांत जमा झाले असे. बाकी रुपये बाराशे एकावन्न रुपये सरकारांत राहिले ते पावते करून पावलीयाचे कबज घेणें. तेणे प्रमाणें मजुरा असेत ह्मणोन सनद १.

इ. स. १७५३-५४.
अर्बासमसैन
मया व अलफ
रबीलावल ३.

---

with the Gujarath Mamlat, his Watan was ordered to be kept under attachment. The attachment watan was now orderd to be removed.

(35) A nazar of Rupees 2501 was imposed on the successful litigant in a dispute regarding the Patelki Watan of Ambale in Tarf Kare-Patar of Prant Poona.

A. D. 1753-54.

इ. स. १७५३–५४. अर्बा खमसेन मया व अलफ. रबिलावल २६.

[ ३६ ] चिरंजीव राजश्री सदाशिव चिमणाजी यांस सनद कीं, वेणीमाधव जोशी व सिद्ध जोशी यांचा जोशीपणाचें वतनाचा गांवचा कजिया होता. तो निवडून देऊन निवाडपत्रें करून दिलीं. आणि त्यांजकडे सरकारचे हरकीचा व गुन्हेगारीचा ऐवज येणेंप्रमाणें करार रुपये:—

१०१ सिद्ध जोशी व कोंड जोशी वतनसंबंधें खरे जाहाले सबब हरकी.

१०१ वेणीमाधव जोशी जोगळेकर खोटे जाहाले सबब गुन्हेगारी.

---

२०२.

एकूण दोनशे दोन रुपये करार करून तुह्मांस सनद लिहिली असे. तरी सदरहु रुपये हरदुजणांकडील सुभा वसूल घेणें ह्मणोन पत्र १. रसानगी यादी.

इ. स. १७५३–५४. अर्बा खमसेन मया व अलफ. रबीलाखर ११.

[ ३७ [ नारो रामचंद्र यास सनद कीं, गोविंद जोशी गोळक तर्फ चोण यांणीं हुजूर येऊन विदित केलें कीं, तर्फ मजकूरचें जोतिषपण तिसरीं तक्षीम आहे. पहिल्यापासून चालत आली असतां हर जोशी याणें कजिया करून नारो रामचंद्र याजवळ फिर्याद जाहला. त्यास, ते चौथी तक्षीम घेणें आणि बेदावा लिहून देणें ह्मणोन ह्मणतात. आपण कबूल करीत नाहीं, ह्मणोन आपली तक्षीम अमानत केली व आपल्या भावास अटकेस ठेविलें आहे ह्मणून त्याजवरून हें पत्र सादर केलें असे. तरी गोविंद जोशी याची तक्षीम पहिल्यापासून चालत आल्याप्रमाणें याजकडे चालवणें. अमानत न करणें. व याचे भावास सोडून देणें ह्मणोन पत्र १.

---

A. D. 1753-54.

(36) A dispute relating to a Joshi Watan having been decided, Rupees 101, were levied from the successful party as a present, and the same amount from the party which had failed as a fine.

A. D. 2753 54.

(37) A Sanad to Naro Ramchandra:—Govind Joshi Golak of Tarf Chon, having come to the Huzur, represents that, he is the owner of a third share in the Joshi watan of the Tarf, and that he had been enjoying the share for a long time; that Har Joshi nevertheless disputed his right and complained to you; that you asked Govind Joshi to accept a fourth share of the watan and to relinquish in writing his right to the rest; and that on his having refused to comply with your wishes, you attached his share, and imprisoned his brother. This letter is therefore issued, and you are directed to remove the attachment, to continue to Govind Joshi his share, and to release his brother.

[ ३८ ] भगवंतराव राम कडेकर यांस पत्र कीं, नंदराम किरपाराम चाकर सरकार याची ठेव खुशालसिंग याजकडे घोडी दोन व नग रुपये आहेत. त्यास लबाडीस आला आहे. तरी निमे सरकारांत घेऊन निमे आपणास द्यावे ह्मणोन; त्यावरून तुह्मास पत्र सादर केलें असे. तरी वाजवी ऐवज ठरेल त्यांपैकीं निमे सरकारांत घेऊन निमे यास देणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७५४–५५. खमस खमसैन मया व अलफ. मोहरम ११.

नारो बाबाजी नामजाद परगणें नेवासे यांस पत्र कीं, नंदराम जमातदार याची दहा पांच कुळें नगरांत आहेत. त्यास त्यांजकडे वाजवी असेल तें वसूल करून देववणें आणि निमे ऐवज सरकारांत घेणें; निमे यास देणें ह्मणोन पत्र १.

[ ३९ ] भिकनाक बिन पायनाक ये बिन भीमनाक महार तक्षीम चौथी तक्षीम कसबे हाग तर्फ रांजणगांव यास सतनाक भांडण भांडत होता. तो इनसाफामुळें खोटा जाहला. त्याजवरून भिकनाकास सरकारचें निवाड पत्र करून दिलें असे. तरी तुह्मी कसबें मजकूरचें महारकीचें वतन चौथी तक्षीम यास व याचें पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवणें. प्रतीवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणें; या पत्राची प्रती लिहून घेऊन अस्सल पत्र भोगवटीयास याजजवळ परतोन देणें ह्मणून ताकीद पत्रें:—

इ. स. १७५४–५५ खमस खमसैन मया व अलफ. मोहरम १२

१ मोरा नारायण सुभेदार परगणे कर्डे रांजणगांव यांस.
१ मौजे मजकुरास पत्र.
१ जमीनदार परगणे मजकूर.
१ शाहाजी बादल.
४.

[ ४० ] भिकाजी व रुस्तुमजी अंधारू वस्ती मौजे उदेपूर परगणे पावोडी प्रांत किल्ले पारडी यांस अभयपत्र कीं, तुह्मांविषयीं रा. दुर्जनसिंग यांणीं विनंति केली कीं, भिकाजी अंधारू याचा व सरकती याचा कजिया होता. तो सर्वोत्तम शंकर यांणीं विल्हेस लावून आठशे रुपये हरकी करार करून कतबा घेतला आहे. त्यास हे नादार; द्यावयास मवसर नाहींत, माफ करावे

इ. स. १७५४–५५. खमस खमसेन मया व अलफ. सफर १.

---

A. D, 1754-55. (38). In this case one half of the amount of debts recovered was at the request of the suitor ordered to be credited to Government, the rest being paid to him.

A. D. 1754-55. (39) A suit relating to the Maharki Watan of Kasba Hag in Tarf Ranjangaon was decided: but no Nazar was levied.

A. D. 1754-55. 40. A suit between Bhicaji and Rustumji Andharu, and others regarding the office of Andharu in Balsad was decided,

ह्मणोन. त्याजवरून सदरहु आठशे रुपयांपैकीं दोनशे घेऊन सहाशे माफ खर्च लिहिणें व भिकाजी मजकूर याचें अंधारूपण पुरातन चालत आलें असेल, त्याप्रमाणें चालवणें ह्मणोन सर्वोत्तम शंकर यास आज्ञा करून हें अभयपत्र सादर केलें, तरी सदरहु आठशे रुपयांपैकीं दोनशे वसूल देणें. सहाशे माफ करतील. तुह्मी उदेपुरीं राहून उपाध्यपण अंधारूपणाचें बलसाड वगैरे जेथें चालत आलें असेल, त्याप्रमाणें चालवणें ह्मणोन पत्र. भिकाजी मजकुरास पत्र १.

इ. स. १७५४–५५. **खमस खमसेन मया व अलफ.** रबिलाखर १५.

[ ४१ ] बापूजी आनंदराव कमाविसदार कसबे पुणें यांस सनद. त्रिंबकभट, व हरभट, भीमाशंकरभट बिन गणेशभट, शिवरामभट बिन खंडभट वेव्हारे जोशी कसबे मजकूर यांचा व बापुभट व मल्हारभट जोशी वेव्हारे कसबे मजकूर यांचा कजिया कीं, त्रिंबक गणेश ह्मणत होता कीं, मल्हार जोशी यांणीं बापुभट यास दत्तपुत्र घेतला नाहीं, असें ह्मणत होता. त्यास कागद पत्र व जमीदाराची साक्ष मनास आणितां व पांढरीची साक्ष व भोगवटा मनास आणितां बापुभटास दत्तपुत्र घेतलें हें खरें असें जहालें. त्रिंबक गणेश खोटा जाहला असतां बेदाव्याचा कागद लिहून देत नाहीं. सबब चौघांचें वतन सरकारांत जप्त करून तुह्मास सनद सादर केली असे. तरी जोशी वेव्हारेपणाचें वतन सदरहु चहू असामींचें सरकारांत जप्त करून कुल हक्कदक मानपान जें जमा होईल तें सरकारचे हिशेबीं जमा करणें. यास जोशीपणाचा हक्क घ्यावयास प्रयोजन नाहीं. यांस साळी माळी वगैरे यांचे घरीं फिरो न देणें. सर्वांस ताकीद करणें ह्मणोन सनद.

इ स. १७५४–५५. **खमस खमसेन मया व अलफ.** रजब २१.

[ ४२ ] अछाराम रघबनशी वस्ती कसबें संगमनेर याणें हुजूर विदित केलें कीं, आपला आजा मीरचंद याणें पदाजी न्हावी यास चाळीस रुपये कर्ज देऊन घर गहाण ठेविलें होतें. आमचे रुपयांस व्याज नाहीं. त्याचे घरास भाडें नाहीं. याप्रमाणें पांच वर्षांचा करार करून खत लिहून घेतलें. पांचवर्षे जाहल्यावर रुपये मागों लागला. तेव्हां दोन महिन्यांचा वायदा केला. दोन महिन्यांनीं रुपये न दिले तरी घर डुलेल याप्रमाणें करार केला होता. रुपये मागितले, वसूल न होत. दोन वर्षे जाहालीं. न्हावी मरोन गेला. मागें त्याचें गोतें मायाजी व कानोजी कजिया करितात.

---

and a Nazar of Rs. 800 was imposed. But owing to the poverty of the parties, Rs. 600 were remitted, and Rs. 200 only were ordered to be levied.

A. D. 1754-55.

( 41 ). A suit regarding an adopted son brought by Trimbak Ganesh Joshi of Poona was decided against him. He however refused to give a deed, acknowledging his defeat and relinquishing his right. His watan of Joshi Wewhari in Kasba Poona was therefore attached, and an order was issued preventing him from officiating as priest at the houses of the lower classes.

A. D. 1754-55.

(42). Achcharam Ragbansis' ancestor took in mortgage a house belonging to a barber measuring 34 hats by 15 hats, for Rs. 40. The mortgage not having been redeemed within the period agreed upon, the house became, as agreed between the parties,

येविषयींचा इनसाफ मनास आणावा ह्मणोन. त्याजवरून मनसुबी मनास आणितां अछाराम खरा जाहला. व न्हावी खोटा झाला. सबब वाडा लांब हात ३४ व रुंद हात १५ पंधरा याप्रमाणें मिरास करून दिल्हा असे. तरी याचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें चालवणें ह्मणोन मोलाचंद कसबें संगमनेर यास सनद १.

अछाराम रघबनशी याचे नांवें पत्र कीं, तुला वरील निवाडा करार करून दिल्हा असे. तरी सुखरूप नांदणें ह्मणून सनद १. येणें प्रमाणें सनदा करून देऊन अछारामाकडे शेरणी स्वराज्य मोंगलाई कुलबाब कुलकानू देखील सरदेशमुखी करार रुपये १०.

एकशे रुपये करार केले असेत. **सदरहु** रुपये पोत्यास जमा झाले छ० मजकूर.

**इ. स. १७५४–५५**
**खमस खमसेन**
**मया व अलफ.**
साबान १५

[ ४३ ] माधवराव कदम याचे नांवें सरंजाम व वतन पाटीलक्या वगैरे होत्या. त्यांच्या वाटण्या माधवराव कदम व चत्रसिंग कदम व राणोजी कदम याप्रमाणें तीन वाटण्या केल्या. त्यांपैकीं चत्रसिंग व राणोजी कदम यांजकडे.

मोकासे नंदुरबार व सुलतानपूर पैकीं निमे इत्यादिबद्दल कलमें आहेत. × ×

दोन जाग्यांपैकीं रनाळे माधवराव कदम व तोरखेडे चत्रसिंग याप्रमाणें दो जागा दोघांनीं राहावें. दो जागांचा आकार होईल त्यांपैकीं तिसरा वाटा उभयतांनीं राणोजी कदमास द्यावा. बाकी दोन वाटे त्यांपैकीं एक माधवराव व एक चत्रसिंग याप्रमाणें तीन वाटे तिघांनीं घ्यावे. राणोजी कदम यांणीं चित्तास येईल तेथें राहावें. याप्रमाणें करार केले असे. कलम १.

रनाळें तोरखेडे वगैरे गांव वतनी यांचा कजिया कथला पडला तर अवघ्या भावांनीं एकरूप होऊन सालजाब करावा. सालजाब करितां आहे तें राहिलें तरी वाटणीप्रमाणें खावें. कदाचित गेलें तरी अवघ्यांचें. बाकी राहील त्यांतच अवघ्यांनीं समजणें. याप्रमाणें करार कलम १.

वतनें पाटीलक्या जमीन चावराबद्दल कलमें आहेत. × × × × ×

घरांत वस्तभाव सोनें रुपें जड जवाहीर भांडें कुडें व नगद तिघांकडे असेल तें एक जागा करून तिघांनीं बरोबर वांटून घ्यावें. कलम १.

हत्ती, घोडीं, उंटें, गाडे, गाड्या, गाई, ह्मशी, बैल, शेळया, मेंढ्या तिघांकडे असतील ते एकत्र करून तिघांस बरोबर वाटून द्यावे. कलम १.

कर्जवाम लोकांकडे तिघांचें येणें असेल व तिघांस लोकांचें देणें असेल तें एकत्र करून तिघांनीं बरोबर घ्यावें व बरोबर करावें. कलम १.

येणेंप्रमाणें सात कलमें करार केलीं आहेत. त्याप्रमाणें वाटण्या लिहून दिल्या आहेत.

---

the property of Achcharam! The Bhaubands of the barber filed a suit, but it was decided against them. A present of Rs. 100 was taken from Achcharam.

( 43 ). The saranjam and Watan & other property of the Kadam family was divided amongst Mahadevrao Kadam, Chatrasing Kadam, and Ranoji Kadam of Ranala, a nazar of Rs. 20,000 was levied.

A. D. 1754-55.

[४४] निवाडपत्र मल्हारभट बिन आपभट ई बिन हणवंतभट व निंबभट बिन हणवंतभट व बाळंभट बिन हणवंतभट फुलबडवे जोशी मौजें बेंबलें, परगणे करकंब व मौजें घोटी व मौजें पऱ्हेते परगणे भोसे व मौजे आकोलें परगणे टेंभुरणी सुरूसन सीत खमसेन मया व अल्लफ. तुह्मी हुजूर कसबे पुण्याचे मुकामीं येऊन विदित केलें कीं, देहाये मजकूरचे जोसपणाचें वतन

इ. स. १७५५-५६.
सित खमसेन मया व अल्लफ.
रविलाखर ४.

आपलें आहे. त्यास मल्हारभटाचे चुलते आजे व निंबभट व बाळंभट यांचे चुलत चुलते खंडभट व नारायणभट हे मौजें बेंबलें व मौजें घोटी व मौजें पऱ्हेत एकून तीन गांव उभयतां निमे निम खात होते व मल्हारभटाचे आजे व निंबभट व बाळंभट यांचे बाप हणवंतभट मौजें आकोलें, खात होते. त्यास नारायणभट मृत्यु पावले. त्याचें बुडालें. याचा दीडगांव खंडभट चालवूं लागले. यावर खंडभट मृत्यु पावले. त्याचें उत्तरकार्य आपण केलें. त्याची स्त्री आनंदीबाई आहे. तिचें सांगोपन आपण करीत आहे. त्यास तीन गांव वतनाचे खंडभट चालवीत होते. त्यांपैकीं बेंबलें व निमे घोटी व पऱ्हेत एकूण अडीच गांव आपण चालवीत आहों. निमे घोटी खंडभटाचा दासीपुत्र सुभाना आहे तो खातो. आपल्यास देत नाहीं. याजकरितां स्वामीनीं त्याजला हुजूर आणून ताकीद करून आपलें वतन आपले स्वाधीन केलें पाहिजे. खंडभटाची स्त्री आनंदीबाई आह तिजला आणून वर्तमान पुसिलें पाहिजे ह्मणून विनंती केली. त्यावरून सुभाना दासीपुत्र व आनंदीबाई यांसीं हुजूर आणिलें. वर्तमान मनास आणावयाशीं रा. शामराव आबाजी व रा. नारो आपाजी कारकून सुभा पुणें व देशमूख व देशपांडे परगणे पुणें यांसीं आज्ञा केली. त्यांनीं मनास आणून विदित केलें कीं, आनंदीबाई कोम खंडभट इजला वर्तमान पुसतां तिणें सांगितलें कीं, मल्हारभट वगैरे यांचा व आपला वंश एक आहे. आपले बुडाले वतनाचे खावंद हेच आहेत. खंडभटाची क्रिया याणींच केली व आपलेंही संगोपन करीत आहेत, असें सांगितलें. आणि कागद मल्हारभट वगैरे यांचे नांवें लिहून दिल्हा आहे व सुभाना दासीपुत्र याशीं पुसिलें. त्याणें सांगितलें कीं, आपण खंडभटाचा दासीपुत्र ह्मणून निमें घोटीचें वतन खात होतों तें यास मानेना, तरी ते मालक खावंद आहेत. सुखरूप आपलें वतन खावें. यासीं कजिया करणार नाहीं असें बोलोन कागद लिहून दिल्हा आहे. त्यास मल्हारभट व निंबभट व बाळंभट यांचा खंडभट व नारायणभट यांचा वंश एक आहे. त्याचें बुडाले वतनाचे खावंद हेच आहेत ह्मणून. सदरहुप्रमाणें मनास आणून सुभाचे

---

(44) A complaint regarding the Joshi Watan of some villages in Pargana Temburni was received. The parties were brought to Poona. The dispute was then referred to Shamrao Abaji and Naro Appaji, Karkuns of Subha Poona, and the Deshmukh and Deshpande of Pargana Poona for inquiry, and was decided on receipt of their report. It was settled that the son of the female slave of a Joshi Watandar has no right to succeed to the Joshi's Watan in preference to the Joshi's Bhaubands. A present of Rs. 101 was levied.

A. D. 1755-56.

कारकून व जमीदार परगणें पुणें यांणीं हुजूर वर्तमान निवेदन केलें व तुह्मीं विनंती केली कीं, आपणास आनंदीबाईनें व दासीपुत्रानें कागद लिहून दिल्हे आहेत. ते मनास आणून सरकारचें पत्र भोगवटीयास करून दिल्हें पाहिजे. ह्मणून विनंती करून आनंदीबाईनें व दासीपुत्रानें तुमचे नांवें पत्रें लिहून दिल्हीं आहेत. तीं आणून दाखविलीं तें मनास आणितां त्यांत मजमून:—

"शके १६७६ भावनाम संवत्सरे कार्तिक शुद्ध प्रतिपदा ते दिवशीं चिरंजीव मल्हारभट बिन आपभट ई बिन हणमंतभट व निंबभट बिन हणमंतभट व बाळंभट बिन हणमंतभट फुलबडवे जोशी मौजे बेंबले परगणे करकंब व मौजे पऱ्हेते व मौजे घोटी परगणे भोसे व मौजे आकोलें परगणे टेंभुरणी यांसीं आनंदीबाई कोम खंडभट फुलबडवे जोशी देहाये मजकूर सुहूर सन खमस खमसेन मया व अलफ सन ११६४ कारणें कागद लिहून दिला ऐसाजे, तुमचा आमचा मूळ पुरुष जीऊभट यासी तिघे पुत्र वडील मल्हारभट, दुसरा विठ्ठलभट, तिसरा नरसिंहभट याचा विस्तार बीतपशील:—वडील पुत्र मल्हारभट त्यास पुत्र नारायणभट याचें नकल झालें.

दुसरा विठ्ठलभट त्यास पुत्र जिऊभट. याचें नकल झालें.

तिसरा नरसिंह यासी पुत्र दोघे. वडील गोविंदभट, धाकटा लक्ष्मणभट. यांचा वंश:—

गोविंदभट याचा पुत्र रंगभट, याचा खंडभट आपले भ्रतार. याचें नकल झालें.

दुसरा लक्ष्मणभट, यास पुत्र येमभट, याचा हणमंतभट, यांसी पुत्र चौघे.

१ वडील आपभट, त्याचे पुत्र तुह्मी मल्हारभट.

१ दुसरे निंबभट तुह्मी.

१ तिसरे गोपाळभट ब्रह्मचारी झाले आहेत.

१ चवथे तुह्मी बाळंभट.

—

४

येणेंप्रमाणें वंशावळ आहे. त्यास अवघ्यांचे बुडालें; येमभटाचा वंश तुह्मी तिघेजण आहां. तुमचा आमचा वंश एक. वतन सदरहु चार गांव समाईकच होतें. नारायणभट निराळा निघाला तेव्हां मौजे पऱ्हेते मौजे घोटी निमे चालवीत होता. बाकी अडीच गांव राहिले ते समाईकच होते. त्यावरी जिऊभट मृत्यु पावले. त्यांचें बुडालें. मग निमे घोटी व मौजे बेंबलें खंडभट आपले भ्रतार चालवीत होते. मौजे आकोलें तुमचा बाप हणमंतभट चालवीत होते. त्यास नारायणभटाचें बुडालें. तेव्हां तोही दीड गांव खंडभट आपले भ्रतार चालवूं लागले. त्याजवरी आपले भ्रतार खंडभट मृत्य पावले. त्याचें नकल झालें. त्याचें उत्तर कार्य तुह्मी केलें. व आपलें संगोपन करीत आहां. सदरहु चारी गांवचें वतन तुमचें आमचें अवघ्यांचें होतें. त्यांशीं आमचें बुडालें. वतनाचे धनी तुह्मी आहां. सुखरूप चहुगांवचें वतन अनुभवून खाणें. हा कागद लिहून दिला. सही." बीकलम वेंकाजी केशव देशपांडे परगणे मंगळवेढें.

सुभाना दासीपुत्र याचा कागद.

"शके १६७६ भावनाम संवत्सरे माघ शुद्ध चतुर्थी गुरुवासर ते दिवशीं मातोश्री आनंदीबाई याचा पुतण्या बाळंभट बिन हणमंतभट फुलवडवे जोशी मौजे बेंबलें परगणे करकंब वगैरे गांव महालानिहाय यांशीं सुभाना दासीपुत्र निसबत मजकूर सन ११६४ कारणें कागद लिहून दिला, ऐसाजे. तुमचें वतन मौजे मजकूर व मौजे घोटी निमे परगणे भोसे एकूण गांव दीड व नारायणभटाचे गांव मौजे पऱ्हेते व निम घोटी प्रांत भोसे एकूण गांव दीड. यास नारायण भटाचें बुडालें. मग तिन्ही गांव खंडभट खाऊं लागले. खंडभट मेल्यावरी मी तुमचा दासीपुत्र वतन चालवूं लागलों. त्यासी तुह्मास ते गोष्टी मानेना. ह्मणून मौजे बेंबले तुमचे हवालीं केलें. निमे घोटीचें जोतिषपण नारायणभटाचे विल्हेचें आपण चालवीत होतों. त्यास तें वर्तमान श्री. रा. पंत प्रधान साहेबांस कळल्यावर त्यांहीं मजला हुजूर आणिलें. त्यावरी वर्तमान पुसिलें तेव्हां आपण सांगितलें कीं, आपण याचे वतनाशीं वारशी करीत नाहीं. मालक खावंद उभयतां आहेत. यांणीं वतनें सुखरुप खावीं असें बोलोन हा कागद लिहून दिला असे. तुमचीं वतनें तुह्मीं खाणें. आपणास तुमच्या वतनांशीं व नारायणभटाचे वतनाशीं संबंध नाहीं. हा कागद लिहून दिल्हा बीतपशील."

येणेंप्रमाणें कागद मनास आणितां तुमचा व खंडभटाचा व नारायणभटाचा वंश एक. त्यांचें बुडालें. दरोबस्त वतनाचें धनी तुह्मीच आहां. हें जाणून तुह्मास निवाडपत्र सादर केलें असे. तरी तुह्मी त्रिवर्ग सदरहु चारी गांवचें जोसपण पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून सुखरूप राहणें.

वतनसंबंधे तुमचे माथां शेरणी रुपये १०१ एकशेएक करार केली असे. सदरहुचा वसूल सरकारांत देऊन वतन अनुभवून सुखरूप राहणें. जाणिजे छ. १२ रबिलावल.

१ ऐन निवाडपत्र.

१० ये विषयीं ताकीद पत्रें सदरहु प्रमाणें.

४ गांवगन्ना.

१ मौजे आकोलें परगणे टेंभुरणी.

२ परगणे भोसे.

१ मौजे पऱ्हेते.

१ मौजे घोटी.

—

२

१ मौजे बेंबले परगणे करकंब.

—

४

३ वर्तमान भावी कमाविसदार यांसी.
　　१ परगणे करकंब.
　　१ परगणे टेंभुरणी.
　　१ परगणे मोसे.
　　―
　　३

३ देशमूख व देशपांडे यांसी.
　　१ परगणे करकंब.
　　१ परगणे टेंभुरणी.
　　१ परगणे मोसे.
　　―
　　३
―
११

इ. स. १७५६-५७.
**सब्बा खमसेन मया व अलफ.**
जमादिलावल २२.

[ ४५ ] नरहर लक्ष्मणराव कमाविसदार परगणे शेवगांव यास सनद कीं, यशवंतराव व्यंकटेश व बापूजी गोपाळ पाटील मौजे भाटेपुरी, परगणे रांजणी या हरदुजणांचा मौजे मजकूरचे मोकदमीचा कजिया होता. त्यास मौजे मजकूरची मोकदमी सालगुदस्ता सरकारांत जप्त केली होती. त्यास हरदुजणांचा इनसाफ मनास आणून निवाडपत्र करून देऊन जप्ती मोकळी करून यशवंतराव व्यंकटेश याजकडे सरकारची नजर करार केली. सालबंदी. रुपये.

१००० सन सब्बा खमसेन साल मजकूर.
१००० सन समान खमसेन.
१००० सन तिस्सा खमसेन.
१००० सन सितेन.
१००० सन इहिदे सितेन.
―――
५०००

येणेंप्रमाणें पांच हजार रुपये सरकारची नजर करार केली असे. तरी सदरहु सालाचें सालांत चैत्रमासीं घेऊन सरकारचे हिशेबीं जमा करीत जाणें ह्मणोन सनद १. रसानगी यादी.

---

A. D. 1756-57.

( 45 ) A dispute regarding the Patilki Watan of Bhatepuri in Pargana Ranjani ( Shewagaon) was decided, and the Watan was released from attachment and a nazar of Rs. 5,000 was levied.

[ ४६ ] मानसिंग जाट व मखणीमल व त्रिंबकदास वगैरे पेट कादराबाद कसबे जालनापूर यास निझाम अल्लीखान यांणीं सिंदखेडास जातेसमयीं जमादार परगणे मजकूर याच्या सांगितल्यावरून लष्करास धरून नेलें. बसवून पैका द्या ह्मणोन सक्त तगादा केला. नाहीं तर गांव लुटितो. तेव्हां समस्त साहुकार रयत यांणीं गांव वाचवा असा मनसब सर्वांही मिळोन समापत्र केलें.

इ- स. १७५९–६०.
सितेन
मया व अलफ.
रमजान १०.

आणि जाटास लिहून पाठविलें कीं, पैकी पडेल तो देऊं. त्यावरून जाटांनीं मोगलाशीं खंडणी करून निशा करून दिल्ही. गांवास येऊन पैका गांवकरी यांणीं द्यावा. ते लबाडीस आले. पट्टी राहिली. याकरितां आज दोन वर्षे मानसिंग वगैरे हुजूर आले आहेत. मनास आणितां वाजवी गांवकरी यांणीं रुपये द्यावे. त्याप्रमाणें हल्लीं पट्टी करावयाचा करार मोंगलास दिल्हे रुपये ६४५६२ चौसष्ट हजार पाचशे बासष्ट ऐन, सदरहूचें व्याज इस्तकबिलापासून ऐवज वसूल होईल तों पावेतों हिशोबाप्रमाणें व सरकारची नजर पट्टीची आज्ञा दिली. सबब ऐन सरकार ५००० रुपये, सखाराम भगवंत याचे १०००, एकूण साहा हजार व मोगलास दिला तो एवज व व्याज होईल तें गरीबगुरीबांखेरीज करून वसूल करणें. त्यापैकीं मानसिंगाचा ऐवज मुदल व्याज त्यास देणें. साहाहजार रुपये सरकारचे हिशेबीं जमा करणें. या कामास × × पाठविले आहेत. याचे गुजारतीनें पट्टीचें काम करणें ह्मणोन यादवराव मोरेश्वर यास पत्र १.

---

( 46 ) Nizam Alikhan, while on his way to Sindkheda, took Mansing Jat, Makhnimal and Trimbakdas &c. of Pet Kadarabad in Kasba Jalnapur to his Camp at the instance of the Jamidars ( District Hereditary officers ) of the province, pressed them hard for money, threatening that in case of non-payment the village would be pillaged. The Sowkar's ryots after consultation among themselves, drew up a deed, and wrote to the Jat ( Mansing ) that they would re-imburse him for the amount that he might be required to pay to the Nizam. The Jat accordingly settled the amount of the contribution, and gave security for it to the Mogal. On his return to the village, the villagers turned round, and refused to raise the money. Mansing and others have for this reason come to the Huzur. Considering that the villagers are bound to pay the money, permission is given to levy Rs. 64,562, the amount paid to the Mogal, together with interest on it till the date of recovery, and Rs. 6000 on account of nazar for permitting the levy (Rs. 5000 for government, and Rs. 1000 for Sakharam Bhagwant. ) The whole of this amount should be recovered from all the villagers excepting the poor, and out of it Rs. 64,562 with interest should be paid to Mansing and Rs. 6000 should be credited to Government.

[ ४७ ] शंकराजी केशव यास पत्र कीं, येशवंतराव व्यंकटेश पाटील मौजे भाटेपुरी परगणे रांजणी याजकडे पाटीलकीचें कजिया बाबत सन सबांत रुपये ५००० पाच हजार सरकारची नजर करार करून निवाडपत्र करून दिल्हें. नजरेचे ऐवजाची हस्तेबंदी करून रा. नरहर लक्ष्मणराव यांजकडे वसुलास दिल्हें हौत. त्यापैकीं दीडहजार रुपये वसूल झाले. बाकी ऐवज येणें हस्तेबंदी रुपये

इ. स. १७६०–६१.
**इहिदे सितैन मया व अलफ.**
मोहरम १०.

१००० सन सितैन.
१२५० सन इहिदे सितैन.
१२५० सन इसने सितैन.

३५००

येकूण साडेतीन हजार रुपये येणें. याकरितां पाटील मजकूर हुजूर आणून अटकेंत ठेविला होता. त्यास ऐवज द्यावयास सामर्थ्य नाहीं. याकरितां पाटीलकीचें वतन सरकारांत जप्त करून पाटील मजकूर यास निरोप दिल्हा असे. तरी तुह्मीं सदरहू मौजे मजकूरचें पाटीलकीचें वतन कुल शेतभात हकइनाम असेल तें सरकारांत जप्त करून सदर्हू साडेतीन हजार रुपये वसूल घेऊन सरकार हिशेबीं जमा करणें ह्मणोन सनद.

रसानगी हिशेब मखलाशी हिशेब.

[ ४८ ] महादशेट व गोंदशेट वलद हरशेट सोनार देवरुखकर यांणीं हुजूर विदित केलें कीं, माहाल देवरूख कसबें मजकूर प्रांत राजापूर येथील पोतदारीचें वतन सुदामत पूर्वापार आपलें आहे. त्यास आपले वडील परागंदा झाले. गांवीं कोणी नव्हतें. तेव्हां बाबाशेट मुक व गोंदशेट या हरदुजणांचे वडील कसबें मजकुरीं येऊन राहिले. आणि गांवचें पोतदारीचें कामकाज करूं लागले. कदीम वतनदार नाहीं. सबब पोतदारी चालवून हक्क उत्पन्न अनभविलें. याउपरी आमचे वडील पंचवीस तीसवर्षांनंतर कसबें मजकुरीं आले. आणि हरदुजणांस दोहीदुराई केली. ते समयीं प्रांत मजकूरची हकीमी गंगाधर पंडित प्रतीनिधी यांजकडे होती. सबब विशाळगडीं फिर्याद

इ. स. १७६०–६१.
**इहिदे सितैन मया व अलफ.**
रबीलावल २.

(47) A dispute regarding the Patilki Watan of Bhatipuri in Pargana Ranjni being decided, a Nazar of Rs. 5000 was imposed on the Patil. He failed to pay the amount and was therefore imprisoned. His Watan was attached and orders were issued for the recovery of the Nazar from its proceeds.

A. D. 1760-61.

(48) A Potadar was absent from his village for about 25 or 30 years; and another man was doing the duty of the Watan during that period. The Watandar having returned to the village, a dis-

A. D, 1760-61.

झालें. हरदुवादी यांचा इनसाफ पेष केला. त्याप्रमाणें पंडित मशारनिल्हेनीं पत्रें करून दिल्हीं. दोन चार वर्षे भोगवटाही चालला. उपरांतिक कागदपत्र होते ते सावताचे धामधुमींत गळाठले हें लौकिकास आलें. तेव्हां मागती बाबाशेट व गोंदशेट यांणीं कजिया केला. त्यानंतर मागती विशाळगडास गेलों. तेथें श्रीमंत अमृतराव पंडित प्रतिनिधी याणीं पूर्वील मजकूर मनास आणून ताकीदपत्रें दिलीं. त्या समयांत सरकारतर्फेचे रा. खंडोजी माणकर त्या प्रांतीं गेले. त्यांजकडे बाबाशेट व गोंदशेट जाऊन त्यांचा आश्रा करून मागती लबाडी करूं लागले. तेव्हां आपण पुण्यास येऊन साहेबांकडे फिर्याद जाहाले. सरकारांतून ताकीदपत्र मसाला करून ढालाईत पाठवून हरदुजणांस हुजूर आणिलें. सरकारचे हुकुमाप्रमाणें पंचाइतांनीं मनसबी हुजूर केली. बाबाशेट व गोंदशेट मुळे खोट जाहाले, व त्यांचे कागदपत्र होते तेही लटके जाहाले. उपरांतिक हरदुजण काईल होऊन आपले खुष रजावंदीनें येजित खत लिहून दिलें. तें व जिन्नम आपणापाशीं आहे व सविस्तर वृत्त रा. त्रिंबकराव मामास ठाऊक असे. गांवांतून ते हरदुजण गेले. परंतु कधीं कधीं येऊन फिसादीच्या गोष्टी बोलतात येविषयीं ताकीद झाली पाहिजे ह्मणोन. त्यावरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे. तरी हरदु वादी यांची मनसबी हुजूर होऊन बाबाशेट व गोंदशेट देवरूखकर यांस लिहून दिल्हे आहे. असें असतां कदाचित ते लबाडीस आले तरी त्यांस कैद करून हुजूर पाठविणें आणि यांचें वतन पोतदारीचें पहिल्या चालीप्रमाणें यांजकडे चालवणें. दरह्मैस पालक [ ? ] पडत असेल त्याप्रमाणें देणें. मानपान चालत असेल त्याप्रमाणें यथास्थित चालवून पोतदारी सेवा महाल मजकूर देखील कसब्याची यांचे हातें ते घेण्यास ते पहिल्यापासून चालत असेल त्याप्रमाणें चालवणें ह्मणून मोरोजी शिंदे नामजाद तालुके रत्नागिरी यांस पत्र १.

सदरहुप्रमाणें जमीदार तर्फ मजकूर याचें नावें. —

२ चिटणिस

[ ४९ ] मौजे हिवरे बुद्रुक तर्फ हवेली प्रांत जुन्नर येथील पाटीलकीच्या कजियामुळें तुह्मी पाटीलकी जप्त केली आहे. त्यास पाटीलकीचा इनसाफ मनास आणावयास नारो बाबाजी यांस आज्ञा केली. पाटीलकीची जप्ती मोकळी केली असे. तर सुदामत प्रमाणें चालवणें ह्मणून हरी दामोदर यास पत्र १.

इ. स. १७६०–६१.
इहिदे सितैन मया व अलफ.
रबिलावल ५.

---

pute arose regarding the Watan, was decided in the Watandar should persist in troubling the Watandar, he should be arrested and sent to Poona.

( 49 ) Hari Damodar ( officer of Prant Junnar ) was informed that the adjudication of a dispute regarding the Patilki Watan of Hivre BK in Taraf Haveli of Prant Junnar was entrusted to Naro Babaji ( officer of another Province ) and was directed to remove the attachment he had placed on the Watan.

A. D. 1760-61.

[ ५० ] बाबुराव हरी कमाविसदार तर्फ हवेली संगमेनर यांस पत्र कीं, बाळोजी बिन नंदराम रघबनसी वस्ती कसबें संगमनेर हा मृत्यु पावला; त्याच्या बायका दोघी व आई व चुलत चुलता व दोघी लेकी याप्रमाणें आहेत. असें असतां तुह्मीं वारसदार नाहीं ह्मणोन घर जप्त केलें ह्मणोन हुजूर विदित झालें. ऐसेयाशी त्याची आई व बायका वगैरे माणसें असतां घर जप्त करावयास प्रयोजन काय ? हल्लीं हें पत्र सर सादर केलें असें. तरी सदरहूप्रमाणें असल्यास घर जप्त न करणें. वारीसदाराचे हवालीं करणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७६०-६१.
इहिदे सितैन मया व अलफ
जिलकाद १३.

बाळाजी महादेव सरसुभा यास सदरहू प्रमाणें पत्र १.

[ ५१ ] नारो त्रिंबक तालुके विजेदुर्ग यांस पत्रकीं हरभट व बाळंभट परांजपे वस्ती मौजे जुवाट तर्फ खारेपाटण यांणीं हुजूर विदित केलें कीं, मौजे मजकुरीं कुवेसकराचें ठिकाण आहे. तें बहुत दिवस कुणबाव्यानें आपणाकडे आहे, त्यास तें ठिकाण आपलें ह्मणोन हरी बाबाजी कजिया पेशजी करूं लागला. ते आपण फिर्याद हुजूर झालों. सरकारांत वर्तमान मनास आणतां कुवेसकराचें ठिकाण आपलेकडे चाळीस पन्नास वर्षें आहे याप्रमाणें खरें झालें. तेव्हां तूर्त ठिकाण परांजपे यांजकडे चालतें त्याप्रमाणें चालों देणें. पेस्तर इनसाफ जाहालियावरी आज्ञा करणें ती केली जाईल. याप्रमाणें पत्र नारो त्रिंबक यांस नेलें. त्याबरहुकूम ठिकाण आपलेकडे चालत असतां आलीकडे हरी बाबाजी यानें मशारनिल्हेस वाजवी असेल तें करणें असें पत्र नेलें; याजवरून इनसाफ न करतां आपणाकडील ठिकाण काढून हरी बाबाजीस दिल्हें; याजकरितां ताकीद झाली पाहिजे ह्मणोन. ऐशास मनसुभी जाहालियावरी ठिकाणाची आज्ञा करणें ती केली जाईल. याप्रमाणें हुजूर करार जाहला असतां

इ. स. १७६०–६१.
इहिदे सितैन मया व अलफ.
सफर १४.

---

( 50 ) A man in Sangamner having died, leaving a widow and daughters but no son, the Kamavisder confiscated his property as ownerless. The order was set aside by the Peshwa as improper.

A. D. 1760-61.

( 51. ) Hurbhat and Balambhat Paranjpe were, for a long time, in possession of a field belonging to the Kuweskar at Juwat in Tarf Khare Patan, Hari Babaji having obstructed them, they complained to the Huzur. It was then proved that Paranjpes had been in possession of the field for 40 or 50 years; and orders were issued to Naro Trimbak to continue the field to them pending final decision. Hari Babaj subsequently obtained a letter to Naro Trimbak directing him to do what was proper, and acting on that letter and without any inquiry, the latter made over the field to the former. ( Hari Babaji ). The Paranjpe having again complained to the Huzur, Naro Trimbak was reprimanded for his action and was directed to restore the field to the Paranjpes pending final decision. It was further represented to Government that

A. D. 1760-61.

तुह्मीं इनसाफ न करितां ठिकाण हरी बाबाजीस दिल्हें हे गोष्ट कार्याची नाहीं. हल्लीं हें आज्ञापत्र सादर केलें असें. तरी पेशजी पत्र सादर आहे त्या बरहुकूम ठिकाण परांजपे यांजकडे चालवणें. दरम्यान घालमेल न करणें. पेस्तर इनसाफ जहाल्यावर आज्ञा होणें ती होईल. तदनुरूप वर्तणूक करणें व परांजपे व विठ्ठलभट ताह्मनकर यांणीं जुन्या ठिकाणदारांचीं नांवें सांगितलीं इतकाच अन्याय ठेवून गुन्हेगारी घेतली असली तरी फिरोन माघारी रुपये देणें. रुपयांचे मजकुरांत कांहीं कमपेश असेल तरी वर्तमान हुजूर लिहून पाठवणें ह्मणोन चिटनिशी पत्र १.

[ ९२ ] मायाजी बिन संभाजी पांगोरा पाटील मौज दुवेलें तर्फ खोंडबारे याचा व विठोजी बिन नामाजी व रखमाजी बिन संताजी बोटे पाटील मौजे कुंभोसी तर्फ मजकूर याचा ठेवण्याचा कजिया होता. त्याचा इनसाफ सचीव पंतांनीं करून निवाडपत्र करून दिल्हें त्याप्रमाणें सरकारांतून निवाडपत्र व आबादीचा कौल लिहून चिटणिशी करून दिल्हा त्याची नक्कल दप्तरीं ठेविली असे.

इ. स. १७६०–६१.
इहिदे सितेन
मया व अलफ.
सफर २४.

[ ९३ ] देवाजी जिवाजी याणीं हुजूर विदित केलें कीं, सालगुदस्ता आपला भाऊ कान्होजी जगदळे याजबरोबर दिवाणगिरी करून हिंदुस्थानांत चाकरीस गेले. समागमे बायको नेली. त्यास कार्तिकमाशीं ज्वराची व्यथा होऊन मृत्यु पावले. स्त्रीनें सहगमन केलें. पोटीं संतान नाहीं. जाते समयीं घरीं पाटणीयांत बायकोची बहीण ठेविली. तिच्या हवालीं वस्तभाव खतें पत्रें नग नगोटे वगैरे केले. त्यास लष्कराहून माणूस आलियावरी आबाजी अनंत देशपांडे बायकोचे भाऊ याणीं वस्तभाव खतें पत्रें नग नगोटे घेऊन गेले. आपणास वर्तमान कळलियावर पाटणीयास आलों; तों वस्तभाव देशपांडे मजकूर याणें नेली. मागावयाशीं गेलों. देईना. याजकरितां ताकीद झाली पाहिजे. त्यावरून काशी जिवाजीचे पोटीं संतान नाहीं सबब देशपांडे मजकूर याजकडे वस्त

इ. स. १७६०–६१.
इहिदे सितैन
मया व अलफ.
जमादिलाखर ५.

---

Naro Trimbak had levied from the Paranjpes and Vithal Bhat Tamhanker, a fine of Rs. 125 for disclosing the names of the former owners of the field Naro Trimbak was informed that if the fine was levied on the above ground alone, it should be refunded and that if the facts in regard to the fine were otherwise, they should be reported to Government.

( 52 ) A dispute regarding the Patilki Watan of Duwala in Tarf Khedbare was decided by the Pant-Sachiv, and a decree was passed. An order confirming the said decree was passed by the Peshwa.

A. D. 1760-61.

( 53 ) Dewji Jiwaji accepted the office of Diwan under Kanoji Jagadale and went into Hindustan ( upper India ), taking his wife with him. He died of fever, and his wife immolated herself on his pyre, entrusting the family property to the charge of her sister. The property was then removed by her brother. Dewji had no son, and his brother having

A. D. 1760-61.

नगनगोटे वगैरे जें असेल तें चौकशीनें आणून निमें सरकारांत घेऊन निमें देवाजी जिवाजी यास देणें ह्मणोन कृष्णाजी विश्वनाथ यांस चिटाणिशी पत्र १.

इ स. १७६०–६१. इहिदे सितैन मया व अलफ. साबन ११

[ ९४ ] वासुदेव जोशी बिन लिंगजोशी यांहीं विदित केलें कीं, आमचा व गंगाधर जोशी बिन नारायण जोशी याचा कसबें वांई व जोरेंखोरें वगैरे येथील ज्योतिषपणाच्या वतनाचा कजिया होऊन पेशजी हरदोजण मनसुबीस हुजूर आलों आणि आपलाली तकरार लिहून दिल्ही. त्यावरून हरदोवादी यांचा ठराव व जमीदाराचे साक्षीवरून निवाडीयांसी रजावंद होऊन वर्तवावयाचे जामीन दिले. त्याप्रमाणें गंगाधर जोशी हजीर होऊन फडशा करून घेत नाहीं. गैरहजीर होतात. आह्मीं स्वारीबरोबर आज पांच वर्षें फिरत आहों, आणि कजिया निवडला नसतां वतनाचा उपभोग वाद्याकडे चालतो. तेव्हां खरी साक्ष यथास्थित पडणार नाहीं. याजकरितां वतन अमानत ठेऊन निवाडा करावा ह्मणोन. त्यावरून तुह्मांस हें पत्र सादर केलें असें. तरी वासुदेव जोशी मनसुबीबद्दल फिर्याद पांच वर्षें झाले, आणि हमेषा हजीर असतां गंगाधर जोशी यास गैरहजीर असावयाशी कारण काय ? व काजिया निवडला नसतां एकाच वाद्याकडे वतन चालविल्यास सडी साक्ष पडणार नाहीं. याजकरितां जोतिषपणाचें वतन अमानत करून तिऱ्हाईत ब्राह्मणाकडून कार्य प्रयोजन चालवून उत्पन्न येईल तें अमानत ठेवणें. पेस्तर मनसुबीचा निवाडा जाहलीयावरी ज्याचें वतन होईल त्याचे हवालीं केलें जाईल ह्मणोन हैबतराव भवानीशंकर याचे नांवें सनद १.

इ. स. १७६०–६१. इहिदे सितैन मया व अलफ. साबान १८.

[ ९९ ] देवभट बिन रामभट जोशी मौजे सावरगांव परगणे पाथरी याणीं हुजूर विदित केलें कीं मौजे चिंचोली व अलूर व मौजे नेरली परगणे मुधोळ येथील जोशीपण नानभट बिन बाळंभट धनवार याचें होतें. त्यास त्याचें नकल झालें. अवलाद अफलाद दाइज अगदीं नाहीं. यास्तव तेथील जमीदार येसाजी वलद संगशेट, रामाजी वलद साबाजी देशमूख, व मेघःशाम नानाजी देशपांडे परगणे मजकूर यांणीं आपणापासून रुपये साठ ६० घेऊन सदरहू तिन्ही

---

applied to the Peshwa, half the property was ordered to be given to him. The other half was taken by Government.

A. D. 1760-6 .

( 54 ) Wasudev Joshi of Wai represented that in connection with a dispute relating to the Joshi Watan, he was moving with the camp for 5 years, but that owing to the failure of the defendant to appear, the disput had remained undecided, and prayed that the Watan might be attached. Order for attachment was issued.

A. D. 1750-51.

( 55 ) Presents recovered at marriages and other festive ceremonies at the houses of Lingayat Baniya's in the Pargana of Pathari, used to be divided in equal portion between the Jangams and the Joshis. The Jangams, at the instigation of the Jamidars, claimed half-share in the presents received at the houses of all the Baniyas and Shudras. A com-

गांवचे जोशीपणाची वृत्ती सन ११६६ मध्यें करून देऊन पत्रें करून दिल्हीं आहेत व महजरही करून दिल्हा. त्यास, मुधोळ परगणीयांत जंगम याची चाल वाणी लिंगाइत याचे घरचे लग्न मुहूर्ताचें अमीष जंगमानीं निमें घ्यावें व निमें जोशांनीं घ्यावें अशी चाल आहे. त्याप्रमाणें या तिही गांवचीही पुरातन चाल आहे. असें असतां हल्लीं जमीदार यांणीं जंगमांचा पक्षपात धरून वाणी व शूद्र वगैरे ब्राह्मणांखेरीज वरकड जातींचें अमीष जंगमांस निमें द्यावें असें ह्मणतात. त्याचे बळें जंगम आपणासीं भांडतो. तरी येविषयीं ताकीद जाहली पाहिजे ह्मणोन. त्याजवरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे. तरी पुरातन चालत आलें आहे त्याप्रमाणें चालवणें ह्मणोन चिटनिशी पत्रें:——

१ कमासविसदार वर्तमानभावी परगणें मुधोळ सरकार नांदेड यास कीं परगणे मशारनिल्हेचे जमीदारास तिही गांवांस ताकीद करून जंगमास वर्तवणें.
१ मोकदम मौजे अलूर परगणे मजकूर.
१ मोकदम मौजे नेरली परगणे मजकूर.
१ मोकदम मौजे चिंचोली परगणे मजकूर.
१ देशमुख व देशपांडे परगणे मुधोळ सरकार नांदेड.
५ एकूण पांच पत्रें.

## (ब) फौजदारी.

### (अ) काम चालविण्याच्या पद्धतीबद्दल हुकूम.

[ ५६ ] चिंतामण जोशी सरवदा वस्ती पेण याणें हुजूर येऊन विनंति केली कीं, आपले जातीस घरठाण व कोणी बदमल केला, या कांहीं कजिया झाला तरी आमचा आह्मीं वारू, व दिवाणांतून तगादा न लावावा अशी चाल आहे त्याप्रमाणें चालतें, परंतु साहेबांचें अभयपत्र असावें ह्मणोन. त्याजवरून हें पत्र सादर केलें असे. तरी जी चाल चालत आली त्याप्रमाणें तुह्मी चालवणें. नवीन तुह्मास उपसर्ग कोणीही लावणार नाहीं ह्मणोन अभयपत्र नफर मजकुराचे नांवें दिलें असे.

इ. स. १७४७–४८.
समान आर्बैन मया व अलफ.
जिल्हेज २७.

पत्र १.

---

plaint was made to the Peshwa. It was ordered that the old practice should be followed.

## (B) Criminal.

(56) Chintaman Joshi Sarwada of Pen represented that it was customary to exempt his caste people from house tax, and to allow them to settle among themselves the offences of adultery and asasult, and prayed that a deed of assurance for continuing the privileges should be given. His request was complied with.

A. D. 1747-48.

[ ९७ ] बाळाजी महादेव ओक याचें नांवें सनद कीं वेदमूर्ति राजश्री दादभट धर्माधिकारी

इ. स. १७५४–५५.
खमसखमसेन
मया व अलफ.
जमादिलाखर ३.

नाशिककर यांचे घरीं चोरी झाली, त्यावरून भटजीनीं तुह्मास येऊन सांगितलें कीं चोरीचें ठिकाण लावून ऐवज आमचा एक हजार रुपयांचा गेला आहे तो आमचा आह्मास देववावा. त्यावरून तुह्मी चोरीचें ठिकाण लावून ऐवज एक हजार रुपयांचा गेला होता तो आणवून सरकारची चौथाई रुपये २९० अडीचशें घेऊन बाकी साडे सातशें रुपयांचा ऐवज देत होता ह्मणून भटजीनीं हुजूर येऊन विदित केलें. त्यावरून सदरहु अडीचशें रुपये चौथाई माफ केली असे. तरी भटजीचे नांवें अडीचशें रुपयांचा धर्मादाय खर्च लिहून सदरहू एक हजार रुपयांचा ऐवज दागीने वगैरे जें असेल तें पावतें करून पावलीयाचें कबज घेणें ह्मणोन सनद १.

## ( व ) गुन्हे.

### ( १ ) फंदफितुरी व राजद्रोह.

[ ९८ ] बचाजी रघुनाथ यांणीं किल्ले पावागड दुसरीयास द्यावयाचें राजकारण केलें होतें;

इ. स. १७४९–५०.
खमसेन
मया व अलफ.
जिल्हेज १४.

त्याज बराबरी लोक गेले होते. ते ठिकाणीं लावून त्यास धरून आणावया निमित्य हुजूर स्वार पाठविले. परंतु ते पळोन गेले. कोणी सांपडलें नाहीं. त्याचे कबिले व मुलें सांपडलीं तीं हुजूर आणिलीं. तीं छ मजकुरीं जामीन घेऊन जामिनाचे हातीं दिल्हीं बरहुकूम जामीन जाबिता:—

कित्ता असामी

१ विठोजी गावडे याची बायको सुर्याजी येवले याची ध्याडी.

९ गोंदजी भोईर याचीं माणसें.

२ मूल लेक
२ लेकी
१ बायको
९

कित्ता असामी

६ त्रिंबकजी पावशा पळोन गेला त्याचा भाऊ व माणसें

१ तानाजी पावशा भाऊ
१ बायको
३ मुलें तानाजीचीं
१ आई
६

---

( 57 ) Out of the stolen property recovered through the instrumentality of Government, a fourth portion ( or its value ) was required to be surrendered to Government. In the present case, the person whose property had been stolen was a priest, and the whole of the property recovered was therefore ordered to be restored to him.

A. D 1754-55.

( 58 ) Bachaji Raghunath entered into a conspiracy for the surrender of the fort of Pawagad. Sawars were sent to trace and arrest his followers. They absconded. Their families (wife, mother, children brothers, sisters, and sister's children ) were brought to the

A. D, 1749-50.

२ बाबाजी भोईर याचीं माणसें

१ मूल

१ बायको

२

—

८

सदरहू आठ असामींस जामीन नाभ भोईर चाकर किल्ले राजमाची वस्ती मौजे आवढे तर्फ नाणेंमावळ. १ जगन भोईर याशी जामीन यमाजीराव आलद व देवजी साळोखे चाकर सरकार. कित्ता धावजी कुंभार याचीं माणसें.

१ आई.

१ भाऊ

२

सदरहु दोघांस जामीन कृष्णाजी शिंदे चाकर सरकार वस्ती मौजे परसुलें तर्फ वाडें १. कृष्णाजी शिंदे याशी जामीन यमाजी आलद १.

९ रामाजी झेसे याचीं माणसें

१ आई

१ बायको.

१ भाऊ.

२ मुलें.

—

११ ९

सदरहू अकरा असामींस जामीन वाघोजी शिंदे चाकर सरकार किल्ले विसापूर वस्ती किल्ले मजकूर १. वाघोजी शिंदे किल्ले विसापूर १ कित्ता धावजी कुंभार याच्या बहिणी व मुलें.

१ बहिणी

१ मूल थोरले बहिणीचा

२

दसरहु तीन असामींस जामीन कृष्णाजी नाईक जाधव चाकर किल्ले राजमाची. कृष्णाजी नाईक जाधव याशी जामीन नारो त्र्यंबक सबनीस किल्ले राजमाची १.

एकूण सदरहू जामीन सदरहुप्रमाणें असों. जें वेळेस साहेब हुकूम करतील ते वेळेस कबीलें हजीर करून देऊं. हजीर न करूं तरी त्याचे निसबतीचा जाब करून देऊं हें लिहून दिल्हें सही.

सदरहुप्रमाणें जामीन कतबे लिहून घेऊन सदरहूप्रमाणें जामिनांच्या हवाला केलीं असेत. जामीन कतबा दफ्तरीं विल्हेस लाविला असे.

---

Huzur, and were required to furuish sureties, to whom they were then handed over for production when ordered.

[ ५९ ] त्रिंबकराव सदाशिव दिमत सदाशिव दामोदर पथक यास पत्र कीं रूपसिंग भोसले याणीं परगणे ह्मसे सरकार नांदेड येथें दंगा करून माहालाची खराबी केली. सरकारचीं ठाणीं व कमाविसदार उठविले. तेव्हां बाळाजी महिपतराव कमाविसदार मोकाशी परगणे मजकूर याणीं सुरेराव शेळके यांस कुमकेस आणून रूपसिंग भोसले याचें पारिपत्य केलें. त्यांनीं ठाणींठुणीं घेतलेलीं सरकारचे कमाविसदारांनीं घेऊन आपला सरकार अंमल बसविला. रूपसिंग भोसले पळोन घोगरीस ठाणींयांत जाऊन बसले. उपरांतिक तुह्मी जाऊन त्यास कोंडून घोडीं उंटें हत्यारें वगैरे चीजवस्त त्याची तुह्मी घेतली ह्मणोन हुजूर विदित झालें. ऐशियास सदरहु वस्तभाव हत्यारें घोडीं उंटें हुजूर आणविलीं असत. याजकरितां हें पत्र तुह्मास सादर केलें असे. व महिपतराव प्रल्हाद कारकून दिमत हुजरात पाठविले असे. तरी त्यांचीं उंटें घोडीं हत्यारें वस्तभाव तुह्माकडे आली असेल ती व गोपाळ केशव व पद्माकर कृष्ण वगैरे यांजकडे असेल ती कुल जराबजरा मशारनिल्हेच्या हवालीं करून पावलीयाचें कबज घेणें. या कामांत सरकारचे ढालाइत पाठविले असेत. यांचे मारफतीनें सदरहु लिहिल्याप्रमाणें यांचे स्वाधीन करणें. रूपसिंग भोसले यांस हुजूर न पाठविणें. जेथें आहेत तेथेंच मजबुदीनें ठेवणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७६०–६१.
**इहिदे सितैन मया व. अलफ.**
जिलकाद १५

कित्ता पत्र घोडीं उंटें वगैरे जें तुह्माकडे आलें असेल तें महिपतराव प्रल्हाद याचे हवालीं करणें ह्मणोन.

१ गोपाळ केशव दिमत महिपतराव कवडे यांस.
१ पद्माकर कृष्ण शिलेदार यांस.
१ शिलेदार दिमत महिपतराव कवडे यांस.
―
३

४ चिटणिशीं पत्रें.

[ ६० ] येवजी लोहट तालुके कावनई यास पत्र कीं मुजफरखान याणीं हरामखोरी केली याजमुळें त्याचे निसबतीस रामचंद्र नारायण होते, यास किल्ले मदनगडास अटकेस पाठविले आहेत. त्यास जामीन बाबुराव हरी हुजूर घेतला असेत. याजकरितां हें पत्र तुह्मास सादर केलें असे. तरी रामचंद्र नारायण यास सोडणें ह्मणोन चिटणिशी पत्र १.

इ. स. १७६०–६१.
**इहिदे सितैन मया व अलफ.**
जमादिलावल ९.

(59) Rupsing Bhosle raised an insurrection in the province of Nanded, and captured Government posts. These were afterwards recovered by the Kamavisdar. Bhosle was sent to prison. His property consisting of horses, camels, arms &c., was ordered to be sent to Poona.

A. D. 1760-61.

(60) Muzfarkhan having committed treachery, his servant Ramchandra Narayan was kept in confinement. Security was taken for Ramchandra at the Huzur and he was then ordered to be released.

A. D. 1760-61.

## ( ब ) गुन्हे

### ( २ ) खून व आत्महत्या.

[ ६१ ] मोकदम मौजे पखारे परगणे गांडापूर याणीं हरबाजी कोनेर कुळकर्णी व जोशी मौजे मजकूर याचा चुलतभाऊ बचाजी शामराज व त्याचा पुत्र असे दोघे दवरडा घालून जीवें मारून घरांतील मालमवेशी नेली यास्तव मौजें मजकूरचे पाटील सदाशिव राम व येशवंत पाटील व गणपाटील पाटे यांस हुजूर आणून मनसुबी मनास आणितां कुळकर्णी मजकुराचे खून दोन व मालमवेशी नेली हीं दोन कलमें पाटलाकडे खरी जाहालीं. याकरितां मौजें मजकूरची पाटीलकी सदरहू पाटलाची दरोबस्त होती त्यापैकीं निमे मोकदमी वडीलपण बचाजी शामराज याचा पुत्र रघुनाथ बचाजी व नारोजी व हरबाजी कोनेर कुळकर्णी जोशी यांस खुनाचे व मालमवेशीचे ऐवजी देविले त्याप्रमाणें पाटील मजकुरांनीं खुष रजावंदीनें निमें पाटिलकी वडीलपण देऊन इजित खत लिहून दिल्हें. सदाशिव राम वगैरे यांजकडे गुन्हेगारी करार करावी परंतु नादारीस्तव माफ केली ह्मणोन पत्र १.

इ. स. १७४६–४७.
**सबा आर्बैन**
**मया व अलफ.**
सफर १२.

[ ६२ ] मौजें मुडलें परगणे सुपें येथील व कोऱ्हाळें बुद्रुक परगणे मजकूर येथील शिवेचा कजिया आहे; याबद्दल तुह्मांत व कोऱ्हाळेकरांत झुंज झालें. कोऱ्हाळेकरांकडील भला माणूस एक व घोडा एक ठार झाला व तट्टू एक व वस्तभाव तुह्मांकडे पाडाव झाली हें वर्तमान कोऱ्हाळेकरांनीं हुजूर येऊन विदित केलें. यावरून तुह्मांस हुजूर आणून तुमचा व त्यांचा इनसाफ मनास आणितां गुन्हा तुमचा जाहला. कोऱ्हाळेकरांकडील खून झाला व घोडा पडला हें वर्तमान कळालें. तुह्मांकडे शाबूत झालें. त्याची गुन्हेगारी तुमचे माथां रुपये पाचशें करार केले असेत व त्यांचा तट्टू व वस्तभाव तुह्माकडे पाडाव जाहाली आहे ती त्यांची त्यांस देविली असे. तरी तुह्मी सदरहु रुपये पांचशें सरकारांतून पावलीयाचें कबज घेणें व तट्टू व वस्तभाव कोऱ्हाळेकरांची त्यांची त्यांस देऊन पावलीयाचें कबज घेणें. याउपरीं तुह्मांकडे या गोष्टीचें लिगाड राहिलें नाहीं. तुह्मी

इ. स. १७४८-४९.
**तिसा आर्बैन**
**मया व अलफ.**
रबिलावल ४.

---

(61) The Patel of Pakhare in Tarf Gandapur committed a decoity in the house of the Kulkarni, and killed him and his nephew. Half the Patilki watan with the right of seniority was therefore transferred to the son of the deceased. No fine was levied from imposed on the Patel in consideration of his poverty.

A. D. 1746-47.

(62) In a fight that took place between the villagers of Mudle and Korhale in Pargana Supe, in regard to a dispute about the boundary of the villages a respectable man of Korhale and a horse of the same village were killed. The villagers of Mudle took away a poney and some other property from the villagers of Korhale whom they

A. D. 1748-49.

कुळांचा दिलासा करून कीर्द आबादानी करून सुखरूप राहणें. अभय असे ह्मणोन मोकदम याशीं सनद १.

इ. स १७४८-४९. तिसा आर्बैन मया व अलफ. जमादिलाखर २४. [ ६३ ] मौजें पारगांव तर्फ खेड प्रांत जुन्नर येथें मखमुलाखान गोरी याचा खून शिनळकीचा आळ येऊन मारला गेला ह्मणोन मौजें मजकूरचे मोकदमास बोलावून आणून पुरशीस केली. पुरशिशीमुळें खून शाबूत जाहला नाहीं. परंतु मोकदमाकडे नजर करार केली. बरहुकूम कतबा रुपये ५००.

मुदत हंगामीं वसूल घ्यावे.

इ० स० १७४८-४९. तिसा आर्बैन मया व अलफ. सवाल २१. [ ६४ ] माणको बल्लाळ सुभेदार परगणे कर्डे रांजणगांव यास जाब लिहून दिल्हा कीं लक्ष्मणगीर गोसावी जटीळ नंगा कसबें रांजणगांव मशिदीचें याणें, भाऊ सटवोजीवा बारगीर दिमत पागा हुजूर यास जीवें मारिलें, सबब त्याची मवेशी सरकारांत आणिली ते जमा गुजारत राघो गोविंद मजमदार परगणे मजकूर.

जमापोता खुर्दा अलमगीर
रुके येणें टके १।६
रुपये ·।=

जमा जिन्नसखाना.
१ चौपटजोड जुनासुमार.
३ फासे हस्तीदंती.
१६ सोगटीं हस्तीदंती.
४ लाकडी सोगटी.
१ तिवट खारव्याची.

२४ एकूण दागीना

जमा जिरातखाना.
१ तरवार गुर्दा समेत मेण जुनें फाटकें अबनाल तहनाल नाहीं.
१ कठार नागवी.
१ सुरी लोखंडी लाकडाचे मुठीची.
१ रेजकदाणी शिंगाची.
२ शिंगाडे फुटके कामाचे नाहींत.
१ चकमक लोखंडी.
१ ढाल दुधली फिर्क्या लोखंडी एकूण.

८

---

defeated. A complaint was made to the Peshwa. It was found that the villagers of Mudle were at fault, and they were fined Rs. 2301. They were also required to pay Rs. 500 to the villagers of Korhale as the price of the horse slain, and to restor the property taken by them.

( 63 ) Makhmulla Khan of Pargaum in Tarf Khed of Prant Junnar was suspected of adultery and was murdered. The Makadam of the village was called and examined. Murder was not proved to have been committed, but a nazar of Rs. 500 was levid from the Mokadam.

A. D. 1748-49.

( 64 ) Laxmangir Gosavi who had malted hair and lived naked, of Kasba Ranjangaum Masidiche, having killed Satwaji, a trooper in the Huzur Cavalry, his property as shown below was confiscated to Government:—

A. D. 1748 49.

१ रुद्राक्षाची माळ रुद्राक्ष सुमार ८२

एकूण दागीना

——

२

जमा फरासखाना.

१ कटबंधन पांढरें.

१ जाटेजलका पांढरा जुना फाटका.

१ भगवी वळकटें २.

एकूण जाटें जुना फाटका.

——

३

जमाकोठी मुक्काम पुणें निसबत शिवराव कृष्ण.

वजन पक्कें.

०८।।।. तांबे दागीने ३

८।।१७ तांबे २

०००२ पानतुकडा.

——

०८।।।१

०००।।।१ पितळी दागीने.

२ घाटया.

१ कडें.

१ गोकर्ण.

१ सेंबी बैलाचे शिंगाची.

१ वाटी कावल.

१ चिलमीचें टकले वरील.

१ गुरगुडीची पट्टी.

——

८

एकूण.

०००४।। शिसें गोळ्या ६

एकूण.

——

०८१।।६।।।.

लोखंडी दागीने सुमार.

१ खोरें.

१ कुदळी.

१ पातें.

१ पनळी तुकडे.

१ कुळीद.

१ पळी.

१ हिलाल.

१ चिमटा.

१ नवटाकें तेलाची मापें अर्धे.

१ घाट.

२ पव्या अधोलीच्या.

२ वेस कुलपाची.

१ तंगाची कडी.

१ माडळ विळ्याची.

१ कडी.

——

१८

एकूण वजन पक्कें.

०८२।।९

---

1 Rosary of Beads.
1 Ivory pieces ( used in playing )
1 A sword and two other weapons.
1 A shield.
1 Flint for producing fire.
1 Bullets &c.

दाखलबाद. काठी वेळाची लोखंडानें मढली असे १

१ अधोली.

१ साहाण तुकडे ४ एकूण.

४ खोडें जंगली.

१ पावडी.

१ नळे वेळाचे.

१ दगडी कुडा फुटका.

१ गोला विभूतीचा.

१ पिंजरा वेळांचे काठ्याचा.

११ एकूण.

एकूण साहा आणे नक्त व सुमारी पंचवीस व वजन पक्कें चारशेर पावणेंसोळा टाक सदरहूप्रमाणें सरकारांत जमा असत ह्मणोन मशारनिल्हे याचे नांवें हुजत लिहून दिल्ही असे १.

इ. स. १७४९–५०.
**खमसेन.**
**मया व अलफ.**
मोहरम १९.

[ ६५ ] मकाजी बिन शिवाजी पाटील पटारा मोकदम कसबें वामोरी तर्फ राहुरी परगणे संगमनेर याचा व सोनजी व बाळोजी बिन कुसाजी पटारा कसबें मजकूर यांचा कुसाजीच्या खुनाबाबत कजिया होता. याजकरितां मकाजीची मुकादमी अमानत केली होती. त्यास हल्लीं त्याचा इनसाफ मनास आणून विल्हेस लाविला. मकाजीच्या मानापैकीं दिवाळीचें वोवाळणें व कोळ्याचें पाणी दान मान सोनजी व बाळोजी यांस देविले. त्याचा सारा मकाजीनें द्यावा ऐसा निर्वाह केला. व महादजी पटारा मकाजी पाटील याच्या मुकादमीशीं कजिया करित होता त्याची मनसुबी केली. महादजी खोटा जाहला. मकाजी पाटील खरा जाहला. त्याची निवाडपत्रें अलाहिदा सादर होतील. तरी तुह्मीं मकाजी पाटील पटारा याची मुकादमी मानपान हक्क उत्पन्न सुदामत चालत आलें आहे, त्यापैकीं दोन मान वीस बिघे जमीन सोनजी व बाळोजी यांजकडे देऊन बाकी मानपान हक्क उत्पन्न मुकादमी सुदामतप्रमाणें मकाजीकडे चालवणें. जप्ती केली होती ती मोकळी करणें. वरकड लावणी उगवणीचा कारभार तुह्मीं करीत आहां त्याप्रमाणें करणें ह्मणोन राघो गोविंद यांस पत्रसनद १.

---

A. D. 1749-50.

(65) Makaji bin Sivaji Pathara Patel of Wamori in Tarf Rahuri having murdered Kusaji Pathara Patel, his Patilki watan was formerly attached. The matter now came up for decision. It was ordered that Makaji should surrender two of the rights of his watan viz, the right of having a platter waved round his head at the Dewali festival and the right to the supply of water by the village Koli—in favour of Sonji and

१००१ महादजी पटारा वडीलपणाचें भांडण भांडत होता तो खोटा झाला. मकाजी मजकूर खरा झाला सबब हरकी.

[ ६६ ] रावो गोविंद यांस पत्रकीं मोकाडा कुणबी मिरासदार मौजें पिंपळगांव परगणें वैजापूर यानें रांडेचें अदावतीनें खून केला, त्याची मालमालियत तुमच्या कमाविसदारानें जप्त केली आहे तें सरकारांत जमा करणें. मौजें सराळें येथें शिद्या मजकुराचें शेत आहे तेथील शेताचा सारा देऊन बाकी गल्ला राहील तो व मौजें भालगांव येथील शेताचा माल कुल जो होईल तो सरकारांत जप्त करणें. कुणबी मजकूर याजवर गुन्हेगारी मुकरर करून घेणें. हजर जामीन घेणें ह्मणोन सनद १.

इ. स. १७५०–५१.
**इहिदे खमसैन मया व अलफ.**
सफर २७.

[ ६७ ] लक्ष्मण महादेव सातारकर याणीं हुजूर येऊन विदित केलें कीं, कोंडाजी देशमुख व गोमाजी गोविंद देशपांड्या परगणें कोतुळ यांणीं चार पांचशें माणसांनिशीं येऊन यादो मोरेश्वर देशमुख परगणे मजकूर याचे घरीं दरवडा घालून घर लुटाविलें व भाऊ मारिला. व आपण याचे घरीं राहिलों होतों त्यास आपलें साहा हजार बासष्ट रुपये होते ते नेले व आपणास जखमी केलें आहे; तरी येविशीचें पारपत्य करावें ह्मणून. त्यावरून मनास आणून कोंडाजी देशमुख व गोमाजी गोविंद देशपांड्या हे वतनदार होत्साते माजूरपणें धटाई करून बदराहा वर्तणूक केली.

इ. स. १७५०–५१.
**इहिदे खमसैन मया व अलफ.**
रबिलावल १.

---

Baloji, sons of the deceased, and that he should in addition give them 20 bighas of his land.

( 66 ) A letter to Ragho Govind. Mokada Kunbi, Mirasdar of Pimpalgaon in Pargana Waizapur, having murdered one person, through enmity in connection with a harlot, his property has been attached by the Kamavisdar. It should be brought to the credit of Government. The man has a field at Sirale, the produce of which, after defraying therefrom the charges on account of revenue, as also the entire produce of the field at Bhalgaon, should be attached for Government. The fine to be levied from the man should be fixed; and security should be taken for his presence when required.

A. D. 1750-51.

( 67 ) Laxuman Mohadeo of Satara came and informed the Huzur that Kondaji Deshamukh and Gomaji Govind Deshpande of Pargana Kotal, attended by four or five hundred men committed a decoity at the house of Yado Mereshwar Deshmukh of the said Pargana, plundered Yado's property, killed his brother and robbed himself ( Laxuman Mahadeo ), who was residing in the house, of Rs. 6062 and wounded him ( Laxuman Mahdeo ), and prayed that the offenders be punished. Considering that Kondaji Deshmukh and Gomaji Govind Deshpande, though watandars had the audacity to act in this illegal manner, their watans are placed under attach-

A. D. 1750-51.

याजकरितां उभयतांचें वतन देशमुखी व देशपांडेपण सरकारांत अमानत केलें असे. तरी तुह्मीं हरदुजणांचें देशमुखी व देशपांडेपणाचें वतन दरोबस्त जप्त करून हकदक वगैरे लवाजिमे कुल जे असतील ते वसूल करून सरकारांत जमा करणें. यादो मोरेश्वर याचा देशमुखीचा हक्क असेल त्यास तुह्मीं अटकाव न करणें. चालत आलें आहे त्याप्रमाणें सुरळीत चालवणें ह्मणोन कृष्णराव अनंत सुभेदार प्रांत गंगथडी यांस सनद १.

येविशीं जमीदार परगणे कोतुळ यासीं पत्र $\frac{१}{२}$

[ ६८ ] नारायणजी पाटील व कबाजी पाटील मोकदम मौजें राजेटाकळी परगणे बीड यांजकडे गुन्हेगारी सबब कीं मौजें पाडळी परगणे आंबड येथील विष्णाजी पाटलाशीं कजिया केला व त्याचा एक खून केला. त्याजमुळें हुजूर आणून गुन्हेगारी करार केली बरहुकूम कतबा रुपये २००१.

इ. स. १७५०-५१.
इहिदे खमसैन मया व अलफ.
रविलावल २५.

यासीं वायदे.

छ० २४ रविलाखर द्यावे १००१. छ० २४ जमादिलावल द्यावे १०००.

एकूण दोनहजार एक रुपया करार करून कतबा लिहून घेतला असे १.

सदरहू कतबा गोविंदराम याचे हवालीं केला असे. दोन हजार रुपये गोविंदराम याजकडे पाटील मजकूर याणीं वसूल द्यावा. न दिल्हा तर हरदुजण पाटील पुणेंयास, राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ यांजवळ गोविंदराम याणें पोंचवून द्यावें. या खेरीज कागद पाटील मजकूर याजकडून घेतले ते:—

---

ment. You should therefore credit the proceeds of the Haks and perquisites pertaining to their watans to Government. You should not however interfere with the share of Deshmukh Hak belonging to Yado Govind. It should be continued to him as before without obstruction. A sanad to the above effect to Krishnarao Anant Subhedar of Prant Gangathadi.

(68) A fine of Rs. 2001 (as per bond) is ordered to be levied from Narayanji Patel and Kabaji Patel, officiators of Mouza Raja Takli, Pargana Bid, who were brought to the Huzur for their having in a quarrel murdered Krishnaji Patel of Mouza Padli, Pargana Ambad. The amount should be recovered in the following instalments:—

A. D. 1750-51.

1001 To be paid on the 24th of Rabilakhar.
1000 To be paid on the 24th of Jamadilaval.

A bond to the effect has been taken. The bond has been given over to Govind Ram, to whom the two Patels should pay the amount. If they fail, Govind Ram should arrange to send them to Trimbakrao Vishwanath at Poona. The following other documents were executed by the Patels.

२ राजीनामे.

१ नारायणजी पाटील व कबाजी पाटील मोकदम मौजें राजेटाकळी परगणे बीड यांचा कीं आपणा पंचाईत नेमू द्यावे त्याप्रमाणें आमचा पाडळीकरांचा इनसाफ पंच करतील त्याप्रमाणें रजावंदी असो ह्मणोन राजीनामा लिहून घेतला तो.

१ मोकदम मौजें पाडली परगणे आंबड याचा राजीनामा.

—

२

१ नारायणजी पाटील व कबाजी पाटील राजे टाकळीकर यांजपासून कागद लिहून घेतला कीं, आह्मीं पाडळीकरांशीं कजिया केला त्यासमयीं त्यांची वस्तभाव वगैरे सुतळीचा तोडा आह्मीं नेला असेल तो त्यांचा त्यांस देऊं ह्मणोन कतबा लिहून घेतला तो.

—

३

एकूण तीन कागद गोविंदराम याचें हवाला केले असेत.

[ ६९ ] रुपाजी बिन रंभाजी मुडतडक, वणजारे, पाटील मौजें लोहारे तर्फ हवेली परगणें संगमनेर याणें जाखोजी बिन सेट्याजी भाडाग वणजारे मौजें कविठें कमळेश्वराचें तर्फ हवेली परगणें मजकूर याचा लेक धाकटा सेट्या यास रानांत दगड मारून खून केला ह्मणून सेट्याजी भाडाग वणजारा तुजपासीं कजिया सांगोन हुजूर फिर्याद आला. त्यावरून साक्षी गोष्टी

इ. स. १७५२–५३.
**सलास खमसेन मया व अलफ.**
**सवाल २३.**

---

2. Rajinamas (deeds of consent).

1 One executed by Narayanji Patel and Kabaji Patel requesting the appointment of a Panchayet and agreeing to abide by the decision of the Panch in the matter of the dispute between them and the residents of Padli.

1 One executed by the officiators of Padli Pargana Bid.

—

2

1 A bond given by Narayanji Patil and Kabaji Patel agreeing to return all the property that may have been taken away by them, at the time of their dispute with the residents of Padli.

—

3

These three papers have been given over to Govind Ram.

( 69 ) A letter to Rupaji bin Rambhaji Mud Tadak Wanjare Patil of Mouze Lahore Tarf Haveli in Pargana Sangamner, Setyaji Bhadag Wanjara charged you with having murdered Setya, the younger son of Jakhoji bin Setyaji Wanjare of Mouza Kawate Kamale-

A. D. 1752-53.

निशीं मनास आणितां खुनाचें लिगाड तुजकडे नाहीं. तूं दगड मारिलास नाहीं. याप्रमाणें निवाडीनें तूं खरा जाहला, सबब तुझे माथां हरकी करार केली रुपये ५०० बरहुकूम निवाडपत्र बेरीज भरून दिली तें.

१००० खेरीज निवाडपत्न बरहुकूम कतबा एका महिन्यानें ऐवज सरकारांत पावता करावा.

---

१५००

एकून दीडहजार रुपये करार केले असेत. सदरहू उगवणी सटवोजी दिघा याणें सरकारांत उगवणी करून द्यावे येणें प्रमाणें पत्र १.

इ. स. १७५३–५४.
**अर्बाखमसैन मया व अलफ.**
जिल्हेज २०.

[७०] ओंकारभट व रणसोडभट व्यास ब्राह्मण उदीच्य वास्तव्य मौजें पचेड परगणें रतलाम सरकार उज्जेन याणीं हुजूर येऊन विदित केलें की, आपला भाऊ नारायणभट व्यास याची बेअब्रु लालसिंग रजपूत याणें करून जीवें मारिला आहे तरी त्याचें पारिपत्य करावें ह्मणोन. त्यावरून ब्राह्मणाचा खून केला हें जाणून तुह्मास सनद सादर केली असे. तरी रजपुतास देशा बाहेर काढून देणें. आणि त्याचे जाहागीरचे बारा गांव आहेत ते सरकारांत जप्त करून ठेवणें. आणि ब्राह्मणाचा खून झाला आहे यास्तव मौजें पचेड परगणे रतलामपैकीं जमीन इनाम चांगली चावर १ एक दिली असे. तरी मौजे मजकुरीं नेमून देणें आणि पचेडांत ब्राह्मणास घरास जागा नेमून देणें ह्मणोन जयाजी सिंदे यांस सनद १.

---

shwarache in Tarf Haveli in the Pargana of Sangamner, by pelting him with stones in the forest, and lodged a complaint. A consideration of the facts and evidence shows that you are not implicated in the murder and that you did not stone the deceased, you have come out successful through the trial and should pay the following amounts:—

Rs. 500 as per decision.
Rs. 1000 Extra as per bond, to be paid to Government within one month.

---

Rs. 1500.

The amount should be recovered and paid to Government by Satwoji Digha.

A. D. 1753-54.

(70) A Sanad to Jayaji Sindia. Onkorbhat and Ransodbhat Vyas, Udich Brahmins, residing at Pached in Pargana Ratlam of the province of Ujjain, having come to the Huzur, represent that Lalsing Rajput insulted their brother Narayanbhat Vyas, and put him to death, and pray that Lalsing may be punished. Considering that the Rajput has murdered a Brahmin, Government has issued this Sanad to you, and you are directed to expel the Rajput from the country, and to confiscate the 12 villages held by him in Jahagir. As the Brahmin has been murdered, sanction is accorded

ब्राह्मणाचे नांवें पत्र कीं सदरहू इनाम जमीन वंशपरंपरेनें खाऊन सुखरूप राहणें ह्मणोन.

[ ७१ ] कसबें नांदेड प्रांत राईबाग येथील घासदाण्याचा रोखा पंत प्रतिनिधी यांणीं शिदोजी थोरात यांस दिला. त्यांगीं आपले तर्फे तुळाजी शिंदे वसुलास पाठविले पाटील भेटला नाहीं सबब कुळकर्णी यास धरून पिछाडीस बांधून राऊत घेऊन चालले. कुळकर्णी याचा जीव व्याकूळ जाहला. राऊत गांवांत जाऊन जोशाकडून पाणी आणविलें. तोंपर्यंत कुळकर्णी मेला. मग गांवकरी यांणीं प्रेत तसेंच बांधून पंत प्रतिनिधीकडे नेलें. त्यांणीं दहन करण्यास हुकूम दिला. व मयताचे मुलास जमीन इनाम दिली. ( त्याचें नांव बाबाजी मखाजी क्षीरसागर ) इनामपत्रें दिलीं नाहींत; सबब पेशव्यांचें लष्कर स्वारीहून आलें त्यावेळीं बाबाजी तेथें दाद मागण्यास आला. प्रतिनिधी पेशव्यांचे भेटीस आले होते. त्यांणीं परत जा ह्मणून पत्रें देऊं असें सांगून वाटें लावलें. मागून महिना पंधरा दिवसांत प्रतिनिधी वारले. सबब पेशव्यांनीं इनाम जमीनीचें पत्र करून दिलें. व शिवाय छ० १७ खुनाबद्दल १००० रुपये घासदाणीयाचे ऐवजीं मजुरा घेण्याचा हुकूम झाला.

इ. स १७५४–५५.
खमस खमसेन
मया व अलफ.
मोहरम १५.

[ ७२ ] नारो बाबाजी नामजाद परगणे नेवासें वगैरे महाल यास सनद कीं कसबें टोकळ येथील पाटील वाघ व काशी पांड्या यांणीं जयरामकृष्ण याचा कनोजिया ब्राह्मण कसबें मजकुरच्या महाराकडून जीवें मारविला. त्यास पांड्या व पाटील यांचें पारिपत्य हुजुरून जाहलें. ज्या माहाराच्या हातून ब्राह्मणाचा खून जाहला आहे तो महार गैरहजीर जाहला आहे. ऐशियास त्या महा-

इ. स. १७५३–५४.
खमस खमसेन
मया व अलफ.
रबिलाखर २.

---

to the grant in Inam ( to the above relative ) of one Chahur of good land. The land should be assigned at the said village, and a site should be given to them in the same village for building a house.

( 71 ) The Pant Pratinidhi gave orders for the recovery of tribute घासदाणा from Kasba Nanded in Prant Raibag to Sidoji Thorat who deputed Tulaji Sinde to collect the amount on his behalf. On going to the village, Tulaji could not find the Patel. The Kulkarni was therefore seized by his horsemen; and was being taken away bound on the horse's back. On the way the Kulkarni fainted. The horsemen went to the village for water but before their return the man died. The villagers then took the corpse to the Pant Pratinidhi. He ordered it to be burnt, and promised a grant of Inam to the Kulkarni's son, named Babaji Makhaji Kshir-Sagar. Sanads were not however granted and Babaji came to the Peshwa's camp to seek redress. The Pratinidhi was at that time in camp on a visit to the Peshwa, and he promised Babaji that sanads would be issued and induced him to go back. Within a month after this the Pratinidhi died, and the promised Sanad remained to be issued. The matters having been represented to the Peshwa, Sanads were given by him. ( In the diary of the 17th of this month there is an order that out of the amount of the tribute due, Rs. 1000 would be remitted and allowed as a set-off for the murder. )

A. D. 1754-55.

( 72 ) The Patel and Kulkarni of Tokla caused a Kanoja Brahmin to be murdered by the hands of a Mahar. The Patel and Kulkarni were punished. The Mahar in question was not to be found, and the

A. D. 1754-55.

रास कसब्याच्या महारांनीं हजीर करून द्यावा. जोंपर्यंत महार हजीर होय तोंपर्यंत महाराची महारकी सरकारांत जप्त केली असे. तरी महाराचे वतनाचे हकदक मानपान शेतमळा कुल जें असेल तें जप्त करून सरकारांत वसूल घेणें ह्मणून सनद १. रसानगी चिठ्ठी अमृतराव शंकर.

[ ७३ ] मोरशेट वाडका वाणी वस्ती पेठ सोमवार याणें आपली बायको मारिली ह्मणून हुजूर विदित झालें त्यावरून यास हुजूर आणून पुरशीस केली. मनास आणितां याजकडे खुनाचा मुद्दा लागला. त्याजवरून याणें अर्ज केला कीं, मजजवळून कर्म झालें खरें त्यास माझें येणें लोकांकडे आहे. त्याचा हिशेब स्वामीनीं मनास आणून माझे जीवनमाफिक गुन्हेगारी करार करून घेऊन मजला पावन करावें ह्मणून. त्याजवरून अर्ज खातरेस आणून याजवर कृपाळू हाऊन हिशेब समजाविला तो मनास आणून तुजकडे सरकारची गुन्हेगारी रुपये २५०० अडीच हजार करार केले असे याचा वसूल सरकारांत देऊन सुखरूप राहणें. तुवां आपला उदीम वेवसायाचा हिशेब समजाविला याशिवाय आणखी मागील उदीम वेवसाय चौकशीमुळें उमगला तर सारा ऐवज सरकारांत घेऊन पारपत्य केलें जाईल. पुढें कोणे गोष्टीचा शक अंदेशा न धरितां नवा उदीम वेवसाय करून सुखरूप राहणें ह्मणून अभयपत्र लिहून दिल्हें असे १. रसानगी यादी.

इ. स. १७५४–५५.
खमस खमसेन
मया व अलफ.
साबान २३.

[ ७४ ] भगवान कुणबी वस्ती अमदाबाद याचे शेजारी वेणीदास याजपासून तकशीर घडली सबब पळोन गेला. सबब भगवानास धरून नेऊन एक हजार रुपये गुन्हेगारी अमलदारानें घेतली. त्याजवर पळाला तो सांपडला. त्याजवळ माझे आईनें रुपयांकरितां जीव दिल्हा; सबब खुनाची गुन्हेगारी रुपये २७०० सत्तावीसशें शिरस्ता गुजराथ प्रांतीचा आहे. तरी त्यास आणून

इ. स. १७५५-५६.
सीत खमसेन
मया व अलफ.
सवाल २८.

---

whole of the Maharki Watan of the village was attached pending the production of the offender by the Mahars of the village.

(73) Morshet Wadka, a Baniya of Peth Somwar, murdered his wife. Inquiries were instituted and the Baniya confessed his guilt. Taking into consideration the amount due to him by others, as shown by his accounts, a fine of Rs. 2500 was imposed upon him. He was informed hat if the list of outstanding debts, shown by him, proved to be false, the whole of the amount due to him by his debtors, would be confiscated and that he would be punished.

A. D. 1754-55.

(74) A letter to Shripatrao Bapuji—Venidas having committed a crime and absconded, his neighbour Bhagwan Kunbi of Ahmedabad, was arrested and a fine of Rs. 1000 was levied from the latter by the Officer of Government. Subsequently Venidas turned up, and Bhagwan's mother committed suicide before him, for his non-payment of the amount paid by her son on his account. The usual fine for murder in Guzerath is Rs. 2,700. You should bring Venidas before you, and levy from him the amount of Rs. 1000

A. D. 1755-56.

एक हजार रुपये व गुन्हेगारी खुनाबद्दल शिरस्ता असेल त्याप्रमाणें त्याचा निकाल करून देववणें. त्यापैकीं चौथाई सरकारची घेऊन हुजूर पाठवून देणें. बाकी तीन तक्षिमा नफर मजकुरास देणें ह्मणून श्रीपतराव बापूजी यांस पत्र १.

[ ७९ ] केवजी बिन त्रिंबकजी पाटील मेधनी मौजें कोशिंबें परगणे वाण याणें हुजूर येऊन विनंति केली कीं, बाजी बिन रुद्राजी पाटील व संभाजी बिन थबाजी पाटील व केवजी बिन दाजी पाटील मेधनी मौजें मजकूर यांचा व आपला बाप त्रिंबकजी पाटील याचा भाऊपणीयाचा कजिया होता. त्या अदावतीनें यांणीं आमच्या बापावर व आईवर लटकें तुफान घेऊन कसबें वाण येथील ठाणी-

इ. स. १७५५–५६.
सीत खमसेन
मया व अलफ.
जिल्हेज १३.

यांत फौजदाराजवळ जाऊन फिर्याद केली कीं, त्रिंबकजी पाटील व त्याची बायको भुताळी आहे. आह्मांस व गांवांत लोकांस उपद्रव देतात; त्यावरून फौजदारानीं इनसाफ न करितां सबाजी पाटील वगैर यांचें ऐकोन आपले बापास व आईस जीवें मारिलें; हें कर्म अदावतीनें केलें; तरी साहेबीं त्यांस बोलावून हुजूर आणून पुरशीस करावी. त्यावरून बाजी बिन रुद्राजी पाटील वगैरे मौजे मजकूर यांस हुजूर आणून पुरशीस केली. त्यावरून त्यांणीं जाबसाल केला कीं, हें कर्म आपणापासून अदावतीनें जाहलें आहे. तरी साहेबीं कृपाळू होऊन आह्मांकडून केवजीस खुनाचे ऐवजीं जीवन माफिक देववावें. त्याप्रमाणें आपण देऊं ह्मणून त्याजवरून मनास आणितां केवजीच्या बापाचा व आईचा यांजपासून खून अदावतीनें जाहला सबब मौजे मजकुरीं बाजी बिन रुद्राजी पाटील व संभाजी बिन थबाजी पाटील व केवजी बिन दाजी पाटील यांचें इनामपैकीं वगैरे इनामें जमीन बिघे बितपशील:—

८१९ मोकदमीची इनाम पासोडी आहे, त्यापैकीं याचा भाऊपणीयाचा वांटा जाऊन बाकी जमीन तिघांची राहिली आहे, त्यापैकीं काळी जमीन.

-।- मोकदमीची मिरास थळ कुणबावीयाची जमीन आहे, त्यापैकीं केवजीची वांटणी जाऊन बाकी तिघांची जमीन आहे, त्यापैकीं.

-।१९

एकूण पंचेचाळीस बिघे जमीन दुमाला करून याजकडे इनाम चालवणें ह्मणून सनदा.

---

and the customary fine for murder. A fourth of the whole amount should be taken for Government and sent to the Huzur, the rest being given to Bhagwan.

(75) There was a dispute regarding the Patilki Watan of Kosimbe in Pargana Wan between certain persons. Three of these complained to the Fouzdar of Prant Wan that their opponent and his wife had influence over evil spirits, and that they were a source of considerable annoyance to the villagers. The Fouzdar without making any inquiry and relying on the statement of the three persons above referred to, put their opponent and his wife to death. A complaint was referred to the Peshwa by the son of the deceased. The three persons were then called, and admitted that their complaint to the Fouzdar was malicious. They were fined Rs. 1500 out of which Rs. 300 were paid to the son of the deceased, the rest being credited to Government. They were also made to give 45 bighas of their land to the son of the deceased.

A. D. 1755-56.

[ ७६ ] जानो मल्हार वगैरे देशपांडे परगणे फलटण यांणीं बाबुराव सखदेव देशपांडे यांशीं कजिया करून घरावर चालोन जाऊन खून केले; सबब परगणे मजकूरचें वतन देशपांडे याजकडील देशकुळकर्ण व कुलकर्ण व जोतिषपण दरोबस्त सरकारांत जप्त करून राजश्री बाजी आनंदराव किल्ले सिंहगड यांस पाठविले आहेत. तरी हे वतनाचें कामकाज करतील. त्यास हकदक मानपान इनाम वतनसंबंधें देहाये मजकुरीं देशपांडे यांजकडील चालत असेल तें मशारनिल्हेकडे देणें. परगणे मजकूरचे देशपांडे यांस वतनाचें कामकाज करावयाशी संबंध नाहीं. ह्मणोन देहाये परगणे मजकूर यांस सनद.

इ. स. १७५६–५७.
सब खमसैन
मया व अलफ.
जमादिलाखर ३०.

[ ७७ ] बाळाजी कृष्ण कमाविसदार देशमुखी दंडा राजपुरी याचे नांवें सनद कीं नागोजी सुतार वस्ती मौजें दहिवली तर्फ गोंवळें यांणीं हुजूर विदित केलें कीं, आपली सून वेड लागोन घरीं नांदेना, यास्तव माराचें भय दाखवून खांबाशीं बांधोन ठेविली तेथेंच मेली. यामुळें देशमुखी दंडा मजकूरचे कमाविसदारांनीं गुन्हेगारी चाळीस रुपये घेतले आहेत ते माफ करावे ह्मणोन. त्याजवरून सुतार मजकुराचा अन्याय जाहला खराच. परंतु सुतार गरीब नादार सबब सदरहु गुन्हेगारीपैकीं निमे करार करून निमे गुन्हेगारी माफ केली. तरी चाळीस रुपयेपैकीं वीस रुपये देशमुखीचे हिशेबीं जमा करणें. बाकी वीस रुपये सुतार मजकुरास माघारे देणें ह्मणोन सनद.

इ. स. १७५८–५९.
तिसा खमसैन
मया व अलफ.
जमादिलाखर १९.

रसानगी यादी.

[ ७८ ] बापूजी बिन आवजी नाईक जपे वस्ती कसबें राहुरी त्याचा पुत्र मुरारी आठा नवा वर्षांचा होता तो मल्हार गोपाळ व लक्ष्मण गोपाळ कुळकर्णी कसबे मजकुरीं यांणीं निरापराधें जीवें मारिला ह्मणोन हुजूर विदित जाहलें. त्यावरून कसबे मजकूरचें दरोबस्त कुळकर्णाचें वतन सरकारांत जप्त करून कुळकर्णाचें कामकाजास यादो पांडुरंग क्षीरसागर कारकून हुजुरून पाठविले आहेत. याशीं रुजू होऊन दरोबस्त कुळकर्णाचा हकदक मानपान कुल जो होईल तो याजकडे वसूल देणें ह्मणून मोकदम कसबें राहुरी तर्फ मजकूर परगणे संगमनेर यास सनद १.

इ. स. १७६०–६१.
इहिदे सितेन
मया व अलफ.
सफर ४.

---

( 76 ) Jano Malhar Deshpande of Pargana Faltan quarrelled with Baburao Sakhdeo Deshpande, attacked his house, and committed murders. His watan was therefore attached.

A. D. 1756-57.

( 77 ) A daughter-in-law of Nagoji carpenter turned insane and would not live in the house. She was therefore threatened with beating and was tied to a post where she died. The Kamavisdar fined the carpenter Rs. 40 A petition was made to the Peshwa, who having regard to the poverty of the carpenter ordered a remission of half the fine.

A. D 1758-59.

( 78 ) Malhar Gopal Kulkarni killed without any excuse a son of Bapuji bin Awaji Naik of Rahuri. His watan was therefore attached.

A. D. 1760-61.

[ ७९ ] गोपाळ मल्हार कुळकर्णी कसबें राहुरी याचे पुत्रानें ब्रह्महत्या केली सबब दरोबस्त कुळकर्णपणाचें वतन सरकारांत जप्त केलें होतें; त्यास ज्याणें ब्रह्महत्या केली त्याचा अन्याय, यास्तव वरकड भावांचें वतन सुदामत चालों देणें. ब्रह्महत्या केली सबब याची वतनाची तक्षीम जप्त करून तुह्मांस कमाविस सांगितली असे, तरी याचे तक्षिमेचा हकदक वतन संबंधें उत्पन्न जें होईल तें सरकारचे हिशेबीं जमा करणें व याचे घरांत वस्तभाव असेल ती जप्त करून ठेवणें ह्मणून अवधूतराव केशव कमाविसदार तर्फ राहुरी यांशी सनद १.

इ. स. १७६०–६१.
इहिदे सितैन
मया व अलफ.
रविलाखर २८.

चिटणिशी पत्रें वरकड भावांचे वतनाचा हिस्सा जप्तींतून मोकळा केला असे ह्मणोन पत्रें.

१ अवधूतराव कमाविसदार याशीं कीं, ब्रह्महत्या ज्यानें केली त्याचे वतनाची अलाहिदा सनदेप्रमाणें जप्ती करणें. वरकड भावांचे हिस्से जप्तींतून मोकळे केले असेत. चालो देणें ह्मणोन.

१ यादो पांडुरंग याशीं पेशजी सारीच जप्ती करावयाशी पाठविलें होतें. त्यास हल्लीं ज्यानें ब्रह्महत्या केली त्याचे हिस्से मात्र जप्त करावयाशी कमाविसदार याशीं पत्र आहे. ते जप्त करतील. तुम्ही वरकड भावांचे हिस्से यांची जप्ती उठवून हुजूर येणें ह्मणून पत्र.

२

रसानगी यादी. ३

[ ८० ] परगणे गलगले येथील देशमुखानें परगणे मजकूरच्या देशपांड्याच्या आठ ब्रह्महत्या केल्या ह्मणोन विदित झालें. त्यास देशमुखीचें वतन सरकारांत जप्त करून तुह्मास सनद सादर केली असे. तरी वतन जप्त करून शेतें मळे हक रुसूम कुल जप्त करून सरकारांत जमा करणें ह्मणून जानराव तुकदेव यांशी रसानगी यादी सनद १.

इ. स. १७६०–६१.
इहिदे सितैन
मया व अलफ.
सवाल ११.

---

(79) A son of Goplal Malhar Kulkarni of Rahuri having murdered a Brahmin the Kulkarni's share of the watan and his property was ordered to be attached. The shares of the other watandars which were already attached were ordered to be released from attachment.

A. D. 1760-61.

(80.) The Deshmukha of Pargana Galgale killed 8 persons of the Deshpande Brahmin family. His watan was therefore attached.

A. D. 1760-61.

[ ८१ ] मौजें अंबळनेर तर्फ मानूर येथील बाळोजी पाटील याणें पाटीलकीचे कजियामुळें भावास जीवें मारून त्याचीं मुलेंमाणसें कैद करून गांवची गढी बळकाऊन वसूल देत नाहीं. यामुळें वरकडही गांवकरी लबाडी करून वसूल देत नाहींत ह्मणोन हुजूर विदित झालें. ऐशास मशारनिल्हेची गढी पाडावी लागते सबब हें पत्र तुह्मास सादर केलें असे. तरी तुह्मी दोन तोफा बमय सरंजाम देऊन व गाडदी शंभर येणें प्रमाणें देऊन गढी पाडून मालोजी पाटील यास राजश्री धोंडो गणेश कमाविसदार तर्फ मजकूर याचे हवालीं करणें. येविशीं ढील न करणें. सत्वर पाटलाचें पारपत्य करणें व तर्फ मजकूरचे गांवगन्ना तुह्माकडील तोफखान्याचे लोक लाकुड फाटीयाचे वगैरे उपसर्ग देतात त्यांस ताकीद करून उपद्रव होऊं न देणें ह्मणून हरबाजी पांडुरंग दिमत त्रिंबक खंडेराव याशीं चिटणिशी पत्र १.

इ. स. १७६०–६१.
इहिदे सितैन
मया व अलफ.
सवाल १८.

[ ८२ ] भगवंतराव बिन येशवंतराव क्षीरसागर पाटील मौजे वाठार कर्यात वढगांव प्रांत पन्हाळा हल्लीं वस्ती मौजें कामेरी तर्फ वाळवें प्रांत कऱ्हाड याणीं कसबें पुणें येथील मुक्कामीं सन तिस्सा खमसेनांत हुजूर येऊन अर्ज केला कीं, आपले तीर्थरूप कुटुंबासहित मौजें मजकुरीं वीस पंचवीस वर्षें सुख वस्तीस राहत होते. त्यास अलीकडे चार वर्षें सदरहू गांवीं निंबाजी बिन माणकोजी ढोकल्या मिरासदार कुणबी याचें मिराशी शेत आहे तें कुणबी मजकूर व तीर्थरूप मिळोन निमे वाट्यानें करीत होते; त्यास सदरहू शेत दिवाण दाखल नऊ बिघे असतां कुणबी मजकुरानें तफावत करून बारा बिघे सांगोन चार वर्षें बारा बिघ्यांचा धारा घेतला हें वर्तमान तीर्थरूपास कळलें; त्यावरून तीर्थरूपीं कुणबी मजकुराजवळ दरसाल दीड बिघ्याचा पैका जास्ती घेतला तो चहूं वर्षांचा मागितला व पंचांनीं वाजवी पैका द्यावा ह्मणोन सांगितलें; त्यावरून कुणबी मजकुरानें दावा धरून सुलतानजी बिन अंबोजी व बाजी बिन बहिरोजी कदम पाटील मौजें मजकूर यांचे पाठीशीं जाऊन उभयतां मिळोन कजिया करून अदावतीमुळें आपले

इ. स. १७६०–६१.
इहिदे सितैन
मया व अलफ.
सवाल १९

---

(81.) Baloji Patel of Ambalner in Tarf Manur, murdered his brother in connection with a dispute regarding the Patilki watan, imprisoned his family, took possession of the village गढी (a strong fortified place) and refused to pay in the Government dues. The ryots also would not therefore pay the revenue. Orders were issued to Harbaji Pandurang for the bombardment of the place with the help of 2 canons and 100 soldiers, and for the capture of the Patel and his surrender to the Kamavisdar.

A. D. 1760-61.

(82.) A dispute having taken place between Yesvantrao Kshirsagar of Kameri in Tarf Walve of Prant Karad and his tenant, in regard to the amount of land revenue due, the tenant with the help of Sultanji and Baji Kadam, Patels of the village, murdered

A. D. 1760-61.

तीर्थरूप नारायणराव व रघुनाथ हे दोघे बंधु एकूण तिघे जण जीवें मारिले. त्याची मनसुबी स्वामीनीं मेहेरबान होऊन मनास आणून निवाडा करून दिल्हा पाहिजे ह्मणोन. त्याजवरून मौजें मजकूरचे शिदोजी बिन फिरंगोजी कदम ऊर्फ लुगडे निंभेचे पाटील यास व आपाजी तुकदेव व जनार्दन बाबुराव कुळकर्णी वगैरे रयान हुजूर आणून मनसुबी मनास आणितां मनसुबीचेरुईनें व गांव मजकूरचे मोकदम कुलकर्णी व रयतेचे साक्षीनिशीं सुलतानजी व बाजी मजकूर यांजकडे सदरहू प्रमाणें तीन खून शाबूत झाले. त्याचा कजिया वारिला पाहिजे. यास्तव हल्लीं सरकारांतून पंचाईत न्यायें मौजे मजकुरीं सुलतानजी व बाजी पाटील यांचे इनामपैकीं व कुणबाव्याचे मिराशीपैकीं इनाम बितपशील:—

वाडे इमारत सुद्धां सुमार

१ सुलतानजी व बाजी पाटील यांचा हुड्याचा वाडा त्याची चतुःसीमा चौफेर गल्ली; पलीकडे वाडे; पूर्वेस देमापा बिन जनापा कापशा दुकानदार वाणी, पश्चिमेस मळशेट बिनरुद्रशेट वाणी दुकानदार व जनार्दन बाबुराव कुळकर्णी; उत्तरेस सखभट बिन त्रिंबक भट जोशी वतनदार; दक्षिणेस आबाजी बिन नागोजी कदम पाटील हिसेदार.

१ ढोकल्या कुणब्याचा वाडा त्याची चतुःसीमा वाडे.

१ पूर्वेस शिदु बहिस माळी याचा वाडा.

१ पश्चिमेस गल्ली.

१ उत्तरेस बहिरोजी बिन नागोजी पाटील तक्षिमदार याचा वाडा.

१ दक्षिणेस शेखोजी बिन शिवाजी कदम पाटील हिसेदार याचा वाडा.

४

२ एकूण

जमीन दरोबस्त बिघे.

-।२० पाटिलाचे पालक इनामांत बिघे.

८९ बागाईत.

-।१९ जिराईत

-।२०

८१९ ढोकल्या कुणब्याचे मिराशीपैकीं बिघे.

८९ बागाईत.

८१० जिराईत पांढरीचें शेत.

८१९

-।।९

Yesvantrao and two others. The offence was tried at the Huzur, and was on the evidence of the Mokadam, the Kulkarni, and the ryots proved against the 3 persons above referred to. At the suggestion of the Punch, land measuring half a chaur

येणेंप्रमाणें दोन वाडे व पासष्ट बिघे जमीन दरोबस्त कुलबाब कुलकानु स्वराज्य व मोंगलाई एकूण दुतर्फा देखील सरदेशमुखी व इनाम तिजाई हल्लीं पट्टी व पेस्तर पट्टी खेरीज हकदार करून मशारनिल्हेस इनाम देऊन ही सनद सादर केली असे. तरी मौजें मजकूरीं सदरहू लिहिल्याप्रमाणें चतु:सीमापूर्वक दोन वाडे व जमीन पासष्ट बिघेपैकीं पाटिलाकडील पालक इनामांत पन्नास बिघे जमीन लिहिली आहे. त्यास पाटील मजकुराची पालक इनामाची मोजणी करून होईल ते पन्नास बिघ्यांत मजुरा देऊन कमी जाहाली तरी पाटलाचे मिराशी शेतांपैकीं पुरवून देऊन पासष्ट बिघे जमीन चतु:सीमा पूर्वक मशारनिल्हेचे दुमाला करून यास व याचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें साल दरसाल इनाम चालवणें. दरसाल नवीनपत्राचा हुजूर न करणें. या सनदेची प्रतीं लिहून घेऊन ही अस्सल सनद भगवंतराव मजकूर याजवळ भोगवटीयास परतोन देणें ह्मणोन सनदापत्रें.

## ( ब ) गुन्हे.

### ३ दुखापत.

[ ८३ ] नारो बाबाजी नामजाद परगणें नेवासें, वगैरे महाल यांस सनद कीं, प्रवरासंगमकर पाटील व टोकेकर पाटील यांचा कजिया शिमग्याचे खेळांत जाहला, ते समयीं प्रवरासंगमकर पाटील याणीं टोकेकर साखरोजी पाटील याचा पुत्र रामजी पाटील याचा हात तोडला, व आणखी दोन चार माणसें जखमी केलीं, सबब प्रवरासंगमकर पाटिलाची पाटीलकी जप्त करून व आणखी मोजें मजकूरचा अंमल जागीर करून सरकारांत ठेऊन सरकार तर्फेनें तुह्मास कमाविस सांगितली असे. तरी पाटीलकीचे हकदक मानपान शेतें व मळे कुल जें असेल तें व कसबें मजकूरचा अंमल जागीर व चौथाई व सरदेशमुखी कुल जप्त करून सरकारांत वसूल घेणें, व प्रवरासंगमकर पाटील ज्यांणीं खून केले ते व कोळी असे कैद पाठवून देणें ह्मणून सनद १. ये विशीं मौजे मजकुरास सनद कीं यांजकडे अंमल लिहिलेप्रमाणें देणें.

इ. स. १७५४–५५
खमस खमसेन
मया व अलफ.
जिल्हेज ४.

---

**Hurt. 3**

and the five bighas out of the land belonging to the 3 persons, as also the house of Sultanji and Baji were given to Yesvantra's son Bhagwantrao.

( 83 ) In a quarrel between the Patels of Pravara Sangam and Toka during the Shimga festival, the foremen cut off a hand of the latter's son, and inflicted inquiries on 3, or 2 other persons. His Watan was therefore attacked, and he was ordered to be arrested and sent to Poona ( This case was decided on 18th of Moharum and the Patel of Pravara Sangam was ordered to surrender half a chahur of his land to the Patel of Toka.)

A. D. 1754-55.

( या खटल्याचा निकाल तारीख १८ मोहरम रोजीं झाला व प्रवरासंगमकर पाटलानें टोकेकर पाटलास अर्धा चाहूर जमीन द्यावी असा त्यास हुकूम झाला. )

## ४ चोऱ्या व दरवडे.

[८४] मल्हारजी वीर वाणी कसबें सासवड यांजकडे चोरीचें लिगाड आहे, याजकारितां किल्ले मजकूरीं पाठविला आहे. त्याचें पायीं बिडी घालून कैदेंत ठेवून रखवाली करणें. यांस दररोज अडसेरी गल्ला कैली ०८।. चौथवा भर व मीठ कोठीपैकीं देत जाणें ह्मणून उमाजी हणगवर हवालदार किल्ले घनगड यांस सनद १.

इ. स. १७४९–५०. खमसेन. मया व अलफ. मोहरम २.

[८५] मल्हार मुकुंद कमाविसदार परगणे वरवल वगैरे महाल यांस सनद कीं दोघे भले माणूस राजश्री रघोजी भोंसले यांच्या लष्करांत चाकरीस गेले होते, तेथें कोणाकडे चाकरीस होते, त्यांस तलबेचे रुपये त्यानें न दिल्हे, सबब त्यांचा घोडा चोरून आणिला. मौजे गोंखरीं परगणें लातूर येथें आले. दोघे येकांत येक भांडो लागले. सबब घोडा अटक करून सरकारांत घेतला. घोडा दोन अडीचशें रुपयांचा माल आहे. दोघे श्रमी होऊं लागले ह्मणोन पन्नास रुपये द्यावयास कबूल केले आहेत. पन्नास रुपये द्यावयाची आज्ञा केली पाहिजे ह्मणोन तुह्मी विदित केलें. त्यावरून पन्नास रुपये त्या दोघांस द्यावयाची आज्ञा केली असे. ५० पन्नांस रुपये देणें. तुह्मांस मजुरा असेत. सदरील घोडा तुह्माजवळ आहे, तो हुजूर पाठवून देणें आणि कबज घेणें ह्मणोन छ. २६ जिल्हेज सनद १.

इ. स. १७५०–५१. इहिदे खमसैन मया व अलफ. रजब ९.

---

## 4 Thefts and Robberies.

( 84 ) Malharji Vir Wani of Saswad being convicted of theft, was sent to fort Ghangad for imprisonment. It was ordered that fetters should be put round his feet and that he should be given ration at one Seer per day.

A. D, 1749-50.

( 85 ) A Sanad to Malhar Mukund Kamavisdar of Pargana Warwal and other mahals to the following effect:—

Two respectable men who had gone to the Camp of Raghoji Bhosle for service, were there employed by some person. The employer having failed to pay them their salaries, the two men stole away his horse, and came to Gokhari in Pargana Latur. They began to quarrel between themselves, and the horse, which is worth about Rs. 200 or 250, was therefore attached. You report these facts, and add that as they were much grieved at the loss of the horse, you promised to pay them Rs. 50. You now ask sanction for the payment of the amount. The sanction is accorded. You should pay Rs. 50. The charge will be admitted. The horse in question which is now with you should be sent to the Huzur, and a receipt should be taken.

A. D. 1750-51.

[ ८६ ] मौजे पाथरें खुर्द तर्फ बेलापूर याजकडें गुन्हेगारी करार केली सबब कीं शामराव विश्वनाथ साल गुदस्ता मोंगलाचें दंग्यासमयीं लष्करांत येत होते ते वाटेस लुटले गेले. त्याचें ठिकाण पाथरेकरांकडे लागलें. सबब मशारनिल्हेची वस्तभाव लुटून घेतली होती ती मशारनिल्हेस माघारी देऊन मोजे मजकुराकडे गुन्हेगारी करार केली. गुजारत विसाजी कृष्ण दिंमत राघो खंडेराव रुपये ७५०.

इ. स. १७५२–५३.
सलास खमसेन
मया व अलफ.
सवाल २२.

येकूण साडे सातशें रुपये विनायक दीक्षित याजपासून घ्यावे या प्रमाणें करार. एक महिन्यानें घ्यावे, या प्रमाणे करार असे.

[ ८७ ] महिपतराव कवडे यास सनदकीं आमीरबेग याणें हुजूर येऊन विदित केलें कीं आपण बराणपुराहून वाटमार्गीं चाकर राहवयास औरंगाबाद प्रांतें येत असतां मार्गीं जानोजी ढमढेरे याचें गांव मोजें डामरूल परगणे आडावद येथें वस्तीला राहिले. त्यास गांवकरी यांनीं चाळीस घोडीं लुटून घेतलीं आहेत. तें साहेबीं कृपाळू होऊन सोडून देवावी ह्मणून. त्यावरून ही सनद तुह्मांस सादर केली असे. तरी यांची घोडीं लुटून घेतलीं असतील, त्याची तुह्मी चौकशी करुन सदरील घोड्यांपैकीं पांच घोडीं उत्तम थोर असतील तीं घेऊन पागेस जमा धरणें. बाकी सोडून देववणें. गांवकरी यांनीं घोडीं घेतलीं आहेत तीं तुह्मी आपणाजवळ सोडून आणून त्यांपैकीं पांच घोडीं सरकारची पागेस जमा करणें, बाकी सोडून देववणें ह्मणोन सनद १. रसानगी चिठ्ठी.

इ. स. १७५२–५३.
सलास खमसेन
मया व अलफ.
रबिलावल ७.

---

(86) A fine has been imposed on the village of mouza Pathare Khurd Tarf Belapur for the following reason:—

A. D. 1752 53.

Shamrao Vishwanath while on his way to the Camp, during the invasion of the Mogals last year was robbed and the robbery was traced to the villagers of Pathare. The property stolen was recovered, and made over to the owner. A sum of Rs. 750 was ordered to be levied from the villagers as fine through Visaji Krishna under the Command of Ragho Khanderao.

(87) Amir Beg represents to the Huzur that while on his way from Buranpur via Aurangabad, he halted at Damrule in Pargana Adawad, a village belonging to Janoji Dhamdhere, and that while there, the villagers forcibly took away from him 40 horses. He prays that the Peshwa may graciously be pleased to order their restoration. You are therefore directed to inquire into the matter. Out of the horses that may have been so taken away, you should select five excellent animals of good stature, and retain them for Government. The rest should be restored to the owner.

A. D. 1752 53.

[ ८८ ] लालानाईक वणजारा यानें विदित केलें कीं आपण बैलांचें तांडियासमेत परगणें उलपाड प्रांत गुजराथ येथून भरून येत असतां डोंगरा वसावा व बावल्या वसावा भुमी याणें आपल्याशीं लबाडी करून जोरावरीनें रुपये ४००० चार हजार व हवाला रुपये १५०० दीड हजार असे साडे पांच हजार घेतले आहेत. त्यास साहेबीं कृपाळू होऊन भुमे मजकुरांस ताकीद करून सदरील रुपये त्यांजपासून घ्यावे. पैकीं चौथाई सरकारांत घेऊन बाकी ऐवज मजला देववावा ह्मणून. त्याजवरून पत्र लिहिलें असे. तरी तुह्मी भुमे मजकुरांस ताकीद करून वणजारा मजकुराचे रुपये त्याणें घेतलें असतील, ते वाजवी मनास आणून उगवून घेणें, पैकीं सरकारची चौथाई घेऊन सरकारचे हिशेबीं जमा करणें—बाकी ऐवज वणजारेमजकुरांस देणें. या कामास ढालाईत सरकारचे पाठविले आहेत, यांचे विद्येमाने वणजारे याचे रुपयांचा निकाल करून देणें ह्मणोन पत्रें:—

इ. स. १७५३–५४.
आर्बा खमसेन
मया व अलफ.
जिल्हेज १.

१ महिपतराव कवडे यांस.

१ जनार्दन अनंत दिंमत नारो बल्लाळ कमाविसदार परगणे नंदुरबार मोंगलाई अंमल यास.

१ आपाजी गणेश यांस.

३

[ ८९ ] बहिरागी यांणीं जटिल गोसावी यास लुटून घेऊन कसबें लोटूरच्या वाडीस येऊन राहिले होते. त्याची चौकशी वाडीकरांनीं केली. बहिरागी पळून गेले. त्यांजवळ मालियत येणें प्रमाणे सांपडली.

इ. स. १७५५–५६.
सित खमसेन
मया व अलफ.
जमादिलावल २४.

| नक्त रुपये. | मोहरा. | पुतळी. | सोनें मोहरभर. |
|---|---|---|---|
| ३८९ | २ | १ | १ |

---

(88) Lala Naik Wanjara stated that while returning from Pargana Olpad Guzrath with his pack of loaded bullocks, Dongara Wassawa and Bablya Wassawa Bhumi, (the old settlers of the place,) fraudulently extorted from himself Rs. 4000 in cash and a pledge for Rs. 1,500. He prays that Government may graciously be pleased to recover the money from the said persons and to restore it to him after deducting a fourth of it for Government. You are therefore directed to recover from the said Bhumi the amount that after inquiry may be found to have been extorted by them, and after deducting the one-fourth due to Government and crediting it in the accounts, to return the remaining amount to the said Wanjara. A few soldiers in the employ of Government are deputed to assist you in the matter.

A. D. 1753-54.

(89) Some Bairagis robbed a Gosavi and came to reside in a hamlet of Lotur. The inhabitants of the hamlet having commenced inquiries regarding the new comers, the latter absconded. The following property was found with them:—

A. D. 1755-56.

किरकोळ वस्तभाव.

येणें प्रमाणें खलोजी परांडा ठाकूर यानें घेऊन ठेविलें आहे. त्यास खास स्वारी पुण्यास आल्यावर वर्तमान मनास आणून आज्ञा करणें ती केली जाईल. तूर्त तो ऐवज खेमाजी मजकुरा जवळ असो. या खेरीज तुह्मी ऐवज अथवा मालियेत नेली असेल, ती परांडाकडे देणें ह्मणोन मेघःशाम बापूजी यांस पत्र १.

## ५ गुलामांस फुसलावून नेणें.

[ ९० ] नारो त्रिंबक कमाविसदार तर्फ पालहवेली यांस पत्र कीं विसाजी नारायण मराठे याची कुळंबीण त्रिंबक जोग व केशवभट कोनकर यांनीं पळवून नेली, आणि तिचे पायीं बेडी होती ती तोडली आणि अंतो नवघरकर याचे घरीं ठेविली होती. त्यांस त्याचें घरी आठ महिने कुळंबीण असतां त्यांणीं विदित न केलें याजकारितां कुळंबिणीची किंमत जी होईल त्या प्रमाणें गुन्हेगारी घेणें ह्मणोन मशारनिल्हे यांस पत्र १.

इ. स. १७५४–५५.
**खमस खमसेन मया व अलफ.**
सफर ८.

## ६ चोरीचा माल घेणें.

[ ९१ ] कृष्णराव महादेव याच्या बटकी ३ तीन व पोरगा १ एकूण चार असामी पळोन लाला चतुर्भुज साउकार बऱ्हाणपूरकर याचे घरीं गेलीं. तीं त्यानें लपवून ठेविलीं. त्यांचे शोधास गोविंदराव काळे यांस मशारनिल्हे यांनीं पाठविलें. त्यांनीं साउकार मजकुराचे आंगीं मुद्दा लाविला. तेव्हां साउकाराचें तोंड

इ. स.१७४७–४८.
**समान आर्बैन मया व अलफ.**
सवाल १५.

---

Rs. 185, Mohors 2, Putali 1 gold &c. The inhabitants of the hamlet were directed to keep the property pending the return of the Peshwa to Poona when the matter was to be disposed of.

## 5 Enticing away slaves.

(90) A letter to Naro Trimbak Kamavisdar of Tarf Pal Haveli. A female slave belonging to Visaji Narayen Marathe was enticed away by Trimbak Jog and Keshavbhat Konkar. They removed the chain from her feet, and kept her in the house of Anto Navgharkar. Though she was there for 8 months, no information regarding her was given by them. They (three individuals) deserve punishment, and fine equal to the price of the slave is ordered to be levied from them.

A. D. 1754-55.

## 6 Receiving stolen property.

( 91 ) Chaturbhuj, banker of Barhanpur concealed in his house 3 female slaves and one boy, belonging to Krishnarao Mahadeo, who had run away from their master; Krishnarao's Karkun discovered the fact. The banker was frightened and being taken to task by Harbaji Ram, surrendered one of the female slaves and gave Harbaji

A. D. 1747-48.

सुकोन गेलें. मग हरबाजीराम व नरसी कोनेर दिंमत संकराजी निकम यांणीं साउकारास जाऊन धमकाविलें कीं, तुह्मीं मातबर सावकार आणि तुह्मापासून हें कर्म कसें झालें? त्यावरून साउकार मजकुरानें बटीक हरबाजीराम याचें हवाला केली. व नरसी कोनेर व हरबाजीराम यांस साउकार मजकुरानें रुपये ९६० नउशेंसाठ दिले ते सरकारांत जमा धरिले ते हरबाजीराम यांजपासून एका महिन्यानें घ्यावे. बरहुकूम कतबा रुपये ९६०.

बटीक हरबाजीराम याचे हवाला केली होती तें त्यांनीं सरकारांत आणून दिली असे, बटीक बनाम नंदी.

## ७ खोटीसाक्ष.

[९२] हणमंतभट निसबत भगवंत महादेव कमाविसदार जकात प्रांत मिरज हे लटकें बोलले, सबब गुन्हेगारी करार केली. पागा राजश्री भाऊ वल्लद मानसिंग चौकीदार रुपये १००० एक हजार करार याचा हवाला जिवाजी गोपाळ दिंमत गोविंद हरी यांनीं घेतला असे. छ २२ सवाल. एक महिन्यानें घ्यावे. रुजू हणमंतभट दिमत त्रिंबकराव ईटकर प्रतिनिधीचे भाऊ मिरजेच्या जकातीची लटकी साक्ष दिली ह्मणून गुन्हेगारी करार केली.

इ स. १७५९–६०.
सितैन
मया व अलफ.
जिलकाद १९.

## ८ खोटी फिर्याद.

[९३] विठोजी जिनगर कसबें सासवड प्रांत पुणें याणें गोविंदजी जगन्नाथ देशमूख याजवरी चोरीचें तुफान घेतलें, त्याजवरून भगत व गोत व भले लोकांचें गुजारतीनें मनास आणितां विठोजी खोटा झाला, त्यास गुन्हेगारी जिवनमाफीक करार रुपये ७९. सदरहू देऊन सुखरूप राहणें.

इ. स. १७२१–२२.
इसन्ने अशरीन
मया व अलफ.
साबान १७.

रामा न्हावी कसबें सासवड यानें सुभानजी जिनगर यास आपलीं भुतें घातलीं, आणि

---

Rs. 960. It was ordered that the amount should be recovered from Harbaji within one month.

## 7 False evidence.

(92) The Pratinidhi's brother Hanmantbhat bin Trimbakbhat Itkar, gave false evidence. He was fined Rs. 1000.

A. D. 1759-60.

## 8 False complaint.

(93.) Vithoji Jingar of Sasvad charged Govindji Jaggannath Deshmukh of sorcery. The priests, relatives of the parties, and respectable persons were assembled and the matter was inquired into. Vithoji's complaint was proved to be false and he was find Rs. 75.

A. D. 1746-47.

Rama barber of Sasvad practised sorcery against Sambhaji Jingar and falsely charged another person with having done so. An investigation was made with the

सुभानजी आकरेकर यांनीं भुतें ह्मणून तोतया लोक त्यांस भूत वैद्य आणून तुझ्या गोतामध्यें मनास आणितां, भुतें असें करार झालें. सबब, जीवन माफीक गुन्हेगारी करार केली रुपये ३९.

ऐन जमा.

१७॥ स्वराज्य. १७॥ मोंगलाई.

४ सरदेशमुखी.

१ साहोत्रा.

—

४०

| यास तपशील. | सरकारी मोंगलाई. | सरदेशमुखी. | साहोत्रा. |
|---|---|---|---|
| ९॥।= इनाम तिजाई. | १७॥ | ४ | १ |

पंत सचिवकडे १७॥। व इनाम तिजाई ९॥।= बाकी १॥=

---

aid of a majician and the kinsmen of the parties and the sorcery was brought home to Rama and he was therefore fined Rs. 35 and the following levies were made.:—

| Rs. | | The amount of the fine |
|---|---|---|
| 35 | | |
| | $17\frac{1}{2}$ | Swarajja |
| | $17\frac{1}{2}$ | Moglai |
| 4 | | Sardeshmukhi |
| 1 | | Sahotra |
| 40 | | |

The amount was distributed as under:

To Government.

$17\frac{1}{2}$ Moglai.

4 Deshmukhi.

1 Sahotra.

5-14 Inam Tijai

To Pant Sachiv.

11-10 Swarajya less Inam Tajai.

[ ९४ ] निसबत सोयराजी थोरात किल्ले नारायणगड हा रखमाजी रेपाळा याची लेक बनाम

इ. स. १७४९–५०. खमसेन मया व अलफ. जमादिलावल १.

मैनी हे शिवाजी परीट याजजवळ गेली ह्मणून मुखई जाहला होता. त्यास तिनें रवा काढिला, रवयास उतरली. खरी जाहली. सोयराजी मजकूर खोटा जाहला. सबब गुन्हेगारी करार केली रुपये ५०.

सदरहू रुपयांस जामीन अंतोजी पतंगराव चाकर सरकार सदर बारगीर किल्ले मजकूर झाला असे. सदरहू रुपये दोन महिन्यांनीं द्यावे. याप्रमाणें करार बरहुकूम कतबा छ. २ जमादिलावल.

## ९ बनावट दस्तऐवज.

[ ९५ ] मौजे जांबगांव परगणें पारनेर येथील कुलकर्ण पेशजी अनामत केलें होतें, सबब

इ. स. १७४८–४९. तिसा आर्बैन मया व अलफ. जिल्काद. २५

कीं पाटलाचा कजिया होता. त्यामध्यें कुलकर्णी यांनीं बदराहा वर्तणूक करून कागद जसे ज्यानें मागितले तसे करून दिले, सबब अमानत केलें होतें. हल्लीं कुळकर्णी मजकुरानें, बदराहा वर्तणूक करूं नये ऐसा करार करून जामीन तुम्हांजवळ द्यावयाचा करार केला आहे. तरी तुह्मी याजपासून जामीन घेऊन कुळकर्ण मौजे मजकुराचें ज्याचें त्याचें स्वाधीन करणें ह्मणून नारो बाबाजी कमाविसदार परगणें मजकूर यांशीं सनद १.

[ ९६ ] बाळाजी खंडो वाणस गोत्र काश्यप सूत्र आश्वलायन कुळकर्णी मौजें झाडगांव

इ. स. १७६०–६१. इहिदे सितैन मया व अलफ. रबिलावल ६.

देखीलवाडा नाचणें जुवें व मिर्या व पथकी मीठबंदर पेठ शिवापूर कर्यात नेवरें सुभा प्रांत राजापूर याचे नांवें निवाडपत्र ऐसीजे, तुंवा हुजूर कसबें पुणीयाचें मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, मौजें मजकूर देखीलवाडे याचें कुळकर्ण व पेठ मजकूरचें मीठ बंदरचें पथकीपण, आपले प्रपितामह मुधो खंडरस यांस सावंतानीं दिल्हें. त्याप्रमाणें आपण हा कालवरी, अनभवीत असतां, बाळकृष्ण

---

( 94 ) Soyraji Thorat of fort Narayangad accused Maini, daughter of Rakhamaji Repal, of adultery with Shiwaji washerman. She underwent the ordeal of picking up unhurt a piece of metal, out of heated oil, and came out successful. Her innocence being thus established, Soyraji was fined Rs. 50.

A. D. 17 9-50.

( 95 ) In a dispute regarding the Patilki Watan of Jambgaum in Pargana Parner, the Kulkarni prepared false documents and produced them in evidence. His Watan was therefore attached. Order was subsequently issued to Naro Babaji to take security from the said Kulkarni for his abstaining from similar practices in future, before releasing the Watan.

A. D. 1748-49.

( 96 ) In the adjudiation of a dispute regarding the Kulkarni Watan of Zadgaon in Prant Rajapur, a forged document was produced in evidence by Balkrishna Keshav Vertak. He was sentenced to banishment.

A. D. 1760-6I.

केशव वर्तक यानें सदरहू वतनाचे कृत्रीम कागद करून आमचे वतनास मुजाईक होऊन सरकारचें पत्र राजश्री मोरोजी शिंदे तालुकदार जंजिरे रत्नागिरी, यांशीं घेऊन आह्मांस तेथें नेऊन न्याय यथास्थित न होतां त्याचे कृत्रिम कागदाची चौकशी न करितां, जोरावरी मजवरी करून तालुकदारांही सदरहू वतनें वर्तकाचे स्वाधीन केलीं, त्याजवरून आपण हुजूर आलों. स्वामीस विनंति करून वाद्यास आणविलें, स्वामीनीं राजश्री नारो अपाजी पाडळीकर यांशीं इनसाफ करावयाची आज्ञा केली. त्यांनीं हरदुजणांच्या तकरीरा व जामीन रजावंदीनें घेऊन कर्यात मजकूरचे देशक आणून बाळकृष्ण वर्तकाजवळ कृत्रीम कागद होते त्यांची चौकशी करितां शंकराजी महादेव व आपाजी गोपाळ खेरे देशकुळकर्णी कर्यात मजकूर यांनीं सांगितलें कीं, दामाजी त्रिमल यांचे दस्तूरचे कागद ह्मणून वर्तकानें काढिले आहेत, त्यास दामाजी त्रिमल उपजोन एकशें पंचवीस तीस वर्षें झालीं. व मरोन पांसष्ट वर्षें झालीं. कागदास एकशें साठ वर्षें होतात. कागद दामाजी त्रिमलाचे हातचे नव्हेत. कृत्रिम आहेत ह्मणोन बोलले. मुधोजी वाणस त्याचा पुत्र कृष्णाजी त्याचा खंडो कृष्ण याचा हल्लीं बाळाजी खंडो असे चार पुरुष सदरहू प्रमाणें दोन्ही वतनें अनभवीत आले. वर्तकाचें कुळकर्ण असें कधींही ऐकिलें नाहीं. व हल्लीं कागद काढिले, तेही आपणांस ठावके नाहींत, ह्मणोन समस्त देशकांनीं साक्ष दिली. कागदास स्पष्ट रंग धूर व शाई हीं नवीं बोटानें शिक्के केलेले दिसतात. जुने कागद नव्हेत. त्याजवरून वर्तकाचे कागद कृत्रिम झाले, व भोगवटाही त्याचा नाहीं. याजकरितां इनसाफाचे रुईनें वर्तक खोटा झाला. पंचाइतांनीं त्याचें येजित पत्र घेऊन आपणांस दिलें. तें हुजूर आणून दाखविलें. निवाडपत्र द्यावयाशी आज्ञा झाली. पत्रें तयार होत असतां येजितपत्र मजपासून गमाविलें. याजकरितां दुसरें येजितपत्र देवावें ह्मणून विनंति हुजूर केली. त्याजवरून सरकारांतून वर्तकास तगादा केला. तो ब्राह्मणपणाचें हिमायतीनें रवेईस आला. त्यास सदरहू इनसाफाचे कागदपत्र आहेत ते मनास आणून मजवरी कृपाळू होऊन भोगवटीयास निवाडपत्र करून द्यावयाची आज्ञा झाली पाहिजे ह्मणून. त्याजवरून मनास आणितां वर्तकानें कृत्रीम कागद काढून तुझ्या वतनास मुजाईक झाला होता. परंतु भोगवटा चालला नाहीं. इनसाफाचे रुईनें वर्तक खोटा झाला. सदरहू वतनाचे कागदपत्र होते ते त्यानें सरकारांत दिले. येजितपत्र लिहून दिलें होतें तें तुवां हुजूर आणून रुजू केलें होतें. परंतु तुवां गमाविलें. यामुळें वर्तकास येजितपत्राविषयीं तगादा केला. त्यानें धटाई करून येजितखत न देई यास्तव त्यांस गंगापार केला; तुझा भोगवटा चार पुरुष सदरहू वतनावरी आहे हें देशकांनीं निवेदन केलें. त्यावरून तुझीं दोन्ही वतनें खरीं जाणून तुजवरी कृपाळू होऊन हें निवाडपत्र सादर केलें असें. तरी मोजे मजकूर देखीलवाडा, नाचणें, जुवे, व मिर्या येथील कुळकर्ण व पेठ शिवापूरचें मीठ बंदरचें पथकीपण हक दक मानपान इनाम इकराम कानू कायदेसुद्धां सुदामत चालत आल्या प्रमाणें, तुह्मी व तुमचे पुत्र पौत्रादी, वंशपरंपरेनें अनभवून सुखरूप राहणें. वतन संबंधीं तुझे माथां

हरकी रुपये ३०० तीनशें करार केले असेत, सरकारांत भरणा करून पावल्याचा जाब घेणें; तेणें प्रमाणें मजुरा असेत, ह्मणोन मशारनिल्हेचें निवाडपत्र १.

येविशीं.

देशमुख व मोकदम व
कुलकर्णी सुभा कर्यात नेवरें
प्रांत राजापूर. १
देशाधि लेखक वर्तमान
व मावी यांस. १

मौजें.

खोत व माहाजन मौजें
झाडगांव देखील वाडा, नांचणें, जुवें व मिर्या
व मीठ बंदर पेठ शिवापूर कर्यात मजकूर यास. १

४

किता कीं निवाडपत्रें करून २
दिलीं आहेत. याप्रमाणें हकदक
मानपान कानूकायदे सुदा-
मत प्रमाणें वाणस यांजकडे
चालवणें ह्मणोन.

१ मोरोजी शिंदे नामजाद
तर्फ रत्नागिरी.
१ इनामदार कर्यात नेवरें यास. ६
चिटनिशी पत्रें.

बाळाजी खंडो वाणस याजकडे नजर रुपये ३०० तीनशें करार केले ते वसूल होणें असेत.

## १० खोटें नाणें.

इ. स. १७४८–४९.
**तिस्सा आर्बैन मया व अलफ.**
मोहरम १४.

[ ९७ ] गोविंद नाईक देवळे हे नवे तकलुबी रुपये पुण्यामध्यें सोनार करीत होते, त्यांमध्यें होते, सबब त्यांजकडे गुन्हेगारी करार केली. तूर्त घ्यावे असा करार. रुपये. २०००.

सदरहु दोन हजार रुपये करार करून नाईक मशारनिल्हेस कौल लिहून दिल्हा असे. सदरहू रुपये शंकराजी नाईक भिड यांजपासून घ्यावे.

## 10 Counterfeit coin.

A. D. 1748-49.

( 97 ) Govind Naik Dewle being implicated along with some goldsmiths in Poona, in coining counterfeit Rupees, was fined Rs. 2000.

[ ९८ ] जमा कमाविस मोरा सोनार वस्ती पेठ आदितवार कसबें पुणें याणीं तकलुबी शिक्के करून खोटे रुपये केले. त्याजवरून सोनार मजकुराचें पारपत्य करून घर सरकारांत ठेविलें, त्याची किंमत अजमास बरहुकूम यादः—

इ. स. १७४८–४९.
**तिस्सा आर्बैन मया व अलफ.**
सफर २६.

| | रुपये. |
|---|---|
| जिवाजी गणेश. | ७०० |
| जाजती. | ४०० |
| | ११०० |

एकूण अकराशें रुपये करार करून आपाजी जैन वस्ती पेठ बुधवार कसबें मजकूर यास सदरहू घर दिलें असे.

सदरहू रुपयांची निशा करून घेऊन मग घर याचें स्वाधीन करणें, ह्मणोन राजश्री अंताजी नारायण यांस सनद लिहून दिली असे.

## ११ बदकर्म.

[ ९९ ] अंबाजी दादाजी कमाविसदार नक्त बंद तर्फ पाल यास पत्र कीं, भिकाजी गौळी चौगुला हवेली पाल यानें बदकर्म केलें, सबब हुजूर विदित झालें. त्याजवरून गौळी मजकूर जिशीं गेला त्या गौळणी सुद्धां तूप वजन कच्चे खंडी १ एक करार केलें असें. तरी सदरहूचा वसूल करून सरकारास पावतें करणें ह्मणून पत्र. सदरहू तुपाचा ऐवज अमलदारांस मजुरा न द्यावा येणें प्रमाणें करार केलें असें.

इ. स. १७४६–४७.
**सबा आर्बैन मया व अलफ.**
जमादिलाखर २.

[१००] गाडीवान मुसलमान याचे बायकोनें बद अमल केला याजकरितां बायको मजकूर तुह्माकडे पाठविली आहे. तरी इजला जंजिरें अरनाळा येथें ठेऊन इमारतीचें वगैरे काम घेत जाणें. अडेसरी सिरस्तेप्रमाणें देणें ह्मणून शंकराजी केशव नामजाद प्रांत वसई यांस पत्र १.

इ. स. १७४७–४८.
**समान आर्बैन मया व अलफ.**
जिल्काद १३.

---

( 98 ) Mora Goldsmith of Peth Aditwar, with the help of false impressions manufactured counterfeit rupees. He was therefore punished and his house was confiscated. It was sold for Rs. 1100.

A. D. 1748-49.

## 11 Adultery.

( 99 ) Bhikaji, a cowherd, committed adultery with a woman of the same caste. They were ordered to give ghee, one Khandy in quantity, by way of fine.

A. D. 1746-47.

( 100 ) The wife of a Musalman Cartman, committed adultery. Orders were issued to Prant Bassein to keep her at fort Arnala, and to employ her as a labourer on the works.

A. D. 1747-48.

[१०१] देवजी पराता कोळी याची बायको रांडकी इजवर तुफान बद अमलाचें ठेऊन किल्ले मजकुरीं आणिली आहे ह्मणून तिचे गोतानें हुजूर येऊन अर्ज केला कीं, गोताचे लेंकरूं बटीकपणांत न घालवें. त्याजवरून गरत बायकोवर नजर देऊन तिजकडे गुन्हेगारी रुपये ५० करार केले असेत. तरी सदरील पन्नास रुपये किल्ले मजकुरीं घेऊन देवजी पराता याची बायको सोडून गोताचें स्वाधीन करणें ह्मणून बाबाजीराव राणे नामजाद किल्ले चांदवड यांस सनद १.

इ. स. १७५४–५५.
**खमस खमसैन मया व अलफ.**
जमादिलावल १५.

[ १०२ ] नरसोजी बिन कृष्णाजी चव्हाण वस्ती कसबें खंडाळें, परगणें मजकूर, हल्लीं वस्ती मौजें पाराळें, परगणें खंडाळें, याचा लेक शंकराजी यानीं शाबजी बिन गंगाजी चव्हाण वस्ती मौजें मजकूर याचे बायकोशीं बदअमल केला. याज करितां शंकराजीस हुजूर आणिलें. त्यास तो गैरहजीर झाला. पळोन गेला. सबब नरसोजी त्याचा बाप यास हुजूर आणून सरकारची गुन्हेगारी करार केली छ. ७ रमजान रुपये ५०० पांचशें रुपये गुन्हेगारी करार केली. एक महिन्यानें आणून द्यावे. या प्रमाणें करार केला असे. यास जामीन देवजी बिन चडकोजी पाटील आहीर मौजें पाराळें यास घेतलें असे. एक महिन्यानें नरसोजीनें रुपये न दिले तर देवजीनें द्यावे. या प्रमाणें करार करून कतबा लिहून घेतला असे. नरसोजी पासून कतबा लिहून घेतला असे मौजे मजकुरीं जवळपास गांवीं राहू नये या प्रमाणें कतब्यांत लिहून घेतलें असे.

इ. स. १७५५–५६.
**सिखमसैन मया व अलफ.**
रमजान २१.

---

( 101 ) A Sanad to Babajirao Rane, officers of fort Chanwad. The widow of Dewji Parata Koli has been brought to the fort on a charge of misconduct ( adultery ). Her castemen have come to the Huzur and requested that she should not be made a slave. Having regard to her status, a fine of Rs. 50 has been inflicted on her. You should on receiving the fine, release the widow, and hand her over to her caste-men.

A. D. 1754-55.

( 102 ) Shankaraji, son of Narsoji bin Krishnaji Chawan of Kasba Khandala at present residing at Mouza Parola in Pargana Khandala, committed adultery with the wife of Shahaji bin Gangaji Chawan of the same village. Shankaraji was therefore ordered to be brought to the Huzur. He failed to appear, and absconded. His father Narsoji was therefore brought to the Huzur, and fined Rs. 500 ( Narsoji was directed not to reside in the village in question or in any of the surrounding villages. )

A. D. 1755-56

इ. स. १७५५–५६.
सित खमसैन
मया व अलफ.
जिल्हेज २९.

[१०३ खंडेराव काकडे हवालदार व कारकून किल्ले कोरीगड यांस सनद कीं किल्ले मजकुरीं तर्फ ओसर आधारणें पैकीं पवाराचें पोरीनें बद अमल केला ती तेथें अटकेंत आहे. ऐशास हल्लीं सदरील पोरीचें खंड रुपये ३० तीस करार करून वेदमूर्ति राजश्री गंगाधर भट कर्वे यांस कुणबीण देवविली असे. तरी सदरील तीस रुपये वेदमूर्ति पासून तुह्मी घेऊन कुणबीण त्यांचे हवालीं करून पावलीयाचें कबज घेणें ह्मणून सनद १.

इ. स. १७५९–६०.
सितैन
मया व अलफ.
जिल्हेज १६.

[१०४] अंदाई पाटलीण मौजे वडगांव कर्यात निंबसोड माईणी हिनें झगडपुरी गोसावी वस्तीं पुसेसावळी याशीं बदमल केला. याजकरितां हरदुजणांस हुजूर आणविली होती. त्यास बाळंभट वस्ती वडगांव निसबत माहादेव गोसावी यांनीं हुजूर येऊन, हरदुजणांविशीं विनंति अन्याय माफ करावयाविषयीं करून, हरदुजणांकडे गुन्हेगारी करार रुपये ७००० सातहजार यमाजी शिवदेव यांचे मार्फतीनें करार करून हरदुजणांचे नांवें अभयपत्रें कीं, सदरहू ऐवजाचा वसूल सरकारांत देऊन पावलीयाचा जाब घेऊन सुखरूप राहणें, कोणेविशीं ज्याजती उपसर्ग लागणार नाहीं ह्मणून अभय पत्रें:—

१ अंदाई घारगी पाटलीण मौजें वडगांव.
१ झगडपुरी गोसावी मौजें पुसेसावळी.
———
२

सदरील ऐवजाचा हवाला यमाजी शिवदेव यांजकडे मुदत माहे.

## १२ फुसलावून नेणें.

इ. स. १७२०–२१.
इहिदे अशरीन
मया व अलफ.
रबिलाखर २१.

[१०५] डोंगरी पाटलानें सोनाराची मुलगी धरून नेली सबब १०६|||.

---

(103) A girl of the Powar family at Korigad in tarf Asher Adharne having committed adultery, was kept in imprisonment, and was as a slave to Gangadhar bhat Karve for Rs. 30.
A. D. 1755-56.

(104) Andai, a female of the Patel family of Wadgaon in Karyat Nimsod Mayni, having committed adultery with Zagadpure Gosavi of Puse-Sawali both the persons were brought to the Huzur. Intercessions were made on their behalf for a pardon of their offences. They were fined Rs. 7000 and were released.
A. D. 1759-60.

## 12 Abdiction.

(105.) A gold-smith's girl was taken away by Dongri Patel. The latter was fined Rs. $106\frac{3}{4}$.
A. D. 1720-21.

## १३ एक नवरा जीवंत असतां दुसरा करणें.

[ १०६ ] निंबाजी वल्लद येसू झगडा सिन्नरकर यानें धोंडजी माळी सिन्नरकर याच्या बायकोशीं पाट लाविला. धोंडजी मजकूर विदेशास गेला ह्मणोन बापूजी माळी, धोंडजी माळी याचा सासरा, यानें आपले रजावंदीनें लेक दिल्ही. परंतु निंबाजी मजकूर यानें धोंडजी मजकूर मेला अगर जीवंत आहे अशी तहकीकात न कारितां पाट लाविला. त्याजवर धोंडजी मजकूर हल्लीं हजीर झाला. सबब निंबाजी माळी याजकडे गुन्हेगारी करार रुपये ८० ऐशी रुपये. इस्तकबील वैशाख तागाईत श्रावण अखेर पावेतों झाडा करून द्यावे. या प्रमाणें करार असे. बरहुकूम कतबा.

इ. स. १७५२-५३. सलास खमसैन मया व अलफ. रज्जब ३०.

## १४ भूमीगत द्रव्य.

[ १०७ ] माणको बल्लाळ सुभेदार परगणें कर्डे रांजणगांव यांस पत्र कीं, माणकोजी पाटील मौजें निंब्रोणें तर्फ देपूर परगणें संगमनेर, यानें आपलें ठेवणें नग नगोटे रुपये साहाशें रुपयांचें किंमतीचें मौजें मजकुरीं आपले मळियांत होतें. तें काढिलें. हें वर्तमान हुजूर कळल्यावर याची पुरशीस केली. त्यास हा आपलें ठेवणें एवढेंच होतें, ज्यास्तीं कांहीं नव्हतें ह्मणोन क्रिया करावयाशी राजी झाला असे. त्यास हल्लीं तुह्मांकडे पाठविला असे. तर याजपाशीं रांजणगांवची क्रिया घेणें कीं सदरहू वस्तवानी आपली आहे. या शिवाय जाजती कांहीं नाहीं. ऐसें वदवून त्यास मुदत बोलली असेल ते तेथील दस्तूर बमोजीब करून क्रियेस लागला तर हुजूर पाठविणें. क्रियेस न

इ. स. १७४६-४७. सबा आर्बैन मया व अलफ. रबिलावल १५.

---

## 13 Marrying during the life time of a husband.

(106.) Nimbaji Wallad Esu Zagada of Sinnar married the wife of Dhondji Mali of the same village. Bapuji mali, Dhondj's father-in-law gave his consent to the marriage, as Dhondji had gone away to foreign parts. Nimbaji however made no inquiries to ascertain whether Dhondji was alive or dead. Dhondji having subsequently appeared, Nimbaji was ordered to pay a fine of Rs. 80.

A. D. 1752-53.

## 14 Treasure Trove.

(107.) Information was received at the Huzur that Mankoji Patel of Nimbone in Tarf Depur of Prant Sangamner had taken out some ornaments from his field where they had been buried by him. Inquiry was made. The Patel averred that the ornaments taken out by him were worth Rs. 600 only, and offered to undergo any ordeal to prove the truth of his statement. He was therefore sent to Ranganjaum. Orders were issued to the subhedar of Karde Ranjangaum to release him if he success-

A. D. 1746 47.

लागला; खरा जाहला, तर त्यास निरोप देणें. याचे सदरहू रुपयांचे मालाची चौथाई सरकारची येणें आहे. त्याची निशा राजश्री विनायक दीक्षित पटवर्धन यांजकडे लागली आहे. निशा करतील. पाटील मजकुरास हुजूर जामीन घेतला असे ह्मणोन पत्र १.

## १५ जादुगिरी.

[ १०८ ] नारो त्रिंबक तालुके विजेदुर्ग यांस पत्र कीं बाळ महाजनी खोत मौजें गांवखड तर्फ लांजें याणें गणेश विठ्ठल गोखले याजवर भूतें घालून पांच सात जागा पड झाली. खरें झालें. परंतु त्यानें वारावर न केली. हल्लीं उभयतांस हुजूर आणून मनास आणतां कांहीं भूतें व मानणुका केल्या खऱ्या ह्मणोन बाळ यानीं आपले मुखें कबूल होऊन कबूल कतबा लिहून दिला. त्यावरून पेशजी भुताळ्याचें पारपत्याविषयीं साऱ्या तालुक्यास कागद सादर केले आहेत. त्या प्रमाणें बाळ महाजनी याचें खोतींचें वतन अमानत करून कुटुंब सुद्धां वरघाटी घालवावयाचा हुकूम करून हें पत्र सादर केलें असे. तरी मशारनिल्हेचें खोतींचें वतन सरकारांत अमानत ठेवून कुटुंबसुद्धां वरघाटीं पोहोंचवून देणें व घर मोडून टाकणें. वस्तभाव गुरें ढोरें त्याची त्यास नेऊं देणें. या कामास सुभांतून दहा माणूस व एक कारकून देऊन सदरहू प्रमाणें करवणें. मशारनिल्हेस हुजूरच ठेविलें असे. माणसें वरघाटी जेथें येतील, तेथें यांस रवाना केला जाईल. ह्मणोन मशारनिल्हेचे नांवें पत्र १ पाठविलें.

इ. स. १७५९-६०. सीतैन मया व अलफ. जिल्हेज २५.

---

fully passed through the ordeal and to send him to the Huzur if he failed. Security for the payment of one-forth of the value of the ornaments, leviable by Government was taken at the Huzur.

## 15 Practice of Witchcraft and Sorcery.

(108.) A letter to Naro Trimbak of Taluka Vijaydurga. Bal Mahajani Khot of Mouza Gaumkhed in Tarf Lanje subjected Ganesh Vithal Gokhale to the influence of evil spirits, and this was proved against him at 5 or 7 places where the fact was tested. No steps were however taken by Bal for dispossessing Ganesh of the said spirit and both have now been brought to the Huzur. Bal himself admits that he did invoke evil spirits and that he did make vows to them, and has given in a statement to that effect. Having regard to the orders already issued to all the Talukas for the punishment of persons exercising witchcraft, Government direct that the Khoti watan of Bal Mahajani should be attached, and that he and his family should be expelled from Konkan to the territory above the Ghats. He might be permitted to remove his property, cattle &c.

A. D. 1759-60.

## ७ न्यायखातें.

### ( क ) न्यायखात्यांतील कामगार.

[ १०९ ] शहर अमदाबाद येथील कोतवाली राघोशंकर यांजकडे होती; त्यास दरम्यान मशारनिल्हेस दूर करून त्रिंबक नाईक पाठविले होते. हल्लीं त्यांस दूर करून राघो शंकर पेशजी प्रमाणें करार करून पाठविले असेत. सनद पैवस्तगिरीपासून यांजपासून कोतवालीचें काज काम घेत जावें. वेतन पेशजीचें सनदेप्रमाणें पावीत जाणें ह्मणून श्रीपतराव बापूजी यांस सनद. रसानगी चिठ्ठी.

इ. स. १७५५-५६.
**सीत खमसेन मया व अलफ.**
जमादिलाखर २६.

[ ११० ] बाळाजी धोंडदेव यांस प्रांत वांई येथील पाहणीच्या सेववर ठेवून पन्नास रुपये सरकारच्या ऐवजीं तुह्मांकडून सन समानांत व सन तिस्सांत पावले आहेत ह्मणून मशारनिल्हेनीं विदित केलें. यास हल्लीं मशारनिल्हेस हुजूर न्यायाधिशाकडे लिहिण्याचें कामकाजास ठेविले आहेत. त्यास सन सम्मान व सन तिस्सांत दरसाल पन्नास रुपये पावत असले तर सालगुदस्त सन सितैन व सालमजकूर सन इहिदे सितैन दुसाला रुपये १०० एकशें तुह्माकडून देवविले असत. प्रांत वांई येथील ऐवजीं पावते करून कबजा घेणें ह्मणोन शामराव अंबाजी प्रांत वांई यांस सनद १. रसानगी यादी.

ईं. स. १७६०–६१.
**इहिदे सितैन मया व अलफ.**
सफर ११.

[१११] मौजें कुरकुडें तर्फ हरचिरी प्रांत राजापूर येथील खोतीचा विठ्ठल गोविंद आंबर्डेकर व जगन्नाथ कृष्ण पेंढारकर या उभयतांचा कजिया आहे. त्याची मनसुबी हुजूर आली. त्याचा निवाडा वेदमूर्ति राजश्री रामशास्त्री यांजकडे होत आहे. सड्या साक्षीमुळें पेंढारकरांकडे खोती चालावयाचा अन्वय नाहीं. याची मखलशी करून खरा होईल त्याचें स्वाधीन करावी. त्यास खासा स्वारी बाहेर निघाली, याकरतां मौजें मजकूरची खोती पेंढारकराकडे चालत आहे ते दूर करून सरकारांत जप्त करावयाची आज्ञा केली असे. तरी मौजे मजकूरची खोती सरकारांत ठेवणें. त्याची कमावीस राजश्री अंताजी नारायण यांजकडे सांगितली असे. तरी खोतीचें कमाविशीचें

इ. स. १७६०–६१.
**इहिदे सितैन मया व अलफ.**
रविलाखर २३.

---

## 7 Administration of Justice.

### (e) Judicial officers.

A. D. 1756-57. ( 109. ) Ragho Shankar was appointed Kotwal at Ahmedabad.

( 110. ) Balaji Dhondueva who was employed on the duty of inspection ( of lands, crops &c.) at Wai, was appointed to do the writing work in the Judicial Department, at the Huzur.

A. D. 1760-61.

( 111. ) A complaint regarding the Khotiship of Kurkude in Prant Rajapur came up for decision at the Huzur and was referred to Ramshastri for enquiry. As the Peshwa was going out on tour and it was not possible to dispose of the matter at an early date

A. D. 1760-61.

कामकाज यांजपासून घेणें ह्मणोन मोरोजी शिंदे यांस सनद तालुके रत्नागिरी. सनद १. रसानगी यादी.

## ( ड ) पोलिस.

[ ११२ ] रामचंद्र कृष्ण कमाविसदार पंढरपूर यांत पत्र कीं, परगणें मोहळ पैकीं साहा गांवची रखवाली, पेशजी तुह्मांस सांगितली होती. त्यास रखवाली सोडावयाविशीं राजश्री महाराव जानोजी निंबाळकर यांनीं रदबदली केली. त्यावरून सदरील साहा गांवची रखवाली सोडिली असे. तरी या उपरीं तुह्मीं रखवालीचा उपसर्ग न करणें. पाटिला पासून रखवालीच्या ऐवजाचे कतबे घेतले असतील ते माघारे देणें. ये विषयींचा बोभाट फिरोन येऊं न देणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७५२–५३.
सलाम खमसैन
मया व अलफ.
जिल्काद १७.

इ. स. १७६०–६१.
इहिदे सितैन
मया व अलफ.
रबिलावल १७.

[ ११३ ] श्री खंडेराव वास्तव्य मौजे पालीं तर्फ उंब्रज, प्रांत कराड येथें पौष शुद्ध पौर्णिमेस यात्रा भरत असते. त्यास तेथील रखवालीस माणसें असामी:—

५० किल्ले सातारपैकीं गंगाजीराव खानविलकर यांजकडून व कारकून.
५० किल्ले वंदनपैकीं विठ्ठल आपाजी याजकडून कारकून १.
५० किल्ले चंदनपैकीं गोविंदराव मोरेश्वर पैकीं कारकून १.
———
१५०

एकूण दीडशें माणूस देविलें असे. एक महिना बेगमी करून एकेक कारकून देऊन राजश्री कृष्णाजी त्रिंबक पत्र पाठवतील ते समयीं पाठवून देणें. एक महिना तेथें ठेवणें ह्मणून सनदा ३.

माहिपतराव यांचे नांवें कीं तुह्मांजवळ साठ राऊत आहेत. त्यां पैकीं पंचवीस राऊत एक महिना बेगमी करून नगारेसुद्धां पाठवून देणें. ह्मणून महिनाभर ठेवणें सनद १.

४ रसानगी यादी.

---

the Khoti was ordered to be attached.

## (d) Police.

( 112. ) A letter to Ramchandra Krishna Kamavisdar of Pandharpur. You have been entrusted with the duty of entertaining additional force for 6 villages in Prant Mohol. At the intercession of Maharao Janoji Nimbalkar, it is directed that the addtional force shall now be withdrawn. You should not in future make any levy from the villages on this account. Any agreements that may have been taken from the Patels in regard to the cost of maintaining the force, should be given back.

A. D. 1753-54.

( 113. ) There being a fair on the full moon day of the month of Paush at Pali in Prant Karad, 150 men from the forts of Satara, Chandan& Wandan, and 25 horsemen were deputed for a month to keep order at the place.

A. D. 1753-54.

## ( ई ) तुरुंग.

[ ११४ ] त्रिंबकजी अहिराव हवालदार किल्ले लोहगड यांस पत्र कीं, कोळी मौजें वडवळी यांस राजश्री स्वामींनीं जमीन इनाम दिली आहे, त्याचा कजिया सांगत आहेत. सोबत कनाजी मायेकर व जावजी सूर्यवंशीं खासबारदार दिंमत चिमाजी जाधव यांजबरोबर पाठविले.

इ. स. १७४४–४५.
**खमस आर्बैन मया व अलफ.**
जमादिलाखर २८.

१ कानोजी येगरे.
१ धोंडजी शिंदा.
१ संताजी शिंदा.
―――
३

सदरहू जणांस पाठविले आहेत. यांस किल्ले मजकुरीं अटकेंत ठेऊन दररोज दर असामीस कैली ६४।. एक शेर प्रमाणें अडसरी पोटास पैवस्तगिरीपासून देत जाणें ह्मणोन लिहिलें असे. सनद १.

[ ११५ ] किल्ले माहुली येथें बंदिवान असामी आहेत ते पुत्र उत्साहानिमित्य सोडून दिल्हे.

इ. स. १७४६–४७.
**सबा आर्बैन मया व अलफ.**
सवाल ८.

२ ह्मशींचे चोर मौजें खरवली तर्फ अघई कबीले सुद्धां आहेत ते सोडून देणें.

१ गोमाजी ठाकूर.
१ भिवाजी सराई.
―――
२

१ बखत बिलंद दिमत लखधीर राजा पेठकर.
―――
३

तीन असामी सोडून देणें व बखत बिलंद याचीं घोडीं २ दोन व शिंगरू लहान १ एक अशीं हुजूर पाठविणें ह्मणून कर्णाजी शिंदे यांस पत्र १.

---

## (e) Prison.

( 114. ) Dhondji Scindia and Santaji Scindia who had a dispute in regard to an Inam land, were imprisoned at Lohgad. They were, while in prison, allowed ration at one seer each per day.

A. D. 1744-45.

( 115. ) Two thieves and their families and Bakhat Biland a servant of the Raja of Peith who were in prison at fort Mahuli were ordered to be released, in honor of the birth of a son to the Peshwa.

A. D. 1746-47.

इ. स. १७४८–४९.
तिस्सा आर्बैन
मया व अलफ.
सवाल २७.

[ ११६ ] राजश्री स्वामी यांनीं साताऱ्याहून चोर कैदेंत घालावयाशी पाठविले. त्यास सदरहू असामी किल्ले कोहन येथें पाठविले असामीः—

१ येसाजी चालका.
१ बहीरजी गाईकवाड.

२

एकूण दोन असामी किल्लेमजकुरीं ठेवून बेड्या घालून ठेवणें आणि पोटास अडशेरी नागली जुन्या दर असामीस दररोज कैली एक शेर प्रमाणें पैवस्तगिरीपासून देत जाणें ह्मणून पंताजी मोरश्वर यांशी सनद १.

इ. स. १७५०–५१.
इहिदे खमसैन
मया व अलफ.
जिलकाद २८.

[ ११७ ] उमाजी हणंगभोर हवालदार किल्ले धनगड यांस पत्र कीं हरी पोरगा यास किल्ले मजकुरीं अटकेंत ठेवावयास पाठविला आहे. तर पोरग्याचें पायांत बिडी घालून अटकेंत ठेवणें. नफर मजकुरास दररोज पोटास दाणा एक शेर प्रमाणें देत जाणें ह्मणोन सनद १.

इ. स. १७५१–५२.
इसन्ने खमसैन
मया व अलफ.
सफर ३०.

[ ११८ ] फिरंगी बंदिवान असामी ५ पांच विसापुरचे शिपाई असामी ५ यांजबरोबर पाठविले आहेत. त्यांस किल्ल्यावर अटकेंत ठेवून पोटास अडशेरी सिरस्तेप्रमाणें देत जाणें ह्मणोन दिपाजीराव येरुणकर नामजाद किल्ले राजमाची यांस सनद १.

इ. स. १७५१–५२.
इसन्ने खमसैन
मया व अलफ.
सफर ३०.

[ ११९ ] अमृतराव पासलकर हवालदार व कारकून किल्ले कुरडु यांस पत्र कीं फिरंगी बंदिवान असामी २ पाठविले आहेत. बिड्या घालून पाठविले आहेत. हे किल्ल्यावर ठेऊन अडिसरी दर असामीस शिरस्ते प्रमाणें देत जाणें. यांचे चौकीस शिपाई देऊन खबरदारी करीत जाणें. यांजबरोबर दिंमत हरजी जाधव, यांजकडील शिपाई दोन देऊन रवाना केले आहेत ह्मणोन छ. ४ सफरचें पत्र १.

---

(116.) Esaji Chalka and Bahirji Gaikawar, 2 thieves sent by the Raja for imprisonment, were despatched to fort Kohan. It was ordered that they should be fettered, and should be given ration at the rate of one Seer of old nagli per man every day.
A. D. 1748-49.

(117.) A letter to Umaji Hanang Bhor, Havaldar of fort Ghangad—Boy Hari is sent for being imprisoned in the fort. Shackles should be put round his feet, and he should be kept in confinement. Give him a Seer of grain for maintanance every day.
A, D. 1750-51.

(118.) A sanad to Dipajirao Yerunkar, officer of the fort of Rajmachi Five Portuguese prisoners are sent in charge of 5 sepoys of Visapur. Keep them in confinement in the fort, and pay ration as usual.
A. D. 1751-52.

(119.) A letter to Amritrao Pusalkar Havaldar of the fort Kurdu. Portugese Prisoners are sent in charge of two sepoys of Harjee Jadhao. Keep them in the Fort, and pay ration as usual.
A. D. 1751-52.

[१२०]बहिरजी बाळकवडे यांस पत्र कीं महिपतराव बाढे व सयाजी बाढे या हरदुजणांचा भाऊपणाचा कजिया आहे. सबब महिपतराव बाढे किल्ले कावनईस बराबर शेखलाल दिंमत दर्याखान जेजालंदाज परगणें आहे. तरी किल्ले मजकुरीं महिपतराव मजकूर ठेऊन चवकी पाहरा ठीक करणें. पोटास दररोज शेर देत जाणें- बिडी न घालणें. गैरअब्रु फारसी न करणें. दाहा माणूस चौकीस ठेऊन चवकी पहारा ठीक करणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७५३–५४.
आर्बा खमसैन
मया व अलफ.
जिल्काद. ५.

राजश्री केदारजी पवार खिजमतगार.

[ १२१ ] मलका कामाठी जमात लिंगा दिंमत तिमण्णा हा शिवाजी कृष्ण याजबरोबर पेशजी पुण्यास आला होता, त्यास सरकारचा ऐवज मशारनिल्हेचे घरीं होता. त्यापैकीं रुपये ८३२ आठशें बत्तीस घेऊन पळोन गेला. याजकरितां लिंगामजकूरास बंदींत घातला. मलका पळोन गेला. त्याचें ठिकाण नाहीं. लिंगा मजकुरास तगादा केला. परंतु द्यावयास ताकद नाहीं. त्याजवरून चिरंजीव राजश्री माधवराव याचें लग्न समयीं बटी खलास (?) केला. ते समयीं लिंगा मजकुरास आठशें बत्तीस रुपये माफ करून सोडला असे. तरी लिंगा मजकुरास तगादा न लावणें. आठशें बत्तीस रुपये माफ खर्च लिहिणें ह्मणोन येवजी लोहट हवालदार व कारकून किल्ले विसापुर यांस सनद १.

इ. स. १७५४–५५.
खमस खमसैन.
मया व अलफ.
सवाल २१.

---

(120.) A letter to Bahirji Balkawade. There is a family dispute between Mahipatrao Badhe and Sayajirao Badhe. Mahipatrao is therefore sent in charge of Shek Lal serving under Daryakhan of the artillery. He should be kept at the fort, and should be well guarded. One seer of grain should be given to him daily for subsistence. No fetters should be used. He should not be treated with much disrespect.

A. D. 1753-54.

(121.) Malaka Kamati belonging to the band of Linga under the command of Timanna, had previously come to Poona with Siwaji Krishna. While there he stole Rs. 832 of Government which were in the possession of the said person, and absconded, Linga was therefore put in confinement. Malaka who had absconded is not to be found. Linga was pressed for payment, but to no effect. He was released from prison, along with other prisoners on the occasion of the celebration of Madhavrao's marriage and the amount due from him was remitted.

A. D. 1854-55.

[ १२२ ] दुर्गोजी अहिरराव हवालदार व कारकून किल्ले लोहगड यांस सनद कीं रुस्तुमराव किल्ले मजकूर अटकेंत ठेवावयाशीं पाठविलें आहे. त्यास किल्ल्यावर मोकळें-ठेवून रखवाली करणें. कड्यावरून उडी टाकील अथवा वीष खाईल, ब्राह्मणाचा विचार आतताईपणा करुं लागेल तर करूं न देणें. तजवीजीनें जतन करणें. दररोज तांदूळ व नागली मिळोन पोटास कैली ४४१ एक शेर प्रमाणें देऊन ब्राह्मणाकडून पोटास घालवीत जाणें ह्मणोन सनद १.

इ. स. १७५५–५६.
सित खमसैन
मया व अलफ.
सवाल ६.

[१२३] मुजफरखानाकडील गोविंदराव आपाजी किल्ले चांदवड येथें कैदेंत आहेत. त्याचें कुटुंब सीरे येथें आहे. त्याच्या दोघी कन्या उपवर आहेत. एक दाहा वर्षांची व एक अकरा वर्षांची आहे. यंदा लग्न जरूर झालें पाहिजे. राहतां कामास नये. मशारनिल्हेची आई व बहीण दहा महिने अन्न घेत नाहीं. कुटुंबीं सोळा माणसें आहेत. तितक्यांस अन्नवस्त्र पुरत नाहीं. येविशीं आज्ञा करावी ह्मणून मशारानिल्हेचे बंधु अण्णाजी अप्पाजी यानीं विनंति केली. त्यावरून हें पत्र तुह्मांस सादर केलें असे. तरी गोविंदराव आपाजी याच्या दोघी मुली व बायका माणसें भाऊबंद सदरहू सोळा असामी कैदेंत आहेत तीं सोडून देणें. याशिवाय कोणी अटकेंत ठेविलीं असतील तींही सोडणें, व त्याच्या घरच्या ऐवजापैकीं एक हजार रुपयांची वस्तवानी दोघी मुलींच्या लग्नाबद्दल देणें ह्मणोन लक्ष्मण हरी कमाविसदार परगणें सीरे यांस चिटनिशी पत्र १.

इ. स. १७६०–६१.
इहिदे सितैन
मया व अलफ.
सफर ८.

---

(122) Rustoomrao was sent for imprisonment to fort Lohagarh. The officer of the fort was directed to keep him as a prisoner at large, and to take care that he did not throw himself or do such rash act, as being a Brahmin he was likely to do. He was to be allowed a seer of rice and nagli, and his food was to be prepared by a Brahmin.

A. D. 1755-56.

(123) A chitnishi letter to Laxamanrao Hari Kamavisdar of Pargana Sire, Govindrao Appaji, in the service of Mujpharkhan, is in imprisonment at Chandwad and his family is at Sire. His 2 daughters have reached the marriageable age, one being 10 years old, and the other 11 years. The marriages ought to be performed this year, and can not be postponed. The mother and sister of the said Govindrao have given up food for 10 months. There are in all 16 persons in the family, and they are suffering from insufficiency of food and clothing. Govindrao's brother, Annaji Appaji has brought these facts to the notice of Government. This letter is therefore written to authorize you to set at liberty the two daughters of Govindrao, his brother, his female and other relations numbering 16, and also any others who may be in confinement. You should pay out of the family estate of the said person, ornaments &c., worth Rs. 1000 for the marriages of the two daughters.

A. D. 1760-71.

[१२४] हरी दामोदर प्रांत जुन्नर यांचें नांवें सनद कीं राजश्री माधवराव बांडे याचीं माणसें किल्ले सिवनेर येथें आहेत. तीं आणून मौजें अलकुठी तर्फ कर्डे येथील ठाण्यांत ठेवण्याचा करार केला आहे. त्यांचे रखवालीस माणसें. असामी.—

इ. स. १७६१–६२.
**इसन्ने सितैन**
**मया व अलफ.**
साबान ३३.

२५ किल्ले शिवनेर निसबत नारो त्रिंबक याजकडून पंचवीस असामी देवविले आहेत.

२५ किल्ले चाकण येथें जुन्नर प्रांतपैकीं नामजाद लोक आहेत त्यांपैकीं पंचवीस असामी.

—

५०

येणे प्रमाणें पन्नास माणूस आणून मौजें मजकूरचें ठाण्यांत ठेवून माणसांची रखवाली चांगली करणें. आठ दिवसांनीं खबरदारी जुन्नर सुभाहून करावी. याचे रखवालीचे चौकशीस शाहणा माणूस सुभाहून ठेवणें. बांड्याचें माणसांस पोटास लागेल त्याची नेमणूक राजश्री नारो त्रिंबक करून देतील त्याप्रमाणें प्रांत जुन्नरपैकीं देत जाणें. त्या प्रमाणें मजुरा पडेल ह्मणोन

रसानगी यादी.

छ. ६ साबान सनद १.

# ८ सरकारी कामदार व ज्याहागीरदार यांचें गैरवर्तन.

[ १२५ ] कसबें सुकेणें परगणे चांदवड येथील पाटलानीं हुजूर येऊन अर्ज केला कीं, कमाविसदाराचा व आपला आकस पडिला आहे. याजकरितां आमच्या बचावास्तव सरकारचा हुजऱ्या द्यावा ह्मणोन; त्यावरून अंदोजी मान्या हुजूरून पाठविला आहे. त्यास कमाविसदार तुह्मांशीं आकस करूं लागला तर अंदोजी करूं देणार नाहीं. अंदोजी मजकुरास सरकारचे ऐवजाशिवाय रोजमुरा दरमाहे रुपये १० दाहा प्रमाणें देवविले आहेत. देत जाणें. कमाविसदारास व तुह्मांस हुजूर बोलाविलें आहे. पुढें तुमचें व कमाविसदारांचें वर्तमान मनास आणून विल्हे केली-यावर हुजऱ्यास हुजूर आणविला जाईल ह्मणोन गांवास पत्र १.

इ. स. १७४६–४७.
**सबा आर्बैन**
**मया व अलफ.**
रविलाखर १९.

---

(124) The family of Madhavrao Bande, which was at Siwaner was ordered to be removed to the Thana of Alkuti in Taraf Karde, and fifty men were deputed to keep watch over them.

A. D. 1761-62.

## VIII. Misconduct of Government officers and Jahagirdars.

(125) The Mokadam of Kasbe Sukene in Pargana Chandwad, informed the Huzur that an enmity had sprung up between himself and the Kamavisdar, and prayed that an attendant, serving at the Huzur, may be sent with him for protection. Andoji Mane was therefore sent with the Patel and the latter was directed to pay the former at the rate of Rs. 10 per month. The Kumavisdar and Mokadam were called to the Huzur for an inquiry into their dispute.

A. D. 1746-47.

[ १२६ ] मौजे केळवें परगणे माहीम येथील रयतेस सन सल्लासिनांत नासिकचे मुक्कामीं

इ. स. १७४७–४७. सबा आर्बैन मया व अलफ. जिल्हेज २२.

पांचशें रुपये सूट दिली. ते रयतेस मजुरा पडली नाहीं. पाटलानें रुपये भक्षिले आहेत. ते देशमुखीकडे देववणें ह्मणून शंकराजी पंतास व गांवास पत्र १.

[ १२७ ] नारो भगवंत यांस पत्र कीं मौजे लोहवाडी येथील शिवेंत किल्ले विसापूर आहे.

इ. स. १ ७४७–४८. समान आर्बैन मया व अलफ. मोहरम ५.

त्यास लोहवाडीच्या पाटलानें येऊन किल्ल्याची जत्रा करावी येणें प्रमाणें शिरस्ता आहे. त्यास सालमजकुरीं दसऱ्याचे जत्रेस पाटण येथील पाटील आणून तुह्मी किल्ल्याची जत्रा करविली ह्मणोन लोहवाडीचा पाटील लोहगडास फिर्याद होऊन पाटणच्या पाटलापासून दाहा रुपये मसाला घेतला, त्यावरून तुह्मीं लोहवाडीच्या पाटलास वीस रुपये मसाला घेतला. पाटणच्या पाटलाचा मसाला लोहगडकर यानीं दिल्हा. आणि लोहवाडीच्या पाटलाचा मसाला तुह्मी दिल्हा नाहीं ह्मणून विदित झालें. त्यावरून हल्लीं देवविले असेत. तर पाटील मजकुराचा रुपये २० वीस घेतला आहे तो फिरोन देणें ह्मणोन पत्र १.

[ १२८ ] मोकद्दम मोजे राजुरी परगणें बेलापूर सरकार संगमनेर यास सनद कीं मौजें

इ. स. १७४८–४९. तिसा आर्बैन मया व अलफ. जमादिलाखर १६.

मजकुराची जहागीर पेशजी मोंगलापासून सरकारांत घेतली असतां दर्म्यान दगलबाजी करून सरकारांत रुजू होऊन जहागिरीचा वसूल न दिल्हा ऐसें नादान. हल्लीं मौजें मजकूर राजश्री केशवराव गोविंद यांजकडे कमाविशीनें दिल्हा असे. तरी मशारनिल्हेनीं रुजू होऊन जहागिरीचा वसूल

---

(126.) In San Sala Sin (1729-30 A. D.) remission of revenue to the extent of

A. D. 1746-.7.

Rs. 500 was granted to the village of Kelwe in Pargana Mahim. The amount remitted was however appropriated by the Patel. Orders were issued for the recovery of the amount from him.

(127.) The fort of Wisapur, being situated within the limits of the village of

A. D. 1747-47.

Lohewadi it was the right of the Patel to hold a fair at the fort. The Dasara fair at the fort in the current year was, at the instigation of Naro Bhagwant, held by the Patel of Patne. The Wisapur Patel complained to the fort officers, and a fine of Rs. 10 was levied by them from the Patel of Patne. Naro Bhagwant therefore levied a fine of Rs. 20 from the Patel. The fine levied from the Patel of Patne was subsequently restored to him. Naro Bhagwant was directed to restore also the fine levied by him from the Patel of Wisapur.

( 128. ) The Jehagir of Mouje Rajuri in Pargana Belapur of Sirkar Sangam-

A. D. 1748-49.

ner, was taken from the Mogals. But its revenue was fraudulently withheld by the Patel for a period of 9 years. A Kamavisdar was therefore appointed, and the arrears were ordered to be recovered.

सुरळीत देणें. व पेशजीचा जहागिरीचा ऐवज इस्तकबिल सन आर्बैन तागाईत सन समान पावेतों नव साल राहिला आहे. ते झाडियानिशीं मशारनिल्हेकडे वसूल देणें ह्मणून सनद १.

[ १२९ ] कमाविस मोकदम मौजे खोडद तर्फ नारायणगांव प्रांत जुन्नर यानीं कृष्णराव पारसनिस व कोनेर त्रिंबक यांस अंतस्थ रुपये ५० पन्नास देऊं करून कतबा लिहून दिल्हा. तो कतबा सरकारांत आला. सबब पन्नास जमा धरले असेत. सरकारांत वसूल घ्यावा कलम १.

इ. स. १६४८-४९.
तिसा आर्बैन
मया व अलफ.
मोहरम १.

[ १३० ] राणोजी बालकवडे यास पत्र कीं सदाशिव नारायण फडनीस किल्ले सुरगड यानीं राजश्री सदाशिवभट साने यांची कन्या बलजोरीनें नेऊन त्रिंबक हरी लेले यांचें लग्न केलें. त्यावरून पेशजी तुह्मांस पत्र सादर करून मशारनिल्हेची फडनिशी दूर केली आहे. त्यांस हल्लीं वेदमूर्ती राजश्री शिवभट खरे दरम्यान पडोन हजार रुपयांचे नग घालून सदाशिवभट साने यांची समजावीस केली ह्मणोन विदित केलें. त्यावरून मनास आणून मशारनिल्हेची फडनिशी किल्ले सुरगडची करार करून तुह्मांकडे पाठविले आहेत. तरी यांचे हातून फडनिशीचें प्रयोजन घेऊन वेतन पेशजी प्रमाणें पाववीत जाणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७५०-५१.
इहिदे खमसैन
मया व अलफ.
रजब २२.

[ १३१ ] माहादाजी रुद्र यांनीं विदित केलें कीं गुल महंमद अमील परगणें शेंदुर्णी यानें आपल्यावर जबरदस्ती पोंहचवून साहाशें रुपये यांजपासून घेतले असतील ते वसूल करून मशारनिल्हे यास पावते करून त्यांजपैकीं सरकारची चौथाई हुजूर पाठवून देणें. बाकी याची यास देणें ह्मणोन.

इ. स. १७५०-५१
इहिदे खमसैन
मया व अलफ.
जिल्हेज ३०.

माहिपतराव कवडे यास पत्र १.
विशीं मानाजी निकम यास १
२

(129.) A bond passed by the Mokadam of Khodad in Tarf Narayangaum of Prant Junnar promising to pay a bribe of Rs. 50 to Krishnrao Parasnis and Koner Trimbak, came into the hands of Government. The money was ordered to be recovered and credited to Government.

A. D. 1748-49.

(130) A letter addressed to Rɘnoji Balkavade:—Sadashiva Narayen Fadnavis of the Fort Surgad, having forcibly taken away the daughter of Sadashiva Bhat Sane, and married her to Trimbak Hari Lele, was dismissed from the office of Fadnavis. It has now been represented by Shivabhat Khare, that he has compromised the matter by making Sadashivabhat Sane put on ornaments worth Rs. one thousan d( on the person of the girl in question ). The said Sadashiva Narayen is therefore reinstated in his former post of Fadnvis of the Fort of Surgad, and is sent to you. Services as Fadnvis should be taken from him and he be paid salary as before.

A. D. 1750-51.

(131.) A Sanad to the following effect to Mahipatrao Kawade.—Mahadaji Rudra has represented that Gul Mahomed Amil of Shendurni, forcibly took Rs. 600 from him. You should recover the amount extorted and after remitting ¼ of it to Government, return the remainder to the said person. A letter to the same effect to Mahipatrao Kawade.

A. D. 1750 51.

[ १३२ ] शिवाजी बिन चापाजी सागला वगैरे वणजारे पाटील मौजे दापूर परगणें अकोलें व नथू बिन गोंदजी सानप मौजें निंबगांव परगणें सिन्नर हल्लीं वस्ती रनाळें, परगणें नंदुरबार हे सुरतेहून रिताड बैल सर २१०० घेऊन येत हाते. त्यास मार्गीं मौजें आष्टें परगणे नंदूरबार येथें नंदराम देशमुखाचा गुमास्ता व खंडेराव बांडे यांणीं बैल सदरील वसूल नेऊन अटकाऊन ठेविले. त्यांपैकीं बैल १६०० माघारे दिले. त्याची खंडणी रुपये ५८०० आष्टा-वनशें घेतले व पांचशें बैल अर्जांच घेतले. याजकरितां सदरील ऐवजापैकीं व बैलांपैकीं वसूल होईल त्याची चौथाई सरकारांत घ्यावयाचा करार करून ताकीद पत्रें दिलीं. बराबर धोकड-सिंग व दारकोजी गाईकवाड खासबारदार जमाव दामोदर ठाकूर. सदरीलचा कतबा लिहून घेतला असे. पत्रें बीतपशील:—

इ. स. १७५१-५२.
**इसने खमसेन मया व अलफ.**
जमादिलाखर १५.

१ खंडेराव बांडे याशीं.

१ नंदराम गुमास्ता देशमुख याशीं.

१ रामचंद्र माहादेव यांस पत्र कीं वसूल होईल त्याची चौथाई घेऊन हुजूर पाठविणें.

१ हिरामणी गोपिनाथ दिंमत कवडे.

१ रघोजी कदमराव यांशीं.

—

५ पांच पत्रें दिलीं असेत.

[ १३३ [ घनःशाम देवाजी दिंमत दामोदर महादेव कमाविसदार परगणे पेटलाद, यांशीं पत्र कीं अजबसिंग गुरव कसबें मजकूर यांनीं विदित केलें कीं आपली घरजागा आपले वडिलांची कसबें मजकुरीं आहे. त्याजपैकीं एक कोठडी-च्या विटा आपण दारका पारखास विकत दिल्या. त्यानें कोठडी शिवाय आणखी विटा आमचें घराच्या जोरावारीनें घेतल्या त्यांत आपले वडिलाची हातची ठेव रुपये ४६४ चारशेंचौसष्ट निघाले. सदरील रुपये चरवींत घालून ठेविले होते.

इ. स. १७५२-५३.
**सलास खमसेन मया व अलफ.**
जमादिलाखर १५.

---

( 132. ) A Banjari while taking 2100 bullocks from Surat to Nandurbar was obstructed at Asta in Pargana Nandurbar by the Deshmukh and laid under a contribution of Rs. 5800 and 500 bullocks. Orders were issued by the Peshwa for the recovery of a fourth of this contribution for Government.

A. D. 1751-52.

( 133. ) Treasure amounting to Rs. 464 found in the wall of a house, was appropriated by the Kamavisdar. The owner complained to the Peshawa who ordered that one fourth of the treasure should be credited to Government, and the remainder handed over to the owner.

A. D. 1752-53.

त्याजवरी बजिनस माझें बापाचें नांव आहे. सदरील रुपये निघाले ते दिवाणांत कळविल्यावर उभयतां कमाविसदारांही वांटोन घेतले. त्यास माझे वडिलांची जागा ठेवरेव माझे वडिलांचे हातचीं याजकरितां साहेबीं कृपाळु होऊन ठेवींचे रुपये निघाले आहेत ते माझे मजला पाहिजेत ह्मणून विनंति केली. त्याजवरून तुह्मांस लिहिलें असे; तरी सदरील रुपये यांचे वडिलांचे हातचे याचे जाग्यावर निघाले. याची चौकशी करून वाजवी यांचे रुपये असल्यांस सदरील रुपये तुह्मीं घेतले असतील त्याची चौथाई सरकारांत घेऊन, बाकी रुपये अजबसिंग मजकुरास देणें ह्मणोन पत्र १.

[ १३४ ] गंगाधर बल्लाळ कमाविसदार परगणें नाशिक यांस पत्र कीं बाळकृष्ण चौधरी पेठ कठडा उरदु वगैरे कसबें नाशिक यांजवर कसबें मजकूरची रयेत फिर्याद हुजूर आली. त्याजवर त्याचा फडशा करून बाळकृष्ण चौधरी याजकडे नजर रुपये १००० एक हजार करार केली असे. तरी बाळकृष्ण चौधरी याचा ऐवज माल तुह्मांजवळ आहे, त्याजपैकीं हजार रुपये घेऊन सरकारांत पाठवून देणें. बाकी राहिला ऐवज चौधरी मजकुरास देणें ह्मणोन सनद १.

इ. स. १७५३–५४.
**आर्बा खमसैन मया व अलफ.**
रमजान १३.

[ १३५ ] राघो गोविंद कमाविसदार परगणें नेवासें यांचे नांवें सनद कीं परगणें बेरसें येथील जमीदार वतन अनभवितात व गांव खातात; परंतु सरकारची नजर त्यावर दिल्ही.(?) सबब मजकूरचा कमाविसदार राघो यांजवरी तनकडा हुजूर येऊन केला तो शाबूत करून न दिल्हा. यास्तव त्यांचे गांवहक्क दस्तुर अनामत करावयास तुह्मांस आज्ञा केली असे. तरी परगणें मजकूरचे जमीदाराचा हक्क दस्तुर मानपान गांव जहागीर वगैरे कुल जें असेल तें जप्त करून सरकारांत वसूल घेणें ह्मणून सनद १.

इ. स. १७५४–५५.
**खमस खमसैन मया व अलफ.**
रबिलाखर ६.

जमीदार परगणें मजकूर यांस सनद कीं तुमचे जहागिरीचे गांव व हक्क दस्तुर मानपान कुल असेल त्याचा वसूल यांजकडे देणें ह्मणून सनद. गिरमाजी गोविंद यांस पत्र १.

रसानगी यादी.

---

(134) A letter to a Gangadhar Ballal Kamavisdar of Nasik. The ryots of Nasik having complained to the Huzur against Balkrishna Chowdhari of Pets Katada and Urdu &c., of Nasik. The complaint has been inquired into and Balkrishna Chowdhari is fined Rs. 1000.

A. D. 1753-54.

(135) The Jamidars (District Hereditary officers) of Pargana Berase made complaints against the Kamavisdar, but failed to prove them. Their Watans were therefore kept under attachment.

A. D. 1754-55.

[ १३६ ] नारो कृष्ण कमाविसदार कसबें सुरत यांस सनद कीं सुरतकर बोहरी यांनीं हुजूर येऊन विनंति केली कीं, आपणांपासून सुरतकर मोंगल व हबशी यांनीं तेहतीस हजार रुपये घेतले आहेत. व साहेबांकडील नारो कृष्ण यांनीं पांच हजार रुपये घेतले आहेत. त्यास आह्मी उदमी लोक, आह्मांपासून रुपये घेतले आहेत ते माघारे देववावे ह्मणोन. त्याजवरून हे उदमी लोक, शहरची आबादानी झाली पाहिजे हें जाणून, सुरतकर मोंगल व शिद्दी यांनीं तेहतीस हजार रुपये घेतले आहेत ते माघारे देविले. त्यांस पत्रें लिहिलीं आहेत. त्याप्रमाणें देतील. तुह्मीं सरकारांत रुपये ५००० पांच हजार घेतले ते माघारे बोहरी यास देविले असेत. तरी बोहरी यांस रुपये देणें. मोंगलानें तेहतीस हजार रुपये घेतले आहेत ते त्यांजकडून माघारे देविले आहेत. तरी बोहरी यांस वसूल करून देणें. जो ऐवज वसूल होईल त्यापैकीं सरकारची चौथाई बोहरी यांजपासून घेणें. तीन हिस्से बोहरी यांस देणें ह्मणून सनद १. रसानगी यादी.

इ. स. १७५४–५५. खमस खमसैन मया व अलफ. रबिलाखर ८.

पांच हजार रुपये तुह्मीं इंग्रजांबद्दल यांजपासून घेतले त्यास यांजपासून घ्यावयास दरकार काय ह्मणून पत्र सादर केलें असे. तरी तुह्मी पांचहजार रुपये यांस देणें. इंग्रजांपासून तुह्मीं उगवून घेणें ह्मणून लिहिलें असे.

[ १३७ ] हरजी शितोळे शिलेदार यांनीं मौजे सेदणें तर्फ पाबळ येथें विकत बाभळा सुमार १६ सोळा घेतल्या होत्या. त्या तुह्मीं सरकारांत तोफखान्याकडे घेतल्यात ह्मणोन हुजूर विदित केलें. ऐशीयास सदरील बाभळांची चौथाई सरकारांत घेऊन बाकी बाभळा मशारनिल्हेचे हवाला करणें. मशारनिल्हेनीं बाभळा विकत घेतल्या आहेत किंवा नाहीं हें चौकशी करणें ह्मणोन वासुदेव शिवाजी दिंमत तोफखाना यांस सनद १.

इ. स. १७५४–५५. खमस खमसैन मया व अलफ. रजब १८.

---

(136) The Boharis of Surat complained that the Surat Mogals and the Habshi ( Siddhi ) had taken from them Rs. 33,000 and Kamavisdar Naro Krishna Rs. 5,000; and prayed that the money might be returned to him. Letters were sent to the Mogal and the Siddhi to pay back the amount received by them. Naro Krishna was told that he had no business to levy Rs. 5000 from the Boharis on account of the English and was directed to pay back the amo nt, and to recover the same from the English.

A. D. 1754-55.

(137) A sanad to Wasudeo Siwaji of the Artillery. Government is informed that you have appropriated for the use of the Government artillery, 16 Babul trees purchased by Harji Sitole Silledar at Mouza Sendone in Tarf Pabal. You should return the trees to him, taking one-fourth of the number for Government. Inquiries should be made whether the Babuls have really been purchased by the said person.

A. D. 1754-55.

[ १३८ ] परगणें जामनेर येथील मामला राजश्री लक्ष्मण गोविंदराव यांजकडे जकाती सुद्धां आहे. परगणें मजकुरीं राऊत पाठवून धामधूम कारितात, गांव लुटितात ह्मणून हुजूर विदित झालें. त्यावरून ही सनद तुह्मांस सादर केली असे. तरी परगणें मजकुरीं धामधूम तुह्मी एकंदर न करणें. गांवगन्ना वसूल तुह्मीं घेतला असेल तो माघारा देणें. परगणें मजकुरीं येथील जकातीचा ऐवज जो होईल तो तुह्मांस मक्तीयांत मजुरा दिल्हा जाईल. तुह्मीं सनदे प्रमाणें अमल मशारनिल्हेकडे चालों देणें. या उपरी हिला हरकत एकंदर न करणें. ह्मणोन धोंडो कृष्ण व विसाजी दादाजी कमाविसदार जकात मोगलाई अमल प्रांत खानदेश यांस रसानगी यादी सनद १.

**इ. स. १८५४–५५. खमस खमसैन मया व अलफ. साबान २१.**

[ १३९ ] बाळको राऊत हशम खुद्द सरकार चाकरी आरमार प्रांत वसई यांस सन इसन्ने मध्यें इनाम पडजमीन बिघे ५ पांच देवविली ती राबती जमीन होती. ह्मणून लढा धरून त्याजपासून वसूल घेतला ह्मणोन हुजूर विदित झालें. त्यावरून बाळकोजी राऊत सरकार चाकरीचा माणूस, त्यास रयत करून जमीन दिली. ती मागें अमलदार होते त्यांनींच त्यास दिली. मग ती मागील लटक्या दिकती काढून माणसास हैराण करावें उत्तम नाहीं. तरी वसूल घेतला असेल तो माघारा देणें. पुढें मशारनिल्हेकडे सदरहू जमीन सुरळीत चालविणें ह्मणोन त्रिंबक विनायक प्रांत राजपुरी यांस सनद १. रसानगी यादी.

**इ. स. १७५५–५६ सित खमसैन मया व अलफ. रमजान १०.**

---

( 138 ) A Sanad to Dhondo Krishna and Visaji Dadaji Kamavisdar of Octroi and Monglai Amal of Prant Khandesh. The mamlat of Pargana Jamner (including the right to collect the octroi) is conferred on Laxman Govindrao. It is represented to the Huzur that you send troopers into the Pargana, and plunder the villages. This sanad is therefore issued and you are directed to abstain altogether from creating any disturbance in the Pargana. Any amount that you may have collected from the villages should be returned. The amount of your farm will be reduced by the sum that may be realized on account of Octroi in the said Pargana. You shall allow the above person to exercise jurisdiction over the province assigned to him without the least obstruction.

**A. D. 1754-55.**

( 139 ) An Inam land was given to a servant at Bassein. The officer of the province, however, under some pretext levied assessment on it in the next year. The Peshwa wrote to him saying that it was improper to trouble people by raking up old and frivolous complaints, and directed that the amount received should be returned.

**A. D. 1755-56.**

[ १४० ] शंकराजी केशव यांस पत्र कीं कोहजेचे अंमलदाराकडे तजकरा कलमें:—

इ स. १७५६–५७. सबा खमसैन मया व अलफ, जमादिलाखर ३०.

कलम १. भीम सातवी पुजारा श्री महालक्ष्मी मौजें विवळवेढें प्रांत आशेरी हा मेल्यावर नफर मजकुराचें घर खटलें त्यास बारा हजार रुपये सांपडले. २ हांडे पाटील ठाकूर मौजे दाभाणें परगणें आशेर यानें भीम सातवी याची बायको होती ते पाटाची केली. पाटाचा हुकूम ध्यावयास अंमलदारास रुपये २००० दोन हजार दिल्हे. ३. मौजें साखरें परगणें मनेर या गांवीं ठेवणें ह्मणून पैका आणिला आहे. कलम १.

एकूण तीन कलमांची चौकशी होऊन तत्वांत वर्तमान(?) केला पाहिजे. या कारितां हें पत्र तुह्मांस लिहिलें आहे. तरी याची चौकशी कारकून पाठवून करणें ते करावी. तुह्मीं आपल्या रुबरू आणून करणें तें करून, सदरील कलमांची चौकशी फार बारकाईनें करून सविस्तर लिहून पाठविणें ह्मणोन. छ: ९ जमादिलावर पत्र १.

[ १४१ ] कान्हो भगवंत देशपांडे परगणें राजदेहेरे सरकार दौलताबाद याचे मजकुराविशीं ताकीद पत्रें चिटनिशी पत्रें.

इ. स. १७५८ ५९. तिस्सा खमसैन मया अलफ. सवाल ८.

ताकीद पत्र शेठये व महाजन वगैरे वाणी उदमी पेठ नसरतपूर परगणें राजदेहेरे सरकार दौलताबाद परगणे मजकूरचे कमाविसदार व सरदेश मुख वगैरे यांची दहशत तुह्मीं धरून तजावजा जाहलां ऐशीयाशी

---

A. D. 1756-57.

( 140 ) A letter to Shankaraji Keshav.

The following charges of misconduct have been made against the officer of Kohaje.

1. That on the death of Bhim Satwi the worshipper of Shri Maha Laxmi of Mouza Wiwalvedhe in Prant Asheri, the officer caused his house to be dug up and removed Rs. 12000 found therein.
2. That he caused to be dug up certain treasure which was lying buried in the village of Sakhare in Paragana Maner.
3. That he received Rs. 2000 from Hande Patel, Thakur of Mouza Dabhane in Paragana Asher, for permitting him to marry by the Pat ceremony the wife of Bhim Satwi.

Government desires to ascertain how far the allegations in questions are founded on facts. You should therefore minutely inquire iuto the matter, by deputing a Karkun and also personally by calling up the parties concerned before, and should report the result in detail.

A. D 1758-59.

( 141 ) A letter promising protection was sent to the Shetiyas and Mahajans of Peth Nasaratpur in Paragana Rajdehere in Sirkar Dowlatabad, who had absconded through fear of the Kamavisdar and Sir Deshmukh.

येविशीं कौल सादर करावा. ह्मणजे शेटये महाजन वसवसा न धारितां पेठेची आबादानी करितील ह्मणोन कान्हो भगवंत देशपांडे परगणे मजकूर यानीं विनंति केली. त्याजवरून हें अभयपत्र सादर केलें असे. तरी तुह्मीं कोणे विशीं दहशात न धरितां पेठ मजकुरीं सुखरूप राहून उदीम व्यवसाय करून आबादी करणें. तुह्मांस कोणेविशीं उपसर्ग लागणार नाहीं. अभय असे ह्मणोन शेटये महाजन यांचे नांवें कौल १.

[ १४२ ] दरवेशी महमद अजाहत काजी कसबें सुपें यानें कसबें मजकूर येथील कसाबाची गाय मारली, त्याजकरितां हुजूर आणिलें होतें. त्यास काजी मजकुरानें सरकारांत न सांगतां मध्येंच कसाबापासून गुन्हेगारी दीडशें रुपये करार करून कसाबास सोडवून नेलें. याकारितां काजी मजकूर यास हुजूर आणून कैदेंत ठेविलें. त्यास हल्लीं दाजी नारायण देशपांडे यानीं रदबदली केली. त्यामुळें गुन्हेगारी रुपये १७५ पावणें दोनशें करार करून सोडून दिला असे. सदरहू रुपयांचा हवाला बाजी शिवाजी फडनीस कसबें मजकूर दिंमत बाजी हरी यांनीं घेतला असे. दोन महिन्यांनीं छ. १७ मोहरमीं रुपये सरकारांत ध्यावे. या प्रमाणें करार चिट्ठी. काजी अटकेंत होता त्यास सोडून देणें ह्मणोन जिवाजी गणेश यांस पत्र.

इ. स. १७६०–६१.
**इहिदे सितैन मया व अलफ.**
जिलकाद १७.

[ १४३ ] बाळाजी महादेव मांडवगणे अमीन प्रांत गंगथडी यांस पत्र कीं, परगणे पाटोदें येथील हिशेब सन सबा व संमान दुसाला दप्तरीं विल्हे लावला नव्हता याजमुळें तुह्मीं परगणे मजकूरचें कमाविसदारांस मसाला रुपये २०० दोनशें केला आहे. त्यास हिशेब दप्तरीं विल्हेस लागले. मसाला मना केला असे. तरी मसाल्याचा तगादा कमाविसदारांस न लावणें ह्मणून चिटणिशी पत्र १.

इ. स. १७६०–६१.
**इहिदे सितैन मया अलफ.**
जिलकाद २७.

[ १४४ ] किल्ले चंदनगड येथील हवालदार व कारकून यांस सनद कीं, किल्ले मजकुरीं जामदारखान्यांत साल गुदस्ता सन सित्तेनांत चोरी होऊन आठशें साडेबावीस रुपये गेले. त्याची हुजर चौकशी करितां जामदारखान्यापुढें चौकिदार होते. पाठीमागें खोलीचे भिंतीस भोंक पाडलें. तेव्हां चौकिदारांनीं खबरदारी करावी ती न केली. ऐशीयास याची बारकाई पाहतां मागील भिंतीचे भेंडे

इ. स. १७६०–६१.
**इहिदे सितैन मया व अलफ.**
जमादिलावल १७.

---

(142) Huzur by Derwesh Mahomed Ajahat Kazi of the village. The Kazi however took from the butcher a fine of Rs. 150, and released him without the knowledge of Government. The Kazi was therefore summoned, and was kept in confinement. Daji Narayan Deshapande however interceded on his behalf, and he (the Kazi) was ordered to pay a fine of Rs. 175, and was set at liberty.

A. D. 1760-61.

a butcher of Kasba Supa having killed a cow, he was brought to the

(143) A Kama visdar having failed to render accounts, the Amin of Gongthadi fined him Rs. 200. The accounts having been received the fine was remitted by the Peshawa.

A. D. 1760 61.

दगड काढिलेत. त्याची गडबड चाहूल पुढें चौकिदार बसले असतात त्यांस आयकों येते. असें असतां चौकिदारांनीं खबरदारी न केली. हें अंतर त्यांजकडे व किल्ले मजकुरीं कारभारी नारो गणेश निसबत गोविंदराव मोरेश्वर गोळे होते त्यानीं जामदारखान्या भोंवतालीं चौकी ठेवावी ते न ठेविली हे गाफिली कारकुनापासून जाहाली. याप्रमाणें दोघांतून अंतरें पडलीं. सबब यांजपासून ऐवज घ्यावा. रुपये:—

२७५ नारो गणेश कारकून निसबत गोविंदराव मोरेश्वर यांजपासून ऐवजाचा तिसरा हिस्सा.

५४७॥ पुढें चौकीस लोक ज्या दिवशीं चोरी झाली त्या दिवशीं होते त्यांजपासून त्यांचे दिं-
मतदारापासून मिळोन ऐवजाचे दोन हिस्से.

८२२॥-

येकूण आठशें साडेबेवीस रुपये सदरहू प्रमाणें घ्यावयास करार करून ही सनद तुह्मांस सादर केली असे. तरी नारो गणेश यांजपासून पावणे तीनशें रुपये रोख घेणें. लोकांचे पांचशें साडे सत्तेचाळीस रुपये त्यांचे नांवें बद्दलमुशाहिरा खर्च लिहिणें पत्र १.

# ९ इनाम नक्त नेमणुकी वतनें वगैरे.

## ( अ ) देणग्या.

### १ नोकरी केल्याबद्दल अगर नुकसानी झाल्याबद्दल अगर मेहेरबानी दाखल.

[ १४५ ] राजश्री बापूजी बाजीराव यांचे तीर्थरूप बाजी भिवराव पुरातन राज्यांतील सेवक एकनिष्ठपणें सेवा करीत आले. हल्लीं फिरंगाणचे मसलतेस तारापूरचे येलगरसमयीं युद्धांत कामास आले. यास्तव याजवरी कृपाळु होऊन मौजें रेठवडी तर्फ खेड प्रांत जुन्नर हा गांव मोंगलाई व बाबती व चोथाई व सरदेशमुखी व साहोत्रा देखील इनाम यांशीं व यांचे पुत्र पौत्रादि वंशपरंपरेनें दिल्हा असे. अनभवितील. या पत्राची प्रत लिहून घेऊन अस्सल प्रत भोगवटीयास मशारनिल्हेजवळ परतोन देणें. प्रती वर्षीं नूतन पत्राचा आक्षेप न करणें ह्मणून पत्रें दिलीं.

इ. स. १७४०–४१.
इहिदे आर्बेन
मया व अलफ.
सावान ७.

१ देशाधिकारी व देशलेखक वर्तमान भावी सुभा प्रांत जुन्नर.
१ देशमुख देशपांडे प्रांत जुन्नर.
१ मौजें मजकुरांत.

३

---

(144) A theft of Rs. 822-8 took place from the treasury of fort Chandangarh. The Karkoon in charge was ordered to make good one third of the amount for his failure to keep a watch round the building, and the guard on duty to make good the remaining ⅔ for their negligence.

A. D. 17 60-61.

# IX Grants and continuance of Inams, Allowances, Walans &c.

## ( A ) Grants.

### (1) For service done or injury received or as a mark of favour.

(145) Baji Bhiwrao lost his life in the battle of Tarapur during the Campaign against the Portuguese. A village was given in Inam to his family.

A. D. 1740-41.

१ राजश्री बाळाजी बाजीराव प्रांत जुन्नर यांस पत्र कीं मौजे मजकूरपैकीं सुभा वसूल येणें प्रमाणें द्यावा. वरकड इनाम दिल्हा असे. वसूल द्यावयाचा करार येणें प्रमाणें:—

चाकर मान पट्टी दरसाल. ६१ रुपये. शेरी रुपये २९ दरसाल.

मोंगलाईपैकीं रुपये ७ दरसाल. मिरास पट्टी जी वर्षा अजमास ७०

एकूण एकशें त्रेसष्टपैकीं दरसाल रुपये त्र्याणव व ती वर्षा अजमास मिरास पट्टी रुपये सत्तर येणें प्रमाणें मशारनिल्हेचे बद्दल मुशाहिरा खर्च झणोन लिहित जाणें झणोन सनद.

—

४

[ १४६ ] दिंमती राजश्री संभाजी शिंदे यांजकडील शिलेदार लोक साल गुदस्त जुंझीं पडले त्यांस पड जमीन दिल्ही. जमीन बिघे चाहूर १॥. याशीं गांवगन्ना नेमणूक पड जमीन:—

इ. स. १७४१–४२: इसन्ने आर्बैन मया व अलफ. रमजान १८.

१ खंडोजी कोकरे नासरजंग यांचे झुंजीं पडले त्यांस इनाम जमीन मौजें *** येथें मोंगलाई बाब.

-॥- निंबाजी मांसाळ किल्ले कावनईस वेढा मोंगलाचा पडला ते समयीं जुंझीं पडिले त्यांस मौजें *** येथें पड जमीन चावर निम.

—

१॥

दीड चाहूर जमीन दिल्ही येविशीं सनद.

[ १४७ ] दादाभाई व काऊसभाई बिन फरामजी अंध्यारु सावकार जंजिरें वसई यास वतन दलाली बंदर आगाशी व बंदर बोलीज जलमार्ग खाडी वैतरणी येथील दलाली सावकार बंदर मजकुरीं येतील अगर बंदर मजकुरीहून जातील त्यास सावकारी बंदर मजकुरीहून माल जाईल, अगर येईल, त्याजवरी दलालीस हक्क सावकार निसबत सावकारी मालास दर सद्दे

इ. स. १७४१–४२. इसन्ने आर्बैन मया व अलफ. सवाल २४.

---

(146.) During the siege of Kavanai by the Mogals and in a battle with Nasarjang in the preceding year Sambhajee Sinde's two Silledars lost their lives. Inam land was therefore given to their families.

A. D. 1741-42.

(147.) The watan of broker at the ports of Agashi and Bolij was conferred on Dadabhai and Kawasbhai bin Framji Adhyaru merchants of Bassein. The broker was entitled to receive an advalorem duty of Rs. 2 per cent. on the goods imported and exported.

A. D. 1741-42.

रुपये २ दोन दलालीचा शिरस्ता आहे त्या प्रमाणें करार करून दिल्हे असे. सुदामत बंदरमजकुरीची चाल दलालीची असेल त्या प्रमाणें वतन अनभवून सुखरूप राहणें ह्मणून दादा भाईचें नांवें सनद १.

[ १४८ ] आपाजी शितोळे नाव्हीकर चिमणाजी बापूजी यांचे निसबतीस होते ते मंडलीयावर ठार झाले. बरे मर्द माणूस कार्याचे होते. यास्तव त्यांचें सर्व प्रकारें चालवावें हें अगत्य. यास्तव त्यांचे पुत्र मुधोजी शितोळे शिंदे गव्हाणीं आहेत. त्यांस आपल्या जवळ आणून चार गोष्टी समाधानाच्या बोलोन बहुमान करून बावीस मोहरांची कडी २ दोन करून त्यांच्या हातीं घालणें. त्यांच्या मातुश्रीचें व बंधूंचें समाधान करणें ह्मणून चिरंजीव राजश्री सदाशिवपंत यांस पत्र.

इ. स. १७४२–४३.
**सलास आर्बैन मया व अलफ.**
जमादिलाखर २.

[ १४९ ] शेख दाऊद दरकार साहूकार साकीन ठाणे साष्टी यास राहावयास बक्षीस वाडा ठाणें मजकुरीं दिंमत रोलीस पिरीस किरिस्ताव ठाणें साष्टी याचा वाडा बाजारचे रस्त्याचे दक्षिणेस होता त्यापैकीं.

इ. स. १७४२–४३.
**सल्लास आर्बैन मया व अलफ.**
साबान १४.

वाडा हात.

९६ उत्तर दक्षण समेत रस्ते.
या मध्यें सात हात जागा
नवी घेतली आहे ते देखील.

४१ पूर्व पश्चिम
३९ वाडा.
२ गल्ली पश्चिमेकडे.
—
४१
—
९७

वाड्यांतील घर हात.

४२ उत्तर दक्षण.
३९ पूर्व पश्चिम.
—
८१

वाड्यांत झाडें.
१ माड.
१ शिताफळ.
१ सेवगा.
१ आंबा.

येणें प्रमाणें वाडा समेत घर व झाडें तुह्मांस दिल्हा असे. तुह्मी अवलाद अफलाद उदमी वेवसाय करून सुखरूप राहणें ह्मणोन सावकार मजकुराचे नांवें पत्र १.

येविशीं रामजी महादेव नामजाद प्रांत साष्टी यांस पत्र कीं सदरील वाडा समेत घर व झाडें बक्षीस दिलीं असेत यांचे हवाला करणें ह्मणोन पत्र १.

---

(148) A letter to Sadashivpant. Appaji Sitole of Nhavi, a brave and devoted officer was killed at Mandla. Sadashivpant was directed to invite his son, Mudhoji Sitole, and after condoling with him in his bereavement to honor him with a present of 2 golden rings.
A. D. 1742-43.

(149) A house belonging to a Christian of Salsette was granted to Shek Daud Darkar, merchant of Salsette, for residence.
A. D. 1742-43

इ स. १७४२-४३.
सल्लास आर्बैन
मया व अलफ.
रमजान १०.

[ १९० ] दिंमत शंकराजी केशव नामजाद प्रांत वसई यांजकडील पत्रें:-

मशारनिल्हेकडून प्रांत मजकुराच्या ऐवजीं देविले.

दर्यावरदी साहेबकामावर ठार झाले त्याच्या बालपरवेशा करार करून सन मजकुरापासून दर साल देविले.

भात कैली नक्त

| | | |
|---|---|---|
| जमा अहंमद आदा ओली- | | |
| जकर उमरजी आबदुला | | १० |
| आबदला एक सरकार | | १० |
| | | २० |
| दुरषस नबरंगा दिंमत | | १० |
| महमद अल्ली सारंग | | |
| | | ३० |

गोंदजी विश्वासराव याचा भाऊ
कानोजी विश्वासराव तळागडी
शामलाचे जुंझांत ठार झाला.
या कारितां गोंदजी मजकूर याची
असामी करार करून पाठविले.
यास तैनात.

.।. दरमाहे रुपये १२ बाराशाइ
.।. सिरस्ते प्रमाणें पावीत जाणें.

.॥.

.।. चाकरी घेऊन पावणें
ह्मणोन सनद.

.॥।.

येणें प्रमाणें साल दरसाल देणें ह्मणोन सनद १.

[ १९१ ] बहिरजी बालकवडे हशाम यांस पत्र कीं खंडनाक दिंमत भिकाजी केशव हशाम यास किल्ले त्रिंगलवडीस मेटावर वाघानें मारलें याकरितां त्याचे आईस सालीना मोईन रुपये ७ सात करार केले आहेत. साल मजकुरापासून साल दरसाल रुबरू ह्मातारी येईल तेव्हां सात रुपये देत जाणें ह्मणोन पत्र.

इ. स. १७४४-४५.
खमस आर्बैन
मया व अलफ.
मोहरम २१.

---

(150) In the battle with the Shyamal (the Shiddi of Jangira) some sailors were killed. Allowances were granted to their children at the rate of Rs. 10 in cash and rice ¼ of a Khandi, for each person every year.

A. D. 1742-43.

Govindji Vishwasrao having been killed in a battle with Janjirkar, his post of Rs. 12 a month was conferred on his brother Kanoji.

(151) Khandnak, a servant at fort Tringalwadi, having been killed by a tiger, his mother was granted an annual allowance of Rs. 7.

A. D. 1744-45.

[ १५२ ] बालपरवेसी फकीर महंमद दिंमत मुरारजी अणजुरकर हशम याचीं माणसें आई व बायको कल्याणांत राहतात. त्यांस कल्याणप्रांतपैकीं बालपरवेसी बद्द्ल भात दोन खंडी हुजूरचे सनदे प्रमाणें पावत असतें. त्यास सालमजकुरापासून माणसांची चौकशी करून आई बायको कल्याणांत असली तर दरसाल भात कैली खंडी २ दोन प्रमाणें साल मजकुरापासून साल दरसाल प्रांत कल्याणपैकीं देत जाणें ह्मणून चिरंजीव राजश्री सदाशिव चिमणाजी यांस सनद १.

इ. स १७४६–४७. सबा आर्बैन मया व अलफ. जिलकाद ?

[ १५३ ] राजश्री पिलाजी जाधवराव यांनीं वसईचे मसलतेस श्रम साहास करून स्वामीसेवा केली. यास्तव यांजवर कृपाळू होऊन मौंजे सांडे तर्फ अगर वसई परगणे सायेवानपैकीं इनाम करून दिल्हा बनाम मढी पाखडी बुद्रुकबिघे ७४१॥ सात बिघे दीड पांड पैकीं वजा बीतपशील.

इ. स. १७४७–४८. समान आर्बैन मया व अलफ. रजब ४.

| | | | |
|---|---|---|---|
| बाव खल पांड पांच | -।- | वाडीचे कुडणाखाले | |
| घरें वाडवडलांचीं तीन | ३ | चौंफेर घेरीयास व | |
| येकूण जमीन पांड लाहे व | | पाटाखालीं व झाडोऱ्याचे सायेवटास गेली. | |
| | -।-१॥ | | |
| | | पांड दहा | -॥- |

येकूण एक विघा दीड पांड बाकी जमीन बिघे ६ साहा यांत लागवड बागाईत झाडोरा बीतपशील.

| | |
|---|---|
| नारळी पेडें ८४ पैकीं | सुपारी झाडें ५ पांच |
| वजा गैरबारदार वगैरे | पैकीं गैरबारदार ५ बाकी० |
| ७ गैरबारदार | फणस १ एक ढांक उतार. |
| २ उमेदवार | आंबे झाडें ८ आठ. वजा. |
| ३ झीटें. | बाकी सुमार ८ |
| — | |
| २२ बाकी बारदार बासष्ट ६२. | |

ऐकूण आकार देखील जमीन व झाडझाडोरा मक्ता पांचवें सालची जार बेरीज रुपये ४० चाळीस व घरपट्टी वाडवलांचीं घरें ३ तीन एकूण रुपये ५ पांच एकूण रुपये पंचेताळीस

---

( 152 ) Two Khandies of rice was annually given to the mother and widow of Jakir Mahomed ( who apparentally died in the service of Government ) for their support.

A. D. 1746-47.

( 153 ) A hamlet in the province of Bassein was given in Inam to Pilaji Jadhavrao, for his exertions and enterprize during the invasion of Bassein.

A. D. 1747-48.

रुपयांची वाडी सदरहूप्रमाणें कुलबाव कुलकानू हल्लीं पट्टी व खेरीज हक्कदार इनाम करून दिल्हा असे. येविशीं पत्रें.

१ मौजे मजकुराचे मोकदमास पत्र कीं, सदरहू वाडी चतुःसिमा पूर्वक मशारनिल्हेचे दुमाला करून यांस व यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम चालवण. प्रतिवर्षीं नवीन पत्राचा आक्षेप न करणें.

१ मशारनिल्हेस पत्र कीं सदरहू वाडी आपले दुमाला चतुःसिमापूर्वक करून घेऊन तुह्मी व तुमचे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें इनाम अनभवून सुखरूप राहणें ह्मणून.

---

२

[ १९४ ] रतनजी बिन दादाभाई व कावसजी बिन फरामजी अंध्यारु सावकार जंजीरे वसई यांस बंदर आगाशी व बंदर बोलिंज परगणे सायेवान जलमार्ग हरदू बंदरें व खाडी वैतरणी बंदर मजकूर येथील दलालीचें वतन माहामत केलें असे. तरी हरदू बंदरीं परकी बंदरचे सावकार येऊन जिन्नस खरीदी पोख्त करितील त्यांस सरकारचे सिरस्तेप्रमाणें सूट जाऊन बाकी मालास हकदलाली सावकारनिसबतीनें दर सद्दे रुपये १ एक दलालीचा सिरस्ता करून दिल्हा असे. सुदामत बंदर मजकूरची चाल दलालीची असेल त्याबरहुकूम सदरहूप्रमाणें वतन तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें अनभवून सुखरूप राहणें ह्मणून पत्र १.

ह. स. १७४७–४८, सामन आर्बैन मया व अलफ. रविलावल १९.

येविशीं पत्रें ३

१ देशाधिकारी वर्तमानभावी सुभा प्रांत वसई यांस पत्र कीं सदरहूप्रमाणें चालवणें.

१ देशमुख व देशपांडे परगणें सायेवान यांस.

१ सावकार बेपारी परकी बंदरचे बंदर मजकुरीं येऊन जिन्नस खरीदी पोख्त करितील त्यांस.

---

३ ४

---

(154) The watan of broker at the ports of Agashi, Bolinj in Pargana Sayewan, and the creek of Waitarni, was given to Ratanaji bin Dadabhai and Kausji bin Framji Andyaru, merchants of Bassein. They were to receive brokerage at the rate of Re. 1 per hundred of the value of sales and purchases effected at the said ports by traders from other places. The former rate was Rs. 2 per hundred, but as it told heavily on the traders, it was reduced to Re. 1.

A. D. 1748-49.

शंकराजी केशव नामजाद प्रांत वसई यांस पत्र कीं पेशजी सन इसनेंत दर शेंकडा रुपये २ दोन करार करून दिल्हे होते. त्यास साउकार तजावजा झाले ह्मणून हुजूर विदित केलें त्यावरून हल्लीं दर शेंकडा हरदु बंदरचे परके बंदरचे सावकारांपासून मालास दर शेंकडा रुपया १ एक दलाली करार करून दिल्हा असे. तरी तुह्मीं साउकारांस ताकीद करून सदरहू प्रमाणें सुरळीत चालवणें ह्मणून पत्र.

[ १९५ ] अंतोजी काटकर हवालदार व कारकून किल्ले नारायणगड यांसीं पत्र कीं खंडनाक परवारी चाकर किल्ले मजकुरीं साल गुदस्त मौजे खोडद तर्फ नारायणगांव येथें बाबुराव पाटील नासिककर याच्या कजियांत ठार झाला. या करितां नफर मजकूरचे लेकास व बायकोस बालपरवेशी सालीना रुपये १० दहा करार केले असेत. साल मजकूरचे दहा रुपये किल्ले मजकूरपैकीं देणें. पेस्तर सालीना दहा रुपये देत जाणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७४८–४९.
**तिस्सा आर्बैन मया व अलफ**
मोहरम १६.

[ १९६ ] शंकराजी केशव यांस पत्र कीं दादाजी गोपाळ खुद्द सरदार आमदाबादेच्या मुक्कामीं लढाईंत ठार झाले, याकरितां मशारनिल्हेचे पुत्र गोपाळ दादाजी याची असामी करार केली असे. तरी त्याजपासून पेशजीप्रमाणें चाकरी घेऊन दादाजी गोपाळ याची तैनात आहे त्याप्रमाणें करार केली असे. चाकरी घेऊन पटवीत जाणें, ह्मणोन रसानगी चिठ्ठी.

इ. स. १७५२–५३.
**सलास खमसैन मया व अलफ.**
जमादिलाखर ४.

रामाजी महादेव नामजाद प्रांत साष्टी यांस सनद कीं, कोंडाजी भांडवीलकर दिमत भान सांवत अमदाबादेच्या मुक्कामीं लढाईंत साहेबकामावर ठार झाले. याकरितां त्याची बालपर्वेशी करार करावयाची आज्ञा तुह्मांस केली असे, तरी शिरस्तेप्रमाणें बालपरवेशी करार करून त्याचे घरीं पटवीत जाणें ह्मणोन सनद १.

रसानगी चिठ्ठी.

[ १९७ ] श्रीपतराव बापूजी यांस पत्र कीं शहरकर सुतार व लोहार व गवंडा यानें अमदाबादेचे लढाईंत शहरांतून येऊन साहेबचाकरीवर कस्त मेहनत केली. त्याजवरून त्रिवर्गीवर कृपाळू होऊन नाईक्या सांगितल्या असेत. त्यांस शहरांत पेशजीपासून वतनदार नाईक असतील त्यांस जो आजपर्यंत सुभा जाहले त्यांनीं त्याचे हातें नाईकाचें कामकाज घेत आलें असेल तरी

इ. स. १७५२–५३
**सलास खमसैन मया व अलफ.**
जमादिलाखर ७.

---

(155) Khadnak—a servant at fort Narayangaon lost his life at Khoded in a dispute between the Patels. His wife and son were given an annual allowance of Rs. 10.

A. D. 1748 49.

(156) Dadaji Gopal, an officer, was killed at the battle of Ahmedabad. Dadaji's post was conferred on his son.

A pension was granted to the family of Kondoji Bhandawalkar who died in the same battle.

A. D. 1752-53.

(157) A letter to Shripad Bapuji—

During the battle of Ahmedabad, Mansaâram, Carpenter Punjoi, blacksmith, and Keshava, Mason, coming out from the

A. D. 1752-53.

चौकशी करून त्यांजकडे नाईक्या चालवणें आणि या त्रिवर्गांस चाकर ठेवून काम घेणें. जो सुभा जाहला त्यानें नवे नाईक ठेऊन कामकाज घेत आले असेल तरी पेशजींचें असतील ते दूर करून या त्रिवर्गांस नाईक्या सांगितल्या असेत. यांची तैनात करार करून चाकर ठेवून कामकाज यांचे हातून घेत जाणें ह्मणून पत्रें.

१ मनसाराम सुतार पत्र.

१ केशव गवंडा पत्र.

१ पुजा लोहार

---

३

[ १९८ ] मोरोजी शिंदे नामजाद जंजीरे रेवदंडा यांस सनद कीं, मुकुंद केशव सबनीस दिंमत माजी किल्ले मीरगडकरी हे मृत्यु पावले त्याचा पुत्र मल्हार मुकुंद उमर वर्षें १२ बारा लहान चहूवर्षें कामास येईल. परंतु पदरचा सबब:—

इ. स. १७५३-५४.
**आर्बा खमसैन मया व अलफ.**
जिल्काद. १.

| | | | |
|---|---|---|---|
| तैनात नक्त व कापड | | अडसेरी दरमाहे. | |
| | | कैली दरमाहे तूप वजन पक्कें. | |
| २० नक्त दरमहा. | | | |
| २० कापड आदमोईन. | ॰२।।।- | भात दरमाहे | ॰॰।।- |
| ४० | ॰१।। | खुर्द. | |
| सेत सनद सालीना. | ॰१। | कवीला. | |
| नेमणूक भात कैली | ॰२।।।- | | |
| -।।२ | | ॰॰१ | डाळ. |
| | | ॰॰।. | मीठ |
| | | ॰=।।।१।- | |

---

city, exerted themselves to the utmost in the service of Government. They were made headman of their respective guilds.

(158) Mukund Keshav the Subnis of fort Mirgad died leaving a son named Malhar aged only 12 years. As he was not yet fit for service, an allowance consisting of cash and grain was sanctioned for his support and for the support of his mother. The allowance was to be continued for 3 years. After that period, Malhar was to be employed on his father's duties and given the usual remuneration.

A. D. 1753 54.

एकूण नक्त रुपये तीस साली दीडमाही शिरस्ता व कापड मोईन आंख वीस शेत सनद भात कैली तेरा मण अडशेरी दरमाहे भात कैली पावणें तीन मण सापायली व तूप अदशेर शिरस्तेप्रमाणें करार केलें असे. तें सदरहूप्रमाणें तीन वर्षें चालवावें. पुढें चाकरी करावी. चाकरी करूं लागल्यावर ह्याप्रमाणें पेशजीची तैनात करावी असा करार केला असे. तरी तुह्मीं खुद्दाची अडशेरी जंजीरें मजकूर पैकीं देत जाणें. कबिल्याची अडशेरी व सेत सनद व नक्त कापड हुजूरून पावेल ह्मणोन सनद १.

इ. स. १७५३-५४. **आर्बा खमसैन मया व अलफ.** रबिलाखर ११.

[ १५९ ] मोराजी शिंदे नामजाद जंजिरें रेवदंडा यासी सनद सोरटें प्रांतीं मोहे येथील लढाईमध्यें लोक ठार झाले. त्यांस बालपरवेशी मोईन सालीना.

| | एकूण नक्त रुपये | गल्ला भात कैली खंडी. |
|---|---|---|
| दिंमत शेख फत्ता कालेखान बद्रुक वस्ती जंजीरें रेवदंडा याचीं माणसें. | १५ | ·॥· |
| १ बायको. | | |
| १ बेटा उमर ५ | | |
| —— | | |
| २ | | |
| शेख जीवन वस्ती जंजीरें मजकूर यांचीं माणसें. | १५ | -॥- |
| १ बायको. | | |
| २ बेटे उमर. | | |
| १० २ | | |
| २ बेऱ्या. | | |
| —— | —— | —— |
| ५ | ३० | १। |

(159) Some Mahomedan servants of the fort of Revdanda were killed in the battle of Mohe in Prant Sorate. Provision was made for the support of their wives, mothers, children, and parents, each family being given Rs. 15 in cash, and half or $\frac{3}{4}$ th of a Khandi of rice, per annum.

A. D. 1753-54.

| | | |
|---|---|---|
| शेख महमद वल्लद | १० | १ |
| शेख मुदारद दिंमत | | |
| तुकोजी आंग्रे यांचीं माणसें | | |
| १ बाप. | | |
| १ आई. | | |
| १ बायको. | | |
| १ बेटा उमर १॥ | | |
| —— | | |
| ४ | | |
| एकूण. | —— | —— |
| | ४० | २।. |

एकूण तीन असामींस मोईन सालीना नक्त रुपये चाळीस व सवादोन खंडी भात करार केलें असे. तर सालमजकुरापासून यांचे लेक चाकरीस उमेदवार होत तों पर्यंत देत जाणें. सदरहू बालपरवेशीची चौकशी करून देत जाणें ह्मणोन सनद १.

[ १६० ] गुणाजी जोग बिन....यांनीं हुजूर कसबे पुण्याचे मुक्कामीं येऊन विनंती केली कीं आपले पुत्र सुर्याजी जोग व मेघोजी जोग सरकारांत चाकर होते. सरकारांतून राजश्री रंगराव शिवदेव यांचे तैनातीस चाकरीबदल दिल्हे. त्यास रंगराव शिवदेव यांची व जाटाची लढाई झाली. ते समयीं उभयतां साहेबकामावर जुंझांत ठार झाले. त्यास साहेबीं कृपाळू होऊन कुटुंबाचे बेगमी बद्दल नूतन एक गांव नाम करून दिल्हा पाहिजे ह्मणोन त्याजवरून मनांत आणितां तुमचे पुत्र उभयतां जोग साहेबकामावर रंगराव शिवदेव यांजबरोबर जाटाचें जुंझात ठार झाले. सबब तुह्मांवर कृपाळु होऊन तुह्मांस **** हा गांव स्वराज्य व मोंगलाई एकूण दुतर्फा कुलबाब कुलकानु हल्लीपट्टी व पेस्तर पट्टी खेरीज हक्कदार करून इनाम दिल्हा असे. तरी सदरहू गांवचा अमल तुह्मी आपले दुमाला करून घेऊन तुह्मी व तुमचे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें इनाम अनभवून सुखरूप राहणें ह्मणोन मशारनिल्हेचे नांवें पत्र १.

इ. स. १७५१-५२.
**खमस खमसैन मया व अलफ.**
सफर ११.

---

( 160 ) In a battle between Rangrao Shivdeo and the Jat, some persons of the Nalge family were killed. A village was therefore granted to it in Inam.

A. D. 1754-55.

येविशीं पत्रें.

गांवास पत्र कीं मशार निल्हेशी रुजू होऊन अमल सुरळीत देणें ह्मणोन. १

देशमूख व देशपांडे परगणें मजकूर यांस १

देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी यांस १

बहिरोराम कमाविसदार परगणें मजकूर यांस सनद कीं मौजे मजकुराचा आकार होईल त्या पैकीं पांचशें रुपये याचे नांवें इनाम खर्च साल दरसाल लिहित जाणें. पांचशें रुपयांवर जास्ती आकार होईल तो यांचे नांवे खर्च लिहित जाणें ह्मणोन सनद.

—

६

रवानगी याद.

चिटनिशीं पत्रें.

१ जमीदारांस.

१ देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी

—

२

७

[ १६१ ] मोरोजी शिंदे नामजाद जंजीरें रेवदंडा यांशी सनद, रामजी राजवाडे खुद्द सरदार कुलावे याच्या राजकारणांत ठार झाले. त्यांच्या दोघी बायका आहेत. त्यांस बालपरवेशी सालीना मोईन भात केली खंडी २ साल मजकुरापासून करार करून देविलें असे. बायकांनीं दुसरा दादला केला नाहीं तोंपर्यंत देत जाणें ह्मणोन सनद एक १.

इ. स. १७५४–५५.
**खमस खमसैन मया व अलफ.**
सफर २२.

रवानगी यादी.

---

(161) Ramji Rajwade lost his life in the Campaign against Kolaba. Pensions were granted to his two widows, to be continued to them so long as they remained unmarried.

A. D. 1754 55.

[ १६२ ] रेवा गवंडा पाटील यास दिल्हें वतनपत्र ऐसाजे, तुझा बाप शिदाणा यानें हुजूर येऊन विदित केलें कीं, पाळाकडील स्वारी माहालच्या निकालाबद्दल आली होती. तेव्हां स्वारीचे लोकांनीं मुलाचा हात तोडला. मूल अगदीं जाया जाहला. याचें चालिलें पाहिजे ह्मणोन. त्याजवरून मनास आणून रेवा गवंडा याचें चाललें पाहिजे हें जाणोन कृपाळु होऊन मौजें मजकूर पैकीं पड जमीन बिघे चाहूर -॥- निमा चाहूर कुलबाब कुलकानु हल्लीं पट्टी व पेस्तर पट्टी देखील इनाम तिजाई खेरीज हक्कदार व इनाम करून दिल्हा असे. तरी सदरहू निमें चाहूर जमीन चतुःसीमा पूर्वक दुमाले करून घेऊन तूं व तुझे पुत्र पौत्रादी वंशपरंपरेनें इनाम अनभवून सुखरूप राहणें. याचें नांवें पत्र १.

इ. स. १७५४–५५.
**खमस खमसैन मया व अलफ.**
जमादिलाखर १.

येविशीं पत्रें मोकदम
मौजे मजकूर यास. १
—
२

देशाधिकारी लेखक वर्तमान व
भावी परगणें मजकूर यास पत्र १
जमीदार परगणे मजकूर यांस पत्र १
—
४

[ १६३ ] नारो बाबाजी नामजाद परगणें नेवासें वगैरे माहाल यांस सनद कीं, मौजें पिंपळगांव परगणें वैजापूर येथें ब्राह्मणाची बायको रतनगज हत्तीनें जीवें मारिली होती. तिचे चौकशीबद्दल हुजूरून गोंदजी वागळा खिजमतगार व दोघे राऊत पाठविले होते. त्यास तुह्मीं व हे मिळोन पाटील जमा करून बायको मेली इची चौकशी केली. तों खरेंच जाहलें. त्यास तिची क्रिया तिचा पुतण्या होता त्याजकडून करवली. त्यास खर्चास रुपये १२५ सवाशें अजमासें दिले. बाकी सनदेपैकीं पावणे चारशें रुपये राहिले ते तिचा पुतण्या ह्मणतो कीं अस्ती घेऊन काशीस जातों, रुपये द्यावे, त्यास आज्ञा झाली पाहिजे ह्मणून. त्याजवरून तिचा पुतण्या अस्ती घेऊन भागीरथीस जात असेल तरी त्यास जामीन घेऊन सदरहू पावणे चारशें रुपये देणें ह्मणून सनद १.

इ. स. १७५४–५५.
**खमस खमसैन मया व अलफ.**
जमादिलाखर ६.

---

( 162 ) During the invasion of Samat Kurajgi in Pargana Bijapur by the Pal, his soldiers cut off a hand of the Patil of Chikhalgi. Inam land was therefore granted to him.

A. D. 1754-55.

( 163 ) A Brahmin woman at Pimpalgaon in Pargana Vaizapur was killed by elephant named Ratangaj. Rs. 125 were given for her funeral expenses and Rs. 375 for carrying her bones to Benares.

A. D. 1754-55.

[ १६४ ] गणोजी साखरे व भगवंतराव साखरे व खंडोजी साखरे व विठोजी साखरे व महादजी साखरे व गोविंद्राव साखरे बिन बयाजी साखरे पाटील मौजें हिजवडी तर्फ कर्यात माल प्रांत यानीं हुजूर कसवें पुणीयाचे मुक्कामीं येऊन विनंती केली कीं आपले बाप बयाजी साखरे यानीं साहेबांपाशीं श्रम साहस करून सेवा केली. त्यास साहेबांची स्वारी सन आर्बा खमसेनांत कर्नाटक प्रांते झाली. ते समयीं ठाणें मुडलगी सरकारांत हल्ला करून घेतलें. तेव्हां आपले बापास गोळी लागून ठार झाले. त्यास आपण लेंकरें, कुटुंब भारी, कुटुंबाचें संरक्षणाबद्दल नूतन एक ग्राम दिल्हा पाहिजे ह्मणून. त्यावरून मनास आणितां याचे बाप बयाजी साखरे मर्द माणूस सन आर्बा खमसेनांत मुडलगीच्या ठाण्यावर साल गुदस्ता साहेबकामास आले हें जाणून याजवर कृपाळु होऊन यास कुटुंबाचे संरक्षणाबद्दल मौजें नागापूर तर्फ अवसरी प्रांत जुन्नर हा गांव स्वराज्य व मोंगलाई येकूण दुतर्फा कुलबाब कुलकानु हल्लीं पट्टी व पेस्तरपट्टी देखील इनाम तिजाई जलतरू पाषाण निधीनिक्षेप आदीकरून खेरीज हकदार व इनामदार करून इनाम दिल्हा असे. तरी मौजें मजकूर याचे दुमाला करून यास व याचे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें इनाम चालवीत जाणें. प्रतिवर्षीं नूतन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लिहून घेऊन अस्सल पत्र भोगविटीयास याजवळ परतोन देणें ह्मणोन सनदा.

इ. स. १७५५–५६.
सित खमसैन
मया व अलफ.
जिल्हेज १३.

१ मौजे नागापूर तर्फ अवसरी प्रांत जुन्नर येथील मोकदमास पत्र.
१ साखरे याचें नांवें पत्र.
१ कमाविसदार वर्तमान व भावी याशीं पत्र
१ जमीदार परगणें मजकूर यास पत्र.

---

४

[ १६५ ] राजश्री मालजी होळकर बिन खंडेराव येबिन मल्हारजी होळकर व राजश्री जनकोजी बिन जयाजी येबिन राणोजी शिंदे यांनीं हुजूर विनंती केली कीं सरकार माडोगड प्रांत मावळ येथील दरोबस्त एकतीस माहालचें कानगोईपणाचें वतन सरकारचें आहे. तें स्वामीनीं कृपाळु होऊन आह्मां उभयतांस वतन करून देऊन वतनपत्रें करून द्यावीं ह्मणोन. त्याजवरून

इ. स. १७५५–५६.
सित खमसैन
मया व अलफ.
रविलावल २९.

---

(164) During the compaign in Karnatic by the Peshwa in A. D. 1753-1754, Bayaji Sakhare lost his life in a successful attack which he led against Mudalgi. The village of Nagapur in Prant Junnar was granted to his son in Inam.
A. D. 1755-56.

(165) The watan of Kango of Sarkar Mandogad in Prant Malwa was conferred on Malji bin Khanderao Yebin (grandfather's name) Malharji Holkar, and Jankoji bin Jayaji Yebin Ranoji Sinde, at their request.
A. D. 1755-56.

हे पूर्वीपासून राज्यांतील सेवक श्रम साहस करून कित्येक महत्कार्यें संपादिलीं. स्वामीसेवा एकनिष्ठपणें केली. यांचें चालवणें अवश्यक जाणून यांजवरी कृपाळु होऊन सरकार मजकूरचे दरोबस्त एकतीस माहालचें कानगोईपणाचें वतन सरकारचें होतें तें हल्लीं उभयतांस वतन करार करून देऊन वतनपत्रें करून दिल्हीं.

४ मालजी होळकर याचे नांवें.

१ नांवाचें.

३१ एकतीस माहालचें मोकदमाचें पत्र माहाल.

१ देशाधिकारी व देशलेखक वर्तमानभावी यांस.

१ चौधरांत देशमुख सरकार मजकुरास.

---

४

[ १६६ ] मौजें कळंबी प्रांत मिरज येथील मुकासा हुजुरून पेशजीपासून काल नाईक याजकडे आहे. त्यास काल नाईक पानपतावर सरकार कामास आला. याजकरितां त्याचा लेक राज नाईक याजकडे मौजे मजकूरचा मोकासा दरोबस्त करार करून देऊन हे सनद तुह्मांस सादर केली असे. तरी मौजे मजकूरचे मोकाशाचा अमल पेशजी प्रमाणें याजकडे चालवणें ह्मणोन गोविंद हरी यांचे नांवें सनद १.

इ. स. १७६१–६२. **इसन्ने सितेन मया व अलफ.** रजब २३.

रसानगी याद.

---

## ( अ ) देणग्या.

## २ धर्मकृत्यें व नवस.

इ. स. १७२१–२२. **इसन्ने अशरीन मया व अलफ.** मोहरम १८.

[ १६७ ] राजश्री त्रिंबक गोविंद यांस काशीयात्रेचें कर्ज झालें सबब देवविले रुपये १५०.

इ. स. १७२१–२२. **इसन्ने अशरीन मया व अलफ.** सवाल ३.

[ १६८ ] श्रावणमासचे अभिषेकाबद्दल श्रीवर्धनकर ब्राह्मणांस (२०।२५ ब्राह्मण नांवनिशीवार आहेत.) प्रत्येकास दोन शेर भात दिला आहे.

---

(166) Kal Naik lost his life on the battlefield of Panipat. His saranjam of Kolambi in Prant Miraj was continued to his son.
A. D. 1761-62.

**Grants for religions purposes IX A 2.**

(167) Rs. 150 were given to Trimbak Govind to enable him to pay off a debt incurred by him on account of his pilgrimage to Benares.
A. D. 1721-22.

(168) Rice two seers each was given to about 25 Brahmins of Shrivardhan on account of Shravana Abhisheka.
A. D. 1721-22.

इ. स. १७४१–४२. **इसन्ने आरबैन मया व अलफ.** रमजान २७.

[ १६९ ] वेदमूर्ती गंगाधरभट शारंगपाणी व रामचंद्रभट खरे यांस किल्ले कुरग कोळी याकडे होती ते सरकारांत यावी ह्मणोन नारो त्रिंबक व हरी कृष्ण यांनीं अनुष्ठान सांगितलें. किल्ला सरकारांत हस्तगत जाला. त्या करितां वेदमूर्तींस वर्षासन करार करून दिल्हें. रुपये

२९ गंगाधरभट बिन महादेवभट शारंगपाणी.

१० जास्ती

---

३९

२९ रामचंद्रभट बिन विश्वनाथभट खरे.

---

६०

एकूण हरी कृष्ण बरवे कमाविसदार परगणें नाशीक यांजकडून साल दरसाल देविले. वर्षासनाचीं पत्रें भोगवटी यास वेदमूर्तींजवळ देणें. प्रतीवर्षीं नूतन पत्राचा आक्षेप न करणें ह्मणोन वेदमूर्तींस भोगवटी यास पत्रें २.

इ. स. १७४४–४५. **खमस आर्बैन मया व अलफ.** साबान ८.

[ १७० ] शंकराजी केशव नामजाद प्रांत वसई यांशीं पत्र कीं मौजें सोपारें व मौजें बोलिज परगणा हवेली सायेवान येथें महमदसाले सातारीं साऊकार यांनीं मशिदी बांधल्या आहेत. त्यास दिवाबत्तीस व मशिदीची खिजमत करील त्यास पोटास पड जमीन जिराइत बिघे.

८२ मौजें सोपारें मशिदी २ एकूण.
दरमशिदीस एक बिघा प्रमाणें.

८१ मौजें बोलिज मशीद १ एकूण.

---

८३

ऐकूण तीन बिघे जमीन देविली आहे. त्याप्रमाणें नेमून देणें. त्याचा आकार होईल तो मशीदीचे नांवें साल दरसाल खर्च लिहिणें ह्मणोन पत्र १.

---

(169) At the instance of the Kamavisdar of Nasik, Gangadharbhat Sharangpani and Ramchandrabhat Khare, offered prayers for the surrender of the Fort of Kurag, which was in the possession of the Kolis. The fort having surrendered, Warshasans were granted to these persons.

A. D. 1741-42.

(170) Allowances were granted for the lighting up, and general service, of mosques newly built by a Mohamedan in Prant Bassein.

A. D. 1744-45.

[ १७१ ] शेख दाऊद परकार याणीं अर्ज केला कीं माहागिरी पाखाडी कसबें ठाणें येथें तळ्याचे पाळीवर जुमामशीद बांधली आहे त्याची चिराखबत्ती व खिजमत झाली पाहिजे याकरितां कांहीं जमीन नेमून द्यावी ह्मणोन. त्यावरून मनास आणून मशिदीचे खिजमतीस व चिराखबत्तीस पड जमीन बिघे १॥. दीड बिघा पड जमीन देविली असे. तरी सदरहू दीड बिघा जमीन नेमून देणें. त्याचा आकार होईल तो मशीदीचे नांवे साल दरसाल खर्च लिहित जाणें. दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणें ह्मणोन रामाजी महादेव ठाणें साष्टी यांस पत्र १.

इ. स. १७४६–४७.
**सब्बा आर्बैन मया व अलफ.**
जिल्हेज २१.

इ. स. १७४८–४९.
**तिसा आर्बैन मया व अलफ.**
सवाल ४.

[ १७२ ] श्री महादेव रतनगडी किल्ल्या खालीं आहे त्यास बालोजी कराळे यानीं किल्ले रतनगड घेते समयीं नवस केला त्या प्रमाणें.

| नित्य नैवेद्यास नेमणूक | | | नंदादीपास दरमहा तेल. |
|---|---|---|---|
| गल्ला कैली दरमाहे | | तूप दरमोह | वजन पक्कें. |
| ८।२ | तांदूळ | वजन पक्कें | ८८२॥. |
| | सडीक | ८८॥. | |
| ·८८१ | डाळ | तूप दरमहा ८८८४ प्रमाणें | बारमाही. |
| | | वजन पक्कें ८८॥१२ किंमत सालिना रुपये .॥. | |
| ८॥. | | | |

१ किल्ले रतनगड पैकीं देविले सदरहू सामान श्रीच्या गुरवाजवळ देऊन नित्य नैवेद्य व नंदादीप ताकीद करून चालवणें ह्मणोन मोरो महादेव यांस सनद १.

किल्ले रतनगड घेते समयीं बालोजी कराळे यानीं नवस केले त्यास साहित्य गल्ला कैली.

८॥. पिराचे केदारीस तांदूळ कैली.

८२।॥. किल्ल्याखालीं श्री महादेव आहे त्याचे समाधेस

८२॥ तांदूळ सडीक
८।. डाळ.
८२।॥.

.।१ गोंधळ ९ दर गोंधळास कैली ८॥२ तांदूळ.

.।४।. एकूण तांदूळ.

२ किल्ले मजकूर पैकीं मोरो महादेव याजकडून देविले.

---

(171) Inam land was granted for the expenses of a mosque, called Jumma Masjid, built by Shek Daud in the village of Mahagiri Pakhadi in Pargana Thanna.
A. D. 1746-47.

(172) Balaji Karale made a vow to the deity of Mahadev at the foot of the fort of Ratangad, that in case the fort surrendered an allowance would be granted for lighting the temple and for the daily presentation of a dish to the deity. He also made a similar vow to the Pir. The vows were fulfilled.
A. D. 1748-49.

इ. स. १७५१–५२.
इसन्ने खमसैन
मया व अलफ.
रबिलाखर २४.

[ १७३ ] किल्ले त्रिंबक किल्ला हस्तगत सरकारांत यावयाविशीं नवस केले त्यास रसानगी विद्यमान त्रिंबक सुर्याजी याद.

देवालयाच्या इमारतीच्या कामाबद्दल रुपये.

३०० श्री वैज्यनाथ खेबेरें दीपमाल.
४०० जीवमाखी वैज्यनाथ खेबेरें.
५०० जीवमाखी वगजाई.
५०० सोमश्वरकर चाडा देवालयें.

१७००

सतराशें रुपये खर्च करून लिहिले प्रमाणें च्यार इमारती करणें. सदरील प्रांत राजपुरी येथील ऐवजी खर्च करून कामें करणें ह्मणून राणोजी बालकवडे यास सनद १.

श्री बल्लेश्वरास पांचशें ब्राह्मणांची समाराधना करावयाचा नवस केला आहे. तरी पांचशें ब्राह्मणांची समाराधना उत्तम प्रकारें करणें. साहित्यास अजमासें रुपये ८७॥ साडेसत्याऐशी रुपये नेमून दिल्हे आहेत. यांत ब्राह्मणभोजन करणें. ऐवज तर्फ मजकूर येथील ऐवजी खर्च करणें ह्मणून आबाजी दादाजी कमाविसदार तर्फ पाल हेवली यास सनद सादर १.

इ. स. १७५२–५३.
सलास खमसैन
मया व अलफ.
रजब २१.

[ १७४ ] राघो गोविंद यास सनद कीं गंगाबाई वडागलीकर कुळकर्णी हिनें विदित केलें कीं आपला दादला तीनशें रुपयांबद्दल अवरंगाबादेंत अटकेंत पडला आहे. त्यास स्वामी कृपा करून सुटे असा अर्थ करावा ह्मणून विनंती केली. त्यावरून ब्राह्मण गरीब बायकोवर नजर देऊन तुह्मांस पत्र सादर केलें असें. तरी तीनशें रुपये बद्दल इचा दादला अटकेंत आहे कीं काय याची चौकशी करून तिनशें रुपयांबद्दल पडला आहे हें खरेंच आहे तरी तुह्मी रुपये तीनशें देऊन इचा दादला सोडवून देणें ह्मणोन सनद १. रसानगी चिठ्ठी.

---

(173) Vows were made to various deities for the acquisition of the Fort of Trimbak. The fort having surrendered, orders were issued for the construction of temples in honour of the said deities and for the feeding of Brahmins. Rs. $87\frac{1}{2}$ were sanctioned for feeding 500 Brahmins.

A. D. 1751-52.

(174) A Sanad to Ragho Govind-Gangabai Kulkarni of Wadgali, represents that her husband is detained in custody at Aurangabad for his inability to pay Rs. 300 and prays that the Peshawa may be pleased to arrange for his release. Taking into consideration the circumstances of the poor Brahmin woman, Government is pleased to send this letter to you. You should enquire whether the woman's husband is really in confinement for non-payment of Rs. 300, and if so, to secure his release by paying the amount in question.

A. D. 1753-54.

[ १७५ ] राजश्री जगन्नाथ देव वास्तव्य चिंचवड यांशीं पत्र कीं आपण श्री चरणारविंदीं एकनिष्ठ भक्ती करून स्नान संध्यादी षट्कर्मे आचरोन स्वधर्मा चरणीं रत आहां. तुमचें चालवणें परमेश्वर प्रीत्यर्थ; तेणेंकरून राजश्री स्वामींस व स्वामींचे राज्यास श्रेयस्कर जाणून मौजें सुदउंबरें तर्फ चाकण प्रांत जुन्नर हा गांव आपणाकडे पेशजीपासून स्वराज्य इनाम आहे. सांप्रत मोंगलाई अमल सरकारांत झाला आहे. तो आपणाकडे इनाम करार करून दिल्हीया श्रीची पूजा अर्चा यथोचित होऊन राज्याची अभिवृद्धी व्हावी हा अर्थ चित्तांत आणून मौजे मजकूर येथील मोंगलाई अमल जागीर देखील फौजदारी दरोबस्त आपणाकडे इनाम करार करून दिल्ही असे. तरी मौजे मजकूर येथील मोगलाई अमल दरोबस्त अनभवून आपले दुमाला करून घेऊन आपण व आपले पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें इनाम अनभवून सुखरूप राहणें ह्मणोन राजश्री जगन्नाथ देव यांस पत्र. रसानगी याद. पत्र १.

इ. स. १७५३–५४. आर्बा खमसैन मया व अलफ. रबिलाखर ५.

मौजे मजकूर येथील मोकदमास पत्र १

२

ये विशीं पत्रें

१ देशमूख व देशपांडे यांस,

१ देशाधिकारी व लेखक वर्तमानभावी.

२

[ १७६ ] दादो महादेव यांस सनद कीं मखण मुसलमानीन इनें येऊन अर्ज केला कीं आपलीं मुलें दोन २ एक पोरगी व एक पोरगा अशीं दोन पोरें अमरसिंग शिलेदार तुह्माकडे चाकरीस आहे त्याचे कर्जाचा तगादा केला व पोरे अटकाऊन ठेविलीं आहेत. त्यास इनें त्याचे रुपये वारून दिल्हे. बारा रुपये मात्र राहिले आहेत. त्यास सदरहू बारा रुपये तुह्मा कडून इजला खैरात दाखल देविले असेत. तरी सदरहू बारा रुपये अमरसिंगास देऊन इचीं पोरें दोन सोडून देववणें ह्मणोन सनद १.

इ. स. १७५३–५४. आर्बा खमसैन मया व अलफ. जमादिलावल ३०.

---

(175) A portion of the revenue of the village of Sudumbre was granted to Jagannath Dev of Chinchwad for his religious—devotion and strict observance of the Brahmanical ritual.

A. D. 1753-54.

(176) A Sanad to Dada Mahadev.—A Mohomedan woman named Makhan represents that she is much pressed for the repayment of a debt due by her to Silledar Amarsing who is in your employ, and that her children, one girl and one son, have been kept in confinement by him. It appears that she has managed to pay off a portion of debt, and that the balance due by her amounts to only Rs. 12. You are authorized to pay this amount to Amarsing on her account, and to set the children at liberty.

A. D. 1753-54.

इ. स. १७५३-५४.
**आर्बा खमसेन मया व अलफ.**
जमादिलाखर २६.

[ १७७ ] किल्ले त्रिंबकेश्वर सरकारांत यावा ह्मणोन त्रिंबक सुर्याजी यानीं सन इसन्नेंत देवास मुखवटयाचे व वस्त्राचे नवस केले होते ते हल्लीं पाठविले; देवास प्रविष्ट करून पावलीयाचीं उत्तरें पाठवणें ह्मणून सनदा.

त्रिंबक सुर्याजी यास सनद.
मुखवटे सोन्याचे वजन तोळे.

१७४॥ श्री त्रिंबकेश्वर
६॥।२॥१ श्री हणमंत मौजे ह्मणूरली

१८०।=॥

राणोजी बाल कवडे यास सनद.

मुखवटे वजन तोळे
१०७। सोन्याचे मुखवटे ४
तर्फ हिरवडी वगैरे
२९॥= वगजाई.
२३॥।१॥। नवकई,
२९॥।.॥। बावदेव.
२३॥।१॥. वरदानसूरगड.

१०७।.

वस्त्रें ऐकूण आंख.
३४ वगजाई.
१४ साडी. १
२॥ चोळखण १
१७॥ चादर १

३४ ३

२६॥।= नवलाई.
१२ साडी. १
२॥ चोळखण. १
१२।= चादर.

२६॥।=

(177) Trimbak Suryaji had made a vow in 1751-52 to present certain deities with busts and clothes, in case the fort of Trimbakeshwar surrendered to Government. The busts & clothes promised are now sent. They should be presented to the deities, and the fact should be reported.

A. D. 1753-54.

( A golden bust weighing 174½ Tolas for Shri Trimbakeshwar and similar offerings to various other deities in the province. )

११७ रुप्याचे मुखवठे श्री
बहिरी कारिनशी महाल १

---

२२४।.
३१॥ वर्दोन.
१२ साडी १
२॥. चोळखण १
१७ चादर १

३१॥. ३
४१।. बाबदेव.
१७।. मंदील १
२४ चादर १

४१।. २

२१३॥=

बहिरजी बालकवडे यास सनद.

मुखवटे वजन तोळे.
४७॥२॥।.
सोन्याचे.
२३॥। १ आलगाई.
२३॥। १॥। कामाक्ष.

४७॥२॥। २
७१॥ रुप्याचे ३
२३॥। बहिरी महालगड.
२३॥। मावजीजा खेरा
मोगर
२४ कळसाई.

७१॥.

११९८२॥।.

वस्त्रें एकूण आंख.
२६ श्रीआलगाई
१२ साडी १
२॥ खण १
११॥ चादर १

२६ ३

२१॥।= कळसाई
१० साडी १
२ खण १
९॥।= चादर १

२१॥।= ३
२९ कामाक्षा
१२ साडी १
२॥ खण १

१०॥ चादर १

२५ ३

७२॥।= ९

नीळकंठ माहादेव यास सनद.

मुखवटा सोन्याचा श्री
खंडेराव जेजुरी वजन तोळे
११८०॥।१

वस्त्रें एकूण आंख.
श्रीखंडेराव जेजुरी.
१०० मंदील १
५५ दुपट्टा १
१०॥ मश्रु ॥.
५५ जामवार १
३३। कमरबंद १

२५३॥।. ४॥

मोरोजी शिंदे रेवदंडा.

सान्याचे मुखवटे तोळे.
२३॥। १।. भवानी नागोद.
२३॥।१॥ बहिरीथळ.

४७॥२॥। २

वस्त्रें एकूण आख.
३७॥ श्रीभवानी नागोद
१८ लुगडें १
२॥ चोळखण १
१७ चादर १

३७॥. ३

६८॥. बहिरी.
१७।. मंदील १
१७ चादर १
४।. कमरबंद १
१०॥ मशरु ॥.
१९॥ तिवट १
झग्यास

६८॥ ४॥.

१०६ ७॥.

रामाजी मल्हार यास सनद.

रुप्याचे मुखवटे देव प्रसन्न

| अकोळे वजन | तोळे. |
|---|---|
| २२॥= भवानी घोरघाडी | १ |
| २३८२ श्री महादेव आबाएगण | १ |
| २३॥। बहिरी मौजें आवदखडी | १ |
| ६९॥८१ | ३. |

जिवाजी गणेश यास सनद कसबें ओतूर येथील भवानीस.

| रुप्याचा मुखवटा वजन तोळे | वस्त्रें | आख. | |
|---|---|---|---|
| ११७॥।. | ११० | साडी. | १ |
| | २॥ | खण | १ |
| | ९॥।= | चादर | १ |
| | १२३।= | | ३ |

गंगाधर बल्लाळ परगणें नाशिक.

बहिरी मौजें खेड

| रुप्याचा मुखवटा | वस्त्रें एकूण | आख. |
|---|---|---|
| २३॥।. | १९ तिवट | १ |
| | १४ शेला. | .॥. |
| | २९ | १॥. |

किल्ले हरि छप्र येथील हवालदार त्रिंबजी शिंदे

बहिरोबा मौजें साखरवाडी.

मुखवटा एक रुप्याचा वजन तोळे २३॥१।.

एकूण सनदा ९.

इ. स. १७५४–५५. खमस खमसैन मया व अलफ. मोहरम ७.

[ १७८ ] नीळकंठ महादेव प्रांत पुणें यांस सनद कीं, कमळी, कुणबिणीचे मुलास बरें वाटत नव्हतें सबब खंडेरायास नवस केला होता तो हल्लीं फेडावयाबद्दल सामान येणेंप्रमाणें. रसानगी चिठ्ठी.

| | |
|---|---|
| उलफा असामी ५० पन्नासांस शिरस्ते प्रमाणें देणें कलम १. | बकरीं सर ५ |
| | तेल वजन पक्के ८८५ |

एकूण उलफा पन्नास असामींचा व बकरी पांच व तेल पांच शेर वजन पक्के देविलें असे. प्रांत पुणेंपैकीं जेजुरीस पावतें करणें ह्मणून सनद १.

---

(178) A. D. 1754-55. The son of Kamli, a slave, being unwell, she made a vow to the deity Khandoba at Jejuri. To enable her to fulfil that vow, she was given provisions for feeding 50 men, 5 sheep and 5 sheers of oil

[ १७९ ] नारो बाबाजी नामजाद परगणें नेवासें वगैरे माहाल यांस सनद कीं, वेदशास्त्र सपन्न राजश्री गोविंद दीक्षित पाटणकर यांस साल मजकुरीं मोंगलाची लढाई फत्ते जाहालीयावरी एक गांव पांच हजार रुपयांचा इनाम द्यावा असा करार आहे. त्यास लढाई फत्ते जाहाली, याजकरितां त्यांस गांव दिल्हा पाहिजे; ऐशियास दीक्षित बावानीं एक गांव आपणाकडे नेमून द्यावा ह्मणोन पत्र पाठविलें; त्यास हल्लीं हे सनद तुह्मास सादर केली असे. तरी मौजें मजकूर येथील पांच हजार रुपयांचा तनखा व पांच हजार कुलबाब कुलकानु मिळोन वसूल या प्रमाणें असलीयास एक गांव दीक्षितांकडे नेमून देणें आणि या गांवचा वसूल कुलबाब कुलकानु मिळोन पांच हजार रुपयांस जाजती असला तरी सदरहू लिहिल्या प्रमाणें दुसरा गांव पांच हजार रुपये तनखा वसूलही त्या प्रमाणें असा असेल तो वेदमूर्तीकडे नेमून देऊन हुजूर लेहून पाठवणें ह्मणोन सनद छ० ७ साबान सनद १.

इ. स. १७६१-६२.
**इसन्ने सितैन मया व अलफ.**
साबान २३.

रसानगी यादी.

हाल वसूल कुलबाब कुलकानु पांच हजार आणि तनखा कमी असा गांव असला तरी देणें. तनखा जाजती आणि वसूल कमी असा गांव असेल तो न देणें ह्मणोन लिहिलें असे.

## १० इनाम, नक्त नेमणुका, वतनें वगैरे देणग्या देणें व चालू ठेवणें.

### (ब) धर्मादाय ह्मणून अगर नवसाचे फेडी करितां.

[ १८० ] हरिभक्त परायण कबीर वस्ती पुणें याशीं प्रांत पुणेंपैकीं दर गांवास रुपाया १ एक प्रमाणें तीनशें रुपये मोईन करून वंशपरंपरेनें पावावयाशी राजश्री स्वामींनीं व तीर्थरूप कैलासवासी रायानीं आज्ञापत्रें सादर केलीं आहेत. त्याप्रमाणें साल दरसाल पावीत जाणें. उजूर न करणें ह्मणून पत्र १.

इ. सन १७४२-४३.
**सल्लास आर्बैन मया व अलफ.**
जमादिलाखर १७.

---

(179) Govind Dixit Patankar, a learned Brahmin was promised a villag of Rs. 5000 in case Government succeeded in defeating the Mogul, in the present year. Government having obtained success, orders were issued for the grant of a village.

A. D. 1761-62.

## IX. Grants and continuance of Inams, allowames, watans &c.

### (b) Continuance.

(180) An allowance of Rs. 300 granted to Kabir, a religious devotee of Poona, by the Satara Raja and the late Peshwa, and leviable from the villages in the Poona Prant, at the rate of Re. 1 from each village was continued.

A. D. 1742-43.

[ १८१ ] श्री भवानी वगजाई मुक्काम मौजें वावकळी तर्फ आतोण याजकडे पेशजी शेत इनाम चालत होतें; त्यास अलीकडे बहुत दिवस इनाम चालत नाहीं, त्या मुळें देवानें गावांत उपद्रव केला ह्मणून हरबाजी सांवत चौगुले मौजें मजकूर याणें हुजूर विदित केलें. त्यावरून हल्लीं देवाकडे इनाम जमीन बिघे ८१॥ दीड बिघा पड जमीन शेत दिल्ही असे. सदरहू जमीनीचा आकार होईल तो देवाकडे खर्च लिहिणें ह्मणोन रामाजी बावजी हवालदार तर्फ पाल हवेली यास सनद १.

इ. सन १७४७-४८. **सम्मान आर्बैन मया व अलफ.** जिल्हेज १५.

[ १८२ ] गोविंद बल्लाळ व लक्ष्मण बल्लाळ व अंताजी बल्लाळ यांनीं कसबें पुण्याचे मुक्कामीं हुजूर येऊन विनंती केली कीं, आपले तीर्थरूप राजेश्री बाळाजी गोविंद यांनीं श्रम साहास करून किल्ले माहुली हस्तगत केली. त्यावरून स्वामी कृपाळु होऊन किल्ले मजकूरची सबनिशी वतनी व मौजे खातीवली तर्फे राहूर प्रांत भिवंडी हा गांव निमे इनाम पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें देऊन पत्रें करून दिल्हीं आहेत. त्याप्रमाणें सबनिशीची सेवा करीत आहों. व इनाम निमें अनभवीत आहों. त्यास आपले तीर्थरूप बाळाजीपंत मृत्यु पावले. यास्तव पूर्वींचीं पत्रें मनास आणून त्रिवर्गाचें नांवें नवीं पत्रें भोगवटीयास करून दिल्हीं पाहिजेत ह्मणून. त्यावरून मनास आणून तुमचे तीर्थरूपानीं राज्यांत श्रम साहास करून एकनिष्ठपणें सेवा केली. तुमचें चालवणें अवश्यक जाणून पूर्ववत प्रमाणें किल्ले मजकूरची सबनिशी वतनी व इनाम गांव निमे करार करून दिल्हा.

इ. स. १७४८-४९. **तिस्सा आर्बैन मया व अलफ.** जमादिलखर १.

बीतपर्शील.

| | | |
|---|---|---|
| किल्लेमजकूरची सबनिशी तैनात सालीना मोईन शिरस्ता वजा होत नाहीं निव्वळ रुपये ३०० | पोरगे असामी चार तैनात शिरस्तानिवळ नव माही पैकीं हशमनिशी पंधरवडा वजा होतां दर माहे रुपये ११ | मौजें खातीवली तर्फ राहूर प्रांत भिवंडी जल तरू पाषाण निधीनिक्षेप आदीकरून हल्लीं पट्टी व पेस्तर पट्टी खेरीज हकदार व इनामदार देहे निमे ·॥· |

येणें प्रमाणें किल्ले मजकूरच्या सबनिशीस तैनात सालीना मोईन तीनशें व पोरगे चार

---

( 181 ) It was represented that owing to the discontinuance of its Inam land, the idol at Wavkali in Pargana Atone, had brought on calamities on the village. The Inam was therefore ordered to be continued.

A. D. 1747-48.

( 182 ) Balaji Govind having by his bravery and enterprize taken the fort of Mahuli, was given by the Raja of Satara, the watan of sabnis at the fort. He being dead, the watan was continued to his sons.

A. D. 1748-49.

यांस दरमहा तैनात अकरा व इनामगांव निमें दिल्हा असे. किल्ले मजकूरची सबनिशी व इनाम गांव निमे तुह्मी व तुमचे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें अनभवून सुखरूप राहणें ह्मणोन सनद १.

येविशीं सनदा.

१ मौजे मजकूर यांस निमें इनाम विशीं
१ कर्णाजी शिंद नामजाद व कारकून.
किल्ले माहुली यांस सबनिशी विशीं.

---

२

[१८३] दामाजी सजणाजी परभू यानीं हुजूर येऊन विनंति केली कीं मामले मजकुरीं गागेलीची वाडी एक आपणास इनाम सुदामत फिरंगीयाचे अमलापासून आहे. त्यास आपण राजक्रांतीमुळें मुंबईस गेलों. त्याजवरी मामले मजकूर सरकारांत घेतलीयावर सर्व इनामदार हुजूर आले. त्यांस चौथाई इनाम करार करून दिल्हा. ते समयीं आपण आलों नाहीं. याजकरितां कृपाळू होऊन सर्व इनामदारांप्रमाणें चौथाई इनाम चालविला पाहिजे ह्मणोन व वाडी इनाम सुदामत आहे ऐसें राजश्री मोराजी शिंदे यांचें पत्र आणून दिल्हें त्यावरून वाडी मजकूराचा चौथाई महसूल यास पाल द्यावयाचा करार केला असे. तरी आकार होईल त्यापैकीं चौथाई याशीं पाल देणें. वरकड वसूल घेणें ह्मणून बहिरोराम कमाविसदार मामले रेवदंडा याशीं सनद १.

इ. स. १७४८–४९. तिस्सा आर्बैन मया व अलफ. जिल्हेज ११.

[१८४] रामाजी महादेव नामजाद प्रांत साष्टी यांस सनद कीं पळशे ब्राह्मण व गोवर्धन वतनदार परगणें मजकूर यांनीं कसबें पुणीयाचे मुक्कामीं हुजूर येऊन विनंति केली कीं, आपण पुरातन वतनदार उपाध्येपण व जोशीपण आपलें आहे. श्रीमंत आपा कैलाशी साहेबी साष्टी प्रांत फत्ते केला ते समयीं आपण भयास्तव परागंदा होऊन मुंबई प्रांतीं गेलों होतों. श्रीमंतांचे दर्शनास यावें. त्यास आह्मी फिरंगाणचे राहणदार, ह्या राज्याची स्थिती रीत ठावकी नाहीं, भयानें दर्शनास न आलों, वसई व बेलापूर येथील जोशी उपाध्ये हजर होते. त्यांचीं वतनें चालतात. आणि आह्मी समयीं नव्हतों, याजकरितां आमचीं वतनें सरकारांत अमानत करून कमाविशीस सरकारचा गुमास्ता

इ. स. १७४८–४९. तिस्सा आर्बैन मया व अलफ. मोहरम ६.

---

(183.) Damaji Sajnaji Parbhu represented that a hamlet in Mamle Rewadand was held by him in Inam during the Portuguese admin*i*stration and that in consequence of the change of Dynasty, he *h*ad gone to Bombay, and prayed that, as in the case of Inamdar's who presented themselves on the conquest by Government of the territory in question, one fourth of the hamlet might be continued to him as Inam. His prayer was complied with.

A. D. 1748-49.

(184) On the conquest of Prant Bassein by Appasaheb (Chimnaji Appa, Peshwa's uncle) the watandar Priests and Joshis of the territory, surname Palse and Gowardhan, being afraid of the new rule left their homes and went to Bombay without seeing the Peshwa. Their watans were therefore attached. They subsequently came to Poona, and prayed for the restoration of their watans. Their prayer was granted, and a nazar of Rs. 2001 was levied.

A. D. 1748–49.

दिला. त्यास वसई फत्ते झाली ते समयीं श्रीमंत ठाणीयास आले तेव्हां आमचे दोघे तिघेजण ब्राह्मण येऊन श्रीमंतांचे चरणाजवळ अर्ज केला कीं आह्मी गरीब, आमचीं वतनें सरकारी अमानतें दिलीं आहेत तीं स्वामीनीं कृपाळू होऊन आमचीं आह्मांस देवावीं. त्यावरून श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं सांप्रत पुणीयास जाण्याची उतावळी आहे; पुढें खासा स्वारी या प्रांतिं होईल. तेव्हां मनास आणून तुमचीं वतनें तुह्मांस दिलीं जातील ह्मणोन आज्ञा केली होती. त्यास श्रीमंत आपासाहेब कैलासवासी झाले. यामुळें आमचीं वतनें तशींच राहिलीं; त्यास अलिकडे चार पांच वर्षें आह्मी हुजूर अर्ज करावयाशीं येतों. स्वामीनीं कृपाळू होऊन आमचीं वतनें आह्मांस द्यावीं ह्मणोन अर्ज केला. व येविशीं तुह्मी प्रांत मजकूरचे पाटील ह्मत्रे आणून गांवगन्ना चौकशी करून जोशी उपाध्ये खरे पुरातन वतनदार होते त्याप्रमाणें कतबे लिहून घेतले आहेत ह्मणून विनंति केलीत. त्याजवरून पळशे व गोवर्धन हे गरीब, यांजवर कृपाळू होऊन परगणें मजकूरचे पाटील ह्मत्रे यानीं कतबे लिहून दिल्हे आहेत त्याप्रमाणें पळशे व गोवर्धन मजकूर यांचीं वतनें यांशीं उपभोग करावयाशी आज्ञा केली असे. देहझाडा बीतपशील.

२७ तर्फ तुर्भे.
३३ तर्फ मालाड.
२४ तर्फ मराळें.
१ कसबा वानरें.
१४ तर्फ ठाणें.
५ तर्फ घोडबंदर.
४ तर्फ धारावी.

---

१०८

पैकीं वजा अमानत वारिसदार नाहींत. सबब जोशी उपाध्येंपण सरकारी देह सुमार.

१३ तर्फ तुर्भे.
८ तर्फ मालाड.
१४ तर्फ मराळें.
३ तर्फ ठाणें.

---

३८

बाकी निसबत वतनदार देह सुमार.

१४ तर्फ तुर्भे.
२५ तर्फ मालाड.
१० तर्फ मराळें.

१ कसबें वानरें.
११ तर्फ ठाणें.
५ तर्फ घोडबंदर.
४ तर्फ धारावी.
---
७०

यांशीं नांव निशी जोशी.
रामभट व नागेशभट गांव
१ तर्फ ठाणें कसबें मजकूर.

पाखाड्या.

१ चरई.
१ सिद्धेश्वर.
१ पांचघर.
१ कालेहड.
१ हजवड.
---
५

एकूण गांव निंमे.
५ तर्फ मराळें.

१ मौजें मुलूद.
१ मौजें जाऊर.
१ मौजें ठाणें.
१ मौजें भांडूप.
१ मौजें कोपरी मालवणी.
---
५
---
६

कृष्ण पाध्ये गांव.
५ तर्फ मराळें.

१ मौजें व्याहाड.
१ मौजें उणगांव.
१ मौजें साई.

विनायक पंडीत गांव.
तर्फ ठाणें.

१ मौजें चेंदणी.
१ मौजें नवपाडा.
१ कसबा ठाणें पाखाड्या.

१ माहागिरी.
१ रावबाडी.
१ भोगेत.
---
३

एकूण गांव निंमे.
३

बापूभट मौजें कावसरें तर्फ ठाणें. गांव १
केरभट गोवर्धन मौजें वडवली तर्फ ठाणें गांव १
गोविंदभट गोवर्धन.
तर्फ ठाणें गांव.

१ मौजें देवलें.
१ मौजें चेने.
१ मौजें हेरवड.
---
३

धाकभट मौजें तुर्भे कालें.
सेत तर्फ ठाणें गांव १

१ मौजें पसदवली
१ मौजें दवई.

५

१ मौजें तुळशी तर्फ मालाड.

६

शंकरभट तर्फ ठाणें गांव.

१ मौजें बालखुक.
१ मौजें मानीवडें.

२

शंकरभट व रामभट.
तर्फ तुर्भे गांव.

१ मौजें बारेलें.
१ मौजें वडवली.
१ मौजें देवनेर.
१ मौजें आणीक.
१ मौजें माणबुद्रुक.
१ मौजें माणखुर्द.
१ वौजें माडालें.
१ कसबें तुर्भे.
१ मौजें नानाळें.
१ मौजें मारीवली.

१०

पोसभट व शामभट मौजें
चेंबूर तर्फ तुर्भे गांव १.
शिवराम जोशी गांव

१ मौजें मिरें तर्फ घोडबंदर
१ मौजें पहीस तर्फ मालाड.

२

माधव जोशी.

-॥- मौजें वरसावें तर्फ ठाणें.
निमें गांव.
१ तर्फ घोडबंदर.
-॥- मौजें काशी.
-॥- कसबें मशारनिल्हे.

१॥

दाकू जोशी याचा आजा आई कडील ना-
राणय नाईक निपुत्रीक यानें लेकीचे वंशास
दाकू जोशी यांशीं दिल्हे गांव.

-॥- मौजें वरसावें तर्फ ठाणें
निमें.
१ तर्फ घोडबंदर.
.॥. मौजें काशी.
.॥. कसबें मजकूर.

१

१॥.

गोपाळभट व बापूभट
मौजें माहूल तर्फ तुर्भे. गांव १

विठल नाईक याचा पुत्र वेंकट नाईक
तर्फ मालाड गांव.

१ मौजें कापवली.
१ मौजें मालवण.
१ मौजें दारवली.
१ मौजें चाखोद.

४

बेंड फाटक गांव.

२ तर्फ मालाड.

१ मौजें आलासें.
१ मौजें करवें

२

४ तर्फ धारावी.

१ मौजें उतन.
१ मौजें गोराई.
१ मौजें मनोरी.
१ मौजें डोंगरी.

४

६

राम नाईक गोवर्धन
तर्फ मालाड गांव.

१ मौजें शिदवली.
१ मौजें बोरिवली.
१ मौजें मागाठणें.
१ मौजें कणेरी.
१ मौजें एकसर.

५

रणसोड नाईक वस्ती
वसई तर्फ घोडबंदर गांव
देह.

१ मौजें भाईंदर.
१ मौजें तुभें.

२

गोविंद नाईक व जीवन नाईक कावले वामन
नाईक किरिस्ताव गांव.

२ तर्फ तुंभें.

१ मौजें जूव.
१ मौजें आंधेरी.

२

११॥. तर्फ मालाड.

१ कसबें मालाड.
१ मौजें वलनई.
१ मौजें पिडोरी.
१ मौजें कुरार.
१ मौजें चिंचोली.
१ मौजें गोरेगांव.
१ मौजें आरें.
१ मौजें वरसारें.
१ मौजें पाखाडी.
१ मौज मागरें.
१ मोजें मानास.
॥ मोजें वेसावेंराजका-
वलवाडीनिमें.

११॥

१ कसबें वभें व दाडें.

१४॥.

धाकभट मौजें वेसावें तर्फ मालाड.
काळेवाडी गांव ॥

येणें प्रमाणें असामी वीस यांस देह बाहात्तरपैकीं सत्तर गांव व पाखाड्यांपैकीं दोन गांवचीं वतनें यांस द्यावयाचा करार केला असेत. तरी जोशी उपाध्यपण फिर्गीयांचे अमलांत सुदामत चालत होतें त्याची चौकशी करून पूर्वीं चालत आल्याप्रमाणें हालीं इस्तकाबिल छ. १९ मोहरम पासून सदरहू असामींचें जोशी उपाध्यपण चालवणें. सदरहू वतनसंबंधीं पळशे व गोवर्धन जोशी उपाध्ये यांजकडे नजर करार केली रुपये २००१. यांशी मुदती.

१००० साल मजकुरीं अखेर सालीं घेणें.
१००१ पेस्तर सालीं सन खमसेनांत अखेर सालीं घेणें.

२००१

येणें प्रमाणें दोन हजार एक रुपाया करार केला असे. सदरहू मुदती प्रमाणें वसूल घेणें. या खेरीज अडतीस गांवें आहेत त्यांस वारिसदार कोणी नाहीं. सबब जोशी उपाध्यपण सरकारांत ठेविलें असें. तरी सरकारचे गुमास्ते ठेऊन जोशी उपाध्यपण चालवणें ह्मणोन सनद लिहून दिल्ही असे.

इ. स. १७५२–५३.
**सल्लास खमसैन मया व अलफ.**
मोहरम २६.

[ १८५ ] खेमकर्ण वस्ती श्री मथुरा याणीं हुजूर येऊन अर्ज केला कीं, आपण पुरातन पातशाही चाकर, आपणास जमीन येणेंप्रमाणें बिघे.

९०० परगणें लाहर.
१५० मौजें हदरुखी.
१५० मौजें चंदावली
२०० मौजें अचलपूर.

५००

६०० मौजें तुरकीपूर व अबदूलपूर व परगणें सागेनपूर.

११००

येकूण अकराशे बिघे जमीन पेशजीपासून आपणाकडे आहे. पातशाही सनदा आपणा जवळ आहेत. ऐशास सदरील अंमल सांप्रत सरकारामध्यें आला आहे. याकरितां सदरील आकराशे बिघे जमीन आपणाकडे करार करून इनामपत्र करून द्यावें ह्मणोन. त्यावरून बडाये अर्जे खात्रेस आणून तुह्मी पुरातन पातशाही चाकर, तुमचें चालवणें अवश्यक जाणोन तुह्मावर कृपाळू होऊन सदरील अकराशे बिघे जमीन इनाम करार करून दिल्ही असे. तरी सदरील जमीनीचा उपभोग करून सुखरूप राहाणें ह्मणोन सनद १.

येविशीं नारो शंकर यांस सनद कीं, सदरहू अकराशे बिघे जमीनींचा आकार होईल तो तुह्मांस मजुरा पडेल ह्मणोन. १

---

( 185 ) A sanad was issued continuing to Khemkarna an Inam of 1100 Bighas at Mathura enjoyed by him from the time of the Emperor. The province had now come under the rule of the Maratha Government.

A. D. 1752-53.

[ १८६ ] नारोजी वल्लद बच्याजी व रघोजी वल्लद नथोजी व भिकाजी वल्लद रघोजी राजपुर गवडे वस्ती मौजें निंबलक परगणें पारनेर तुह्मी हुजूर कसबें पुण्याचे मुक्कामीं विनंती केली कीं, आपले रेवजी राजपुरे गवंडे यानें मौजें वडगांव येथून अहमदनगरांत नहर बांधोन पाणी नेलें ह्मणोन अहमदशा पातशाहा तक्तानिशीन अहमदनगर यांनीं मेहेरबान होऊन कारागिरीस पसंत करून मौजें निंबलक परगणें मजकूर हा गांव वंशपरंपरेनें कुलबाब कुलकानु आपल्या वडिलांस इनाम दिला. कांहीं दिवस चालला. अलीकडे धामधुमीमुळें गांव टाकून आपण परांगदा होऊन गेलों. त्यामुळें मौजें मजकूरचा भोगवटा राहिला. सांप्रत बहुत दिवस साहेबांचे पदरीं आपले वडील व आपण चाकरी करीत आहों. पूर्वील इनामपत्रें मनास आणून मौजें मजकूर इनाम पूर्ववत वंशपरंपरेनें देणार साहेब धनी आहेत ह्मणोन. त्यावरून पूर्वील पातशाहीचें इनामपत्र आहे तें मनास आणून तुमच्या वडिलानीं व तुह्मीं बहुत दिवस सेवा एकनिष्ठेनें केली. पुरातन कारागीर श्रम साहास बहुत केले आहेत. हें जाणोन तुह्मांवर कृपाळू होऊन मौजें मजकूर मोंगलाई व स्वराज्यपैकीं बाबती दरोबस्त खेरीज हक्कदार व इनामदार इनाम करून दिला असे. तरी मौजें मजकूर आपले दुमाला करून घेऊन तुह्मी व तुमचे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें मोंगलाई व बाबती इनाम अनभवून सुखरूप राहणें ह्मणोन मशारनिल्हेचे नांवें इनाम पत्र १.

इ. स. १७५३–५४. आर्बा खमसैन मया व अलफ- सावान ११.

| | |
|---|---|
| मोकदम मौजें मजकूर यांस | १ |
| देशमुख देशपांडे यांस | १ |
| देशाधिकारी व लेखक वर्तमान भावी यांस. | १ |
| नारो बाबाजी परगणें पारनेर यांस पत्र कीं इनाम पत्राप्रमाणें चालवणें ह्मणोन. | १ |
| | ५ |

(186) Letter to Naroji wallad Bachaji, Raghoji wallad Nathoji and Bhicaj wallad Raghoji Rajpure masons,—residents of Nimblak in Pargana Parner. Coming to the Huzur at Poona, you represent that your ancestor, Rewaji Rajpure Mason constructed a water aqueduct from Wadgaon to Ahmednagar, that Emperor Ahmedsha was pleased with the execution of the work, and granted in Inam the village of Nimblak in the above Pargana hereditarily to his ancestor, that the Inam was enjoyed by him for some time, and that he lost its possession in consequence of his having, during a troublesome period, left the village. You pray that as you and your ancestor have for a long time been in the service of Government, the old title deeds may be inspected and the Inam may be continued hereditarily as of old. The request is complied with.

A. D. 1753-54.

[ १८७ ] कमाविसदार वर्तमानभावी माहालानिहाय यांस सनदा कीं ब्राह्मणांनीं हुजूर येऊन विदित केलें कीं, आपणांस मोंगलाई अमल चौत्रे यावर रोज व जमीन इनाम बिघे व इनाम गांव आहेत. त्याचीं पत्रें आह्मांपाशीं मोंगलाई अमलाचीं आहेत. ते मनास आणून सदरहू करार करून देऊन पत्रें करून दिल्हीं पाहिजेत म्हणोन. त्याजवरून मनास आणितां हे थोर ब्राह्मण, यांचें चालवणें आवश्यक जाणून यांजवर कृपाळू होऊन यांजकडे मोंगलाई अमलापैकीं पेशजीपासून इनाम गांव व इनाम जमीन व चौत्रे यावर रोज चालत आले असतील याचा भोगवटा मनास आणून हल्लीं यांस व यांचे पुत्रपौत्रादी वंशपरंपरेनें यांजकडे चालवणें ह्मणोन कमाविसदार माहालानिहाय यांस सनदा.

इ. स. १७५३–५४.
आर्बा खमसैन
मया व अलफ.
जिल्हेज १८.

चोत्रें यांजवर दररोज.

·॥· कमाविसदार परगणें संगमनेर यांस सनद कीं वेदमूर्ति राजश्री कमळाकर भट उपनाम खांडेकर वास्तव्य कसबें नासिक यांस कसबें संगमनेर तर्फ मजकूर येथें चोत्रे यावर दर रोज रुपये.

·॥≡कसबें नासिक परगणें मजकूर येथें मोंगलाई अमल पैकीं चोत्रे यावर दररोज रुपये.

·॥· चौत्रे शहरचा त्रिंबक भट खांडेकर बिन जीऊभट मजकूर वास्तव्य नासिक.

८≡चौत्रा कवरा जीउभट खांडेकर बिन त्रिंबक भट खांडेकर वास्तव्य कसबें नासिक.

॥≡

१८≡

मौजें दरी परगणें दिंडोरी हा गांव इनाम वेदमूर्ति राजश्री यज्ञेश्वरभट खांडेकर वास्तव्य कसबें नासिक यांजकडे मोंगलाई अमलापासून इनाम आहे. त्या प्रमाणें करार करून पत्रें कमाविसदार परगणें मजकूर यांस दिल्हीं कीं पेशजीपासून यांजकडे इनाम मोंगलाई अमलाचा चालत आला असेल त्या प्रमाणें मनास आणून हालीं यांजकडे सदरहू गांव इनाम चालवणें ह्मणोन सनद १.

कसबें नासिक परगणें मजकूर पैकीं मोंगलाई अमलपैकीं इनाम जमीन बिघे इलाई पावत आली आहे.

·। वेदमूर्ति राजश्री यज्ञेश्वरभट बिन त्रिंबकभट खांडेकर वास्तव्य कसबें नासिक यांजकडे जमीन इलाई बिघे

८१२ बागाईत पैकीं इलाई जमीन बिघे कसबें नासिक पैकीं

८९ सदाशिवभट बिन त्रिंबकभट खांडेकर वास्तव्य कसबें मजकूर.

---

( 187 ) Allowances and lands conferred by the Mogal Government on Brahmins at Nasik were continued by the Peishwas.
A. D. 1753-50.

८≡ जिवभट बिन त्रिंबकभट खांडेकर
वास्तव्य कसबें मजकूर.

८१२
.।१२

एकूण नक्त एक रुपया तीन आणे व जमीन इनाम इलाई बिघे बेताळीस व गांव इनाम करार करून देऊन सनदा कमाविसदारांचे नांवें सनदा लिहून दिल्या असेत.

[ १८८ ] दत्तवरद राजश्री विठल कवी वास्तव्य कसबें सिन्नर परगणें मजकूर यानीं

इ. स. १७५४–५५.
**आर्बा खमसैन मया व अलफ.**
मोहरम ५.

हुजूर येऊन विनंती केली कीं, आपणास मोंगलाई अमलपैकीं राजश्री फत्तेसिंगराव काळे यानीं करार करून देऊन पत्रें करून दिल्हीं आहेत, त्याप्रमाणें चालत आहे. सांप्रत फत्तेसिंगाकडील परगणे सरकारांत जाहले आहेत. तरी स्वामीनीं कृपाळू होऊन फत्तेसिंगाचीं पत्रें आह्मांजवळ आहेत तीं मनास आणून त्याप्रमाणें करार करून देऊन चालविलें पाहिजे ह्मणोन. त्याजवरून मनास आणितां हे थोर जाणून यांजपाशीं फत्तेसिंग काळे यांचीं पत्रें होतीं तीं मनास आणून त्याप्रमाणें करार करून दिल्हीं असे. तरी पेशजीपासून पावत आलें असेल त्याचा भोगवटा मनास आणून त्याप्रमाणें यांजकडे चालवणें. प्रतीवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रती लेहून घेऊन अस्सल पत्र भोगवटीयास मशारनिल्हेजवळ परतोन देणें ह्मणोन कमाविसदार माहालानिहाय यांस सनद १.

[ १८९ ] नारो कृष्ण कमाविसदार कसबें सुरत यांस पत्र कीं परगणें चौऱ्याशी सरकार

इ. स. १७५३–५४.
**आर्बा खमसैन मया व अलफ.**
जमादिलावल १३.

सुरत येथील गांव नेक सादतखान पारशी याशीं जागीर आहेत. त्यास परगणें मजकूरचे देसाई सदरहू गांवचा अमल मशारनिल्हेस देत नाहींत; याजकारितां सदरहू गांवचे आकारपैकीं चौथाई सरकारांत दरसाल घेऊन अंमल चालावावयाचा उपराळा केला पाहिजे ह्मणून मशारनिल्हेनीं

---

(188) An allowance granted by Fattesing to Vithal a poet and a devotee of the Dattatraya deity, residing at Sinnar was ordered to be continued to him.
A. D. 1754-55.

(189) A letter to Naro Krishana Kamavisdar of Kasba Surat. Nek Sadat-Khan Parsi represents that, certain villages in Pargana Choryasi in Sarkar Surat are held in Jahagir by himself, and that the Desai of the Pargana does not give the revenues of the villages to him ; he therefore prays that one fourth of the revenues may be annually taken by Government and that orders may be issued for the rest being continued
A. D. 1753-54.

विनंती केली. त्यास सदरहू साहा गांवांची चौकशी करून सरकारचे अमलाखेरीज असल्यास तुह्मी आपले तर्फेनें साह्यता होईल तितकी करणें आणि अंमल पारशी मजकुराचा दाखल झाल्यास साहा गांवचे आकाराची चौथाई दरसाल सरकारांत वसूल घेऊन जमा करीत जाणें. बाकी तीन हिस्से पारशी मजकुरास देणें ह्मणोन पत्र १.

[ १९० ] शेख अबु बकार मुतवल्ली पीरजादे वास्तव्य कसबें अलंद यांनीं हुजूर कसबें पुणीयाचे मुक्कामीं येऊन विनंती केली कीं, हजरत शेख मखदुम अल्ला-उद्दीन कडेल अनसारी पीर वास्तव्य कसबें मजकूर यांजकडे फूल व ऊद व दिवाबत्ती व उरूस व लंगर वगैरे खर्चाबद्दल परगणें मज-कूर पैकीं इनामगांव बीतपशील तनखा रुपये.

इ. स. १७५८—५९.
तिस्सा खमसैन
मया व अलफ.
जमादिलावल १३.

३५०४॥=॥. मौजें सिपगांव.
१७९४॥=॥. मौजें भागनशिरूर.
१०३३।≡॥. मौजें जिरेंहाली.
१४३४॥≡।. मौजें शाहापूर.

७७६७॥०॥.

येकूण तनखा सात हजार सातशें साडे सदुसष्ट रुपये आर्धा आणा एकूण देहे चार पेशजी पासून मोंगलाईतून इनाम आहेत. व अवरंगजेब बादशाहा व सुलतान महमुद व अल्ली अदल पातशा यांनीं सदरहू गांव पिराकडे इनाम करार करून देऊन फरमान करून दिल्हे आहेत. ते मनास आणून पूर्ववत चालत आल्याप्रमाणें चालवावें ह्मणोन. त्या वरून पीर जागृत स्थान हें जाणोन सदरहू गांव इनाम करून देऊन ही सनद सादर केली असे. तरी सदरहू गांवचा आ-कार सात हजार सातशें साडेसदुसष्ट रुपये आर्धा आणा तनखा भरल्यावर निमें सरकारांत रुपये द्यावे व निमे पिरजाद्यानीं घ्यावे. साडेतीन हजार रुपये वसूल होत तों पावेतों दरग्याकडे गांव चालवणें. जास्ती साडेतीन हजारांवर आकार होईल तो सरकारांत पीरजादे यांजपासून घेत जाणें. दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणें. ही सनदेची प्रती लिहून घेऊन अस्सल सनद भोगवटीयास परतोन देणें ह्मणोन धोंडो आकदेव कमाविसदार परगणें आलंद याचे नांवें सनद १.

रसानगी यादी.

---

to him. You should make inquiries regarding these villages and if the revenues claimed do not belong to Government, you should assist the said person as far as possible. If the Parsi's claim is established, one fourth of the revenues should be annually recovered and credited to Government, the remaining three fourths being continued to him.

(190) The Pir at Kasba Aland being a wakeful diety, certain Inam villages were continued at the request of the Pirjade.

A. D. 1758 59.

[ १९१ ] हाफीस गुलाम महंमद वगैरे हफीज यांनीं हुजूर नजीक कसबें साकर खेडेलें परगणें मजकूर येथील मुक्कामीं येऊन अर्ज केला कीं आपले आजे हाफीज हसन व मुलजादा उदयास व सिती करीमा मलीक अंबर याचे बायकोचे कबरेस ऊद फूल व रोषनाई बद्दल खर्चास इनाम मौजें सालूं खेडें परगणें मजकूरपैकीं सालीना रुपये ३५० साडेतीनशें शाहाजान पातशा यांनीं फर्मान करून देऊन व निजाम उल्मुल्क वगैरे यांनीं सनदा करून दिल्या. त्याप्रमाणें साडेतीनशें रुपये आपणाकडे पावत आले. त्यास सन सित्तेनांत परगणें मजकूरचा मोंगलाई अंमल सरकारांत आल्यापासून चालत नाहीं. तरी साहेबीं कृपाळू होऊन पेशजीच्या सनदा आपणाजवळ आहेत त्या पाहून सदरील प्रमाणें करार करून देऊन सनद करून दिल्ही पाहिजे ह्मणोन. त्याजवरून मनास आणितां हे थोर, यांचें चालवणें जरूर जाणोन पेशजीच्या सनदा पाहोन पेशजीप्रमाणें सालीना खर्चाबद्दल रुपये ३५० साडेतीनशें करार करून दिल्हे असेत. सदरील प्रमाणें पुस्त दर पुस्त याजकडे चालवणें. ताजे सनदेचा उजूर न करणें. हें पत्र भोगवटीयास परतोन देणें ह्मणोन कमाविसदार वर्तमानभावी परगणें टाकली सरकार दौलताबाद यांस पत्र १.

इ. स. १७६०–६१.
**इहिद्दे सितैन मया व अलफ.**
जमादिलाखर १८.

[ १९२ ] लुवेस वल्लद अंतुन फिरंगी गोलंदाज मौजें सांगवें कर्यात मीठ गव्हाण प्रांत राजापूर यानें हुजूर कसबें पुणीयाचे मुक्कामीं येऊन अर्ज केला कीं आपणास मौजें मजकूरपैकीं राजश्री तुळाजी आंगरे सरखेल यांनीं इनाम जमीन बिघे ८१४८१। चौदा बिघे सवा पांड चतुःसीमा पूर्वक करार करून देऊन सनदा करून दिल्या. त्याप्रमाणें अनभवीत आलों. सांप्रत आंग्र्यांकडील अंमल सरकारांत आल्यापासून आपणाकडे इनाम चालत नाहीं. यास्तव साहेबीं मेहेरबान होऊन आपणाजवळ आंग्र्यांच्या सनदा आहेत त्या मनास आणून त्याप्रमाणें सरकारांतून करार करून भोगवटीयास सनदा करून देऊन चालविलें पाहिजे ह्मणोन. त्याजवरून मनास आणून हा मर्द माणूस चाकरीची उमेद धरितो. याजकरितां याचें चालवणें जरूर जाणोन याजवर मेहेरबान होऊन आंग्र्यांच्या सनदा आणून दाखविल्या त्या पाहून त्याप्रमाणें हालीं मौजें मजकूरपैकीं ठिकाण वारस निसबत देवद्दार गयाली पड इनाम जमीन बरहुकूम मोजणी बिघे बीतपशील. + + + + + + + + + + + +

इ. स. १७६०–६१.
**इहिद्दे सितैन मया व अलफ.**
रपिलावक २४.

---

(191) An allowance out of the revenues of Salukhed was granted by the Emperor for the service of burning incense at and strewing flowers over the Mausoleums of the wife of Malik Amber. The allowance was continued by the Peishwas.

A. D. 1760-61.

(192) Louis Antone a Portugese gunner was granted Inam land at Sangwe in Prant Rajapur by Tulaji Angria. The grant was continued by the Peishwa.

A. D. 1760-61.

येणें प्रमाणें चतु:सीमा पूर्वक सदरील जमीन व जमिनींतील उंडणीचीं झाडें व कुणबी याचें घर इनाम करार करून दिली असे. तरी पेशजीचा भोगवटा मनास आणून त्या प्रमाणें जमीन व जमीनींतील झाडें व घर कुणबी याचे दुमाला करून यास व याचे पुस्त दर पुस्त इनाम चालवीत जाणें. दरसाल नवीन पत्राचा आक्षेप न करणें. या पत्राची प्रति लिहून घेऊन हें अस्सल पत्र याजवळ भोगवटीयास परतोन देणें. सदरील जमीनींत बागाईत व माडणी जिराईत करील व उंडणीचे झाडाचें तेल व कुणबी याचे घराचा आकार होईल तो याचे नांवें व याचे लेंकरां लेकरीं यांचे नांवें इनाम खर्च लिहीत जाणें ह्मणोन मोकदम यांचे नांवें गांवास पत्र १.

खुद लुवेस वल्लद अंतुन फिरंगी याचे नांवें पत्र १.

## १० किताबती व बहुमान.

[ १९३ ] राजश्री राजा विक्रमाजीत यांस सनद कीं तुमचे आजे अर्जुनसिंग यांस राजेपणाचा किताब दिला होता तो तुह्मांस दिल्हा असे, व अर्जुनसिंग यांस चाकरी मध्यें जहागीर दिली होती, ते तुह्माकडे साल मजकुरीं करार केली असे. तरी तुह्मी सरकारची चाकरी करून जहागीर खात जाणें.

इ. स. १७४९–५०. खमसैन मया व अलफ. सफर २०.

[ १९४ ] कोणा एखादे इसमास पालखीचा हुकूम झाला ह्मणजे त्याजबरोबर पालखीची नेमणूक सालीना करून देत असत. त्याच प्रमाणें मशाल बाळगण्याविशीं हुकूम झाल्यास मशाली संबंधी नेमणूक होत असे. विठल शिवदेव यांस १७५१–५२त घड्याळ बाळगण्याविशीं हुकूम झाला व त्याजबरोबर घड्याळची नेमणूक ठरवून दिली.

सन. १७५२—५३. सल्लास खमसैन मया व अलफ. साबान २७.

[ १९५ ] आखेराज नाईक वणजारे वस्ती सरकार बिज्यागड तुंवा बैल तांडे भरून मुलखांत उदीम व्यवसाय करून आमदरफ्त करितोस या करितां तुजला नगारा व निशाण द्यावें ह्मणोन राजश्री रामचंद्र बल्लाळ यांनीं खरगोणचे मुक्कामीं हुजूर येऊन विनंती केली. त्यावरून तुजवर कृपाळू होऊन नगारा व निशाण बाळगावयाची तुजला आज्ञा केली असे. तरी नगारा निशाण बाळगीत जाणें आणि मुलखांत दाण्याची आमदरफ्ती करून सुखरूप राहणें ह्मणून आज्ञापत्र सनद १.

इ. स. १७५३–५४. आर्बा खमसैन मया व अलफ. जिल्हेज ६.

## 10. Grant of titles and honours.

( 193 ) Vikramajit was granted the title of Rája, which was enjoyed by his grand father, and a service Jahagir of 6 villages was also conferred on him.

A. D. 1749-50.

( 194 ) When as a mark of honour, any person was permitted to use a palanquin or a torch, an allowance sufficient to defray the expenses of keeping up a palanquin or a torch was at the same time conferred on him. In A. D. 1751-52 Vithal Shiwdev the founder of the Vinchurkar family was allowed to use a gong and an allowance for the entertainment of a gong-keeper was given to him.

A. D. 1752-54.

रसानगी चिठ्ठी.

खालील किताब रोजकीर्दींत आढळून आले.

| ज्या वर्षाच्या रोजकीर्दींत दाखल आहे तें वर्ष. | पदवी | पदवी धारण करणाराचें नांव. |
|---|---|---|
| १७४०–४१ | हिंदुराव | माधवराव सोमवंशी. |
| १७५४ | हिंमत बहादर | उदाजी चव्हाण. |
| १७५४ | समशेर बहादर. | दमाजी गाईकवाड बडोदेकर. |
| १७६४ च्या पूर्वी | वजारत माहा | मानाजी आंग्रे कुलाबेकर. |
| १७६४ | सेनापती | यशवंतराव दाभाडे तळेगांवकर. |
| १७६४ | सेना खासखेल | त्रिंबकराव दाभाडे तळेगांवकर. |
| १७६४ | सेनासाहेब सुभा. | राघोजी भोंसले नागपूरकर. |
| १७५७–५८ | सेना धुरंधर | मुधोजी भोसलें नागपूरकर. |
| १७५८–५९<br>१७६०–६१ | धुरंधर समशेर बहादर | संताजी आटोळे. |
| १७५९–६० | महा राव. | जानोजी निंबाळकर. |
| १७६०–६१ | हिंमतबहादर. | खंडेराव गाईकवाड. |
| १७६०–६१ | रस्तमराव समशेर बहादर. | मानसिंग कडू. |
| १७६०–६१ | फत्तेजंग बहादर. | सुभानराव महार्णव. |
| १७६०–६१ | सफेजंग बहादर. | हणमंतराव आटोळे. |
| " | सर लष्कर. | निंबाजी नाईक. |
| " | सेना बार हजारी. | सुलतानजी यशवंतराव. |

(195) A sanad to Akheraj Naik Wanjare residing in Sarkar Bijagad.

A. D. 1753-54. You carry merchandize on bullocks through the country, and increase its prosperity. Ramchandra Ballal therefore requested the Huzur at Khargon to permit you to use a drum and a flag. The request is granted.

(196). The following titles appear in the Diaries.

| Year of Diary in which the entry occurs. | Title. | Name of the person holding it. |
|---|---|---|
| 1740-41 | Hinduráo. | Madhavrao Somavanshi. |
| 1754 | Himat Bahadar. | Udaji Chavan. |
| 1754 | Samasher Bahádur. | Damáji Gaikwad of Baroda. |
| Before 1764 | Vijárat Màhà. | Manaji Angre of Kolaba. |
| 1764 | Senápati. | Yeshvantráo Dabhàde of Talegaon. |
| 1764 | Senákháskhel. | Trimbakrao Dabhade of Talegaon. |
| Do. | Sena Sàheb Subhá. | Raghoji Bhonsle of Nagpur. |
| 1757-59 | Sená Dhurandhar. | Mudhoji Bhosle of Nagpur. |
| 1758-59 1760-61 | Dhurandhar Samsher Bahadar. | Santáji Atole. |
| 1759-60 | Mahàrao. | Janoji Nimbalkar. |
| 1760-61 | Himat Bahadar. | Khanderao Gaikwad |
| Do. | Rastumrao Samasher Bahadar. | Mansing Kadu. |
| Do. | Fattejang Bahadar. | Subhanrao Maharnava. |
| Do. | Safejung Bahàdur. | Hanmantráo Atole. |
| Do. | Sar Lashkar. | Nimbaji Naik. |
| Do. | Sená Bára Hajari. | Sultanji Yeshvantrao |

## ११ सार्वजनिक इमारती व लोकोपयोगी कामें.

### ( अ ) इमारती.

( १९६ ) नारोबानाईक अनगळ भीमेच्या कांठीं पायऱ्या बांधीत आहेत, त्या कामावरी पाथरवट व गवंडी वगैरे माणसें आहेत. त्यांस वेठबिगारीचा उपद्रव लावीत न जाणें. मशारनिल्हे पायऱ्या बांधीत आहेत तेथें पंनास साठ हात जागा औरस चौरस आहे; ती मशारनिल्हेस संन्याशांचे मठ व ब्राह्मणांचीं घरें बांधावयाशी जागा देविली असे. देणें. या खेरीज दाहा पांच हात जागा जास्ती असली तरी मशारनिल्हेकडे असों देणें. मशारनिल्हेचा अगत्यवाद धरून सर्व प्रकारें साहित्य करीत जाणें ह्मणोन गोविंद हरी यांस पत्र १.

इ. स. १७४३–४४. आर्बा आर्बैन मया व अलफ. रमजान २७.

सदरहू जाग्याचा वारसदार कोणी उभा राहिला तरी मशारनिल्हेस जागा देऊं नये. या प्रमाणें मशारनिल्हेशी बोली केली असे.

[ १९७ ] आबाजी दादाजी कमाविसदार तर्फ पाल हवेली यास पत्र कीं राजश्री अंताजी नारायण यांनीं धर्मशाळा कसबें मजकुरीं देवा संनिध बांधिली आहे; त्यामध्यें ब्राह्मण वगैरे वाटसरूं हमेशा येऊन राहतात. याकरितां धर्मशाळा शाकारावयास आज्ञा केली आहे. तरी दोन हजार पावेतों पेढा कम जास्ती लागेल तो लावून धर्मशाळा शाकारून ठेवणें. निर्मळ होय ते गोष्ट करणें ह्मणोन सनद १.

इ. स. १७४९–५०. खमसेन मया व अलफ. जमादिलाखर १७.

[ १९८ ] कृष्णाजी भैरव मौजें कोरेगांव तर्फ पाबळ प्रांत जुन्नर भीमातीर येथें धर्मशाळा बांधणार. त्यास धर्मशाळा बांधावयास मौजें मजकुरीं गांवांत जागा लांब गज ४० चाळीस व रूंद चाळीस गज जागा देविली असे. धर्मशाळेचे उपयोगी जागा नेमून देणें ह्मणोन चिरंजीव राजश्री सदाशिव चिमणाजी यांचें नांवे सनद १.

इ. स. १७६०–६१. इहिद्दे सितैन मया व अलफ. सफर २४

---

## 11. Public Buildings and works of Public convenience.

### ( a ) Buildings.

( 196 ) Naroba Naik Angal was constructing a flight of steps leading to the river Bhima and orders were issued to abtsain from calling upon any of the Masons or stone-cutters serving under him, for forced labour, and to allow him to take 50 or 60 *hats* of grounds in the neighbourhood for building an asylum for sanyashis and houses for Brahmins. Naroba was however informed that the grant of the site was subject to the condition that it did not already belong to any other person.

A. D. 1743-44.

( 197 ) Antaji Narayan constructed a Dharmsala at Pal, and it was being used by travellers. Orders were issued for its annual repair.

A. D. 1749-50.

( 198 ) Krishnaji Bhairao Thathe wished to build a Dharamshala at Koregaon in Taraf Pabal. It was ordered that a site in the village, 40 Gaj by 40 Gaj should be assigned for the purpose.

A. D. 1760-61.

## ( ब ) विहिरी व तलाव.

[ १९९ ] नारो त्रिंबक यांस सनद कीं श्री धनवी येथें पाणी नाहीं. जन यात्रा विशेष मिळ्ये. लोक उदकासाठीं हैराण होतात. याजकरितां देवाजवळ विहीर अगर तळें बांधावयाशी आज्ञा केली असे. तरी दोन तीन चार हजार रुपये खर्च होऊन विहीर अगर तळें बांधलें असेल तेथें काम लावून तयार करणें. पैका सरकारांतून दिल्हा जाईल ह्मणोन सनद १.

इ. स. १७४९–५०.
खमसेन मया व अलफ.
सफर २४.

[ २०० ] देशमूख देशपांडे परगणें कर्डें यांस सनद कीं कसबें कर्डें येथें अगस्ती तीर्थ आहे त्याची एक भूज ढासळली आहे. ते बांधावयाशी बाबुराव माणकेश्वर सुभेदार यांशी आज्ञा केली असे. तर तुह्मी परगणें मजकुरीं पट्टी करून रुपये ७०० सातशें सरकारच्या ऐवजा खेरीज मशारनिल्हेकडे देणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७५३–५४.
आर्बा खमसैन मया व अलफ.
मोहरम १७.

येविशीं मोकदम देहाये परगणें मजकूर यांस आज्ञापत्र. रसानगी याद.

## ( क ) इतर कामें.

[ २०१ ] रामचंद्र हरी यांस पत्र कीं श्री पंढरपूर क्षेत्र तुह्मांकडे आहे. तेथील मागें ऐवज तुह्माकडे जमा झाला आहे. तो व पुढें जमा होईल ते डांगे होणार व बडवे यांची हरकी गुन्हेगारी येईल तो ऐवज खर्च करून चंद्रभागेचा घाट उत्तम बांधणें ह्मणोन पत्र.

इ. स. १७४४–४५.
खमस आर्बैन मया व अलफ.
जिल्हेज १७.

---

## ( b ) Wells and Tanks.

( 199 ) There was scracity of water at Shri Dhanvi, and the pilgrims, who assembled inconsiderable numbers at the fair, were consequently put to much trouble. Orders were issued for the construction of a tank or a well near the temple at the cost of Government. Rs. 4000 were sanctioned for this purpose.

A. D. 1749-50.

( 200 ) A sanad to the Deshamukha and Deshapande of Pargana Karde. At the village of Karde there is a sacred water reservior which goes by the name of Agasti. One wall of it having fallen down Baburao Mankeshwar Subhedar is ordered to repair it. You should therefore levy from your Pargana, in addition to the Government Revenue, the sum of Rs. 700, and pay it to the said officer.

A. D. 1753-54.

## ( c ) Other Works.

( 201. ) Sanction was accorded to the construction of *Ghaut* ( stairs ) on the banks of the Chandrabhaga ( Bhima ) from the revenues of Pandharpur.

A. D. 1760-61.

[२०२] पव्हई खर्च.

इ. स. १७५२–५३.
**सल्लास खमसैन मया व अलफ.**
जमादिलाखर २०.

चिरंजीव राजश्री नीलकंठ महादेव यांस सनद कीं, खांबटकीचे घाटास पोवई घालण्यानिमित्त नथो सदाशिव पाठविले आहेत त्यांस सामान.

दाळ हरभऱ्याची कैली ८४ गूळ वजन पक्के ८१॥.

सुमारी सामान.

४९ कुंभार काम.

९ रांजण.
१० डेरे.
१० घागरी.
१० मडकीं.
१० मोघे.

४९

२ चराठें दर लांब हात १२.
१ जोत.

४८

येणें प्रमाणें प्रांत पुणेंपैकीं देणें. या खेरीज **मांडव घालून देणें**. व राहण्यास खोपा दोन बांधोन देणें ह्मणोन सनद १.

## १२ टपालखातें.

[२०३] रामचंद्र हरी पथक यांशीं पेशजी दाहा हजार रुपयांची वरात तुह्मांकडे दिल्ही होती ते वरात बाबुजीनाईक भिडे यांनीं विकत घेतली, त्याजपासून जगन्नाथनाईक भावे यांनीं विकत घेऊन छत्रपुरास गणेशनाईक भावे यांजकडे कासिदाबरोबर पाठविली. त्यास ते कासिद मार्गी मारले गेले व वरात गल्हाठली ह्मणोन हुजर विदित झालें. त्यावरून ही दुसरी वरात तुह्मास सादर केली असे. तरी मशारनिल्हे यांस रुपये १०००० दाहा हजार देविलें असेत. पावते करून पावलीयाचे कबजा घेणें ह्मणोन गोविंद बल्लाळ कमाविसदार प्रांत बुंदेलखंड यांस सनद सादर १.

इ. स. १७४७–४८.
**समान आर्बैन मया व अलफ.**
रबिलाखर ८.

---

(202.) An establishment was kept at Government expense to give water to travellers in Khambatki Ghaut.
A. D. 1752-53.

**12 Postal Service.**

(203.) Some messengers carrying order of assignment on the revenues of Prant Bundelkhand, were murdered on the way. Other messengers were therefore sent with a fresh order.
A. D. 1747-48.

[ २०४ ] बापुजी महादेव मुक्काम दिल्ली यांस पत्र कीं कासीद जथे हिलिंदा.

इ. स. १७५३–५४.
आर्बा खमसैन मया
व अलफ.
जिल्काद ८.

१ खेमकर्ण.
१ भावदीन.
—
२

तुह्मांकडे येथून छ ९ जिल्काद प्रातःकाळीं रवाना केले आहेत. हे सोळावे दिवशीं पावले तरी इनाम पन्नास रुपये देणें. सतरावे दिवशीं पावले तर चाळीस रुपये देणें. अठरावे दिवशीं पावले तर तीस रुपये देणें, एकुणिसावे दिवशीं पावले तर कांहीं न देणें ह्मणोन राजश्री हिलिंदा कासिद पत्र १. मुक्काम थाळनेर.

[ २०५ ] बापुजी महादेव वकील यांस कीं कासीद जथे हिलिंदा.

इ. स. १७५३–५४.
आर्बा खमसैन मया
व अलफ.
जिल्काद २०.

१ हरी सिंग.
१ देवी
—
२

तुह्मांकडे छ २१ जिल्काद प्रांतःकाळीं महेश्वरचे मुक्कामींहून पाठविले आहेत. हे तेरा दिवसा तुम्हांपाशीं पावले तरी यांस इनाम रुपये ३५ पस्तीस रुपये देणें म्हणोन पत्र १.

इ. स. १७५३–५४.
आर्बा खमसैन मया
व अलफ.
जिल्हेज १७.

[ २०६ ] दामोदर महादेव वकील दिल्ली यांस पत्र कीं, खासा स्वारी दिल्ली प्रांतीं जात आहे. या करितां दिल्लीहून लष्करपर्यंत कासीदाची डाक ठेवावयास आज्ञा केली असे. तरी डाक ठेवून बातमी वरचेवर पोंचवीत जाणें. डाकेस खर्च थोडाबहूत लागेल तो मजुरा दिल्हा जाईल म्हणोन पत्र १.

---

A. D. 1753-54.

(204) Two messengers were sent from Thalner to Delhi with letters to Bapuji Mahadev, the Peishwa's representative at the Court of Delhi. They were despatched on the morning of the 9th of Jilkad, and it was ordered that they should be given a reward of Rs. 50 if they reached their destination on the 16th day after their departure, Rs. 40 if they reached on the 17th day, Rs. 30 if they reached on the 18th day. No reward was to be given if they reached Delhi after that period.

A. D. 1753-54.

(205) Two messengers were despatched on the morning of the 21st of Jilkad from Maheshwar to Delhi, and it was ordered that they should be given a reward of Rs. 35 if they reached the latter place on the 13th day of their departure.

A. D. 1753-54.

(206.) A letter to Damodar Mahadeo Vakil at Delhi. The Peishwa is going in person to the provinces of Delhi. You are therefore directed to maintain a sufficient number of messengers to carry the Post from Delhi to camp and to send information as frequently as possible.

## १३ वैद्यकी व शस्त्रक्रिया.

[ २०७ ] रणसोडनाईक वैद्य यांस जंजिरें वसईमध्यें घर रहावयास दिलें आहे, तेथें नारळीचीं झाडें सहा (६), व पेरुचीं झाडें तीन (३), व डाळिंबांचीं तीन (३) आहेत. त्याचा दिवाणचे धान्याचा मशारनिल्हेस तगादा न करणें ह्मणून शंकराजी केशव नामनाथ मजकूर यांस पत्र १.

इ० स० १७४०-४१
इहिद्दे आर्बैन
मया व अलफ
रमजान २९

[ २०८ ] राजश्री शिवराम वासुदेव वैद्य उपनाम मांडे, गोत्र काश्यप, सूत्र वाजशनई यांस पत्र कीं, तुह्मी शाहुनगर नजीक किल्ले सातारा याचे मुकामीं राजश्री स्वामी सन्निध विनंति केली कीं, मौजें.... .... .... .... .... .... .... .... .... हा गांव पूर्वीं राजश्री फत्तेसिंग भोंसले यांनीं आपल्यास मुकासा दिला आहे. तो गांव महाराजांनीं इनाम करून देऊन वंशपरंपरेनें चालविला पाहिजे. ह्मणून विदित केलें. त्याजवरून मनास आणितां तुह्मी वैद्यक्रियेंत बहुत निपूण, तुमचे कुटुंबाचा योगक्षेम चालला पाहिजे, हें जाणून राजश्री स्वामी तुह्मांवर कृपाळू होऊन, मौजें मजकूर, पेशजीच्या मुकासीयांकडून दूर करून, तुह्मांस मुकासबाब नूतन इनाम करून कुलबाब खेरीज हक्कदार व इनामदार करून वंशपरंपरेनें इनाम करून दिला असे. पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवणें ह्मणून इनाम पत्र १.

इ० स० १७४४-४५
खामस आर्बैन
मया व अलफ
जमादिलाखर २९.

---

## 13 Medicine and Surgery

207 Ransod Náik, a medical practitioner, was given a house for residence, at fort Bassein. Orders were issued exempting him from taxation on account of 6 cocoanut trees, 3 guava trees, and 3 pomegranate trees, in his compound.

A. D. 1740-41.

208 A village was under the Raja's orders granted in Inàm to Shivràm Wásudeo Mánde for his proficiency in Medicine.

A. D. 1744-45.

[ २०९ ] राजे महंमद, शस्त्र हकीम, यांस मौजे .... .... .... .... .... हा गांव पेशजीच्या मोकासीयाकडून दूर करून हल्लीं मोकासा दिल्हा असे. तरी मशार निल्हेशीं रुजू राहून मोकास बाबेचा अंमल सुरळीत देणें ह्मणोन. गांवास सनद १.

इ० स० १७५०–५१ इहिद्दे खमसेन मया व अलफ जिल्हेज ६

श्रीपतराव बापुजी यास सनद १.

कीं गांवचा आकार होईल ती बद्दलमुशाहिरा खर्च लिहिणें ह्मणोन.

[ २१० ] नरोराम बिन नरहर वैद्य उपनाम देव, गोत्र अवतिक्ष्ण, सूत्र कात्यायन, वास्तव्य कसबे नवापूर, प्रांत बागलाण; तुह्मी हुजूर येऊन विनंती केली कीं, आपण पुरातन वैद्य, परोपकारार्थही औषधउपाय करितों. कुटुंब वत्सल, योगक्षेम चालिला पाहिजे. यास्तव राजश्री दमाजी गायकवाड यांनीं माहालोमाहाल सरकारचे आकाराखेरीज गुजराथ प्रांतें रयत निसबत धर्मपट्टी करून दिली आहे. महाल बी तपशील:—रुपये:—

इ० स० १७५२–५३ सल्लास खमसेन मया व अलफ जिलकाद ४

१२० परगणे उरपाड.
५५ परगणे अंकलेश्वर.
५५ परगणे हसोठ.
४५ परगणे पारचोल.
५० परगणे सुपें.

३२५

एकूण सवा तीनशें रुपये पांच महालीं करून दिले आहेत, त्याप्रमाणें आजी तागायत पावत आले. हल्लीं सदरहू महाल सरकारांत जहाले, यास्तव सदरहू प्रमाणें धर्मपट्टीचा ऐवज करार करून दिला पाहिजे ह्मणून. त्यावरून मनास आणितां तुह्मी प्रामाणिक वैद्य, परोपकारी जाणून तुह्मास सदरहू महालावरी पेशजी प्रमाणें सवा तीनशें रुपये सरकारचे जमाबंदी खेरीज रयत निसबत धर्मपट्टी करार करून दिले असेत. तरी सदरहू प्रमाणें सवा तीनशें रुपये सदरहू पांचा माहालीं कमाविसदाराकडून वसूल करवून घेऊन वैद्यक करून सुखरूप रहाणें, दरसाल सवा तीनशें रुपये घेत जाणें, आल्या गेल्यास औषध उपाय करीत जाणें, ह्मणोन—पत्र १

---

A. D. 1750-51 209 A village was granted to Raje Mahomed, a man skilled in surgery.

210 Naroram Narhar Deo, residing in Kasba Newapur in Prant Baglan, used to dispense medicines gratis to the people. An allowance was, therefore, conferred on him. A. D. 1752-53.

येवीशीं पत्रें.

१ देशमुख देशपांडे सदरहू माहालिनिहाय यांस पत्र कीं १

सदरहू सवातीनशें रुपये रयत निसबत सरकारचे

जमाबंदी खेरीज धर्मपट्टी देत जाणें ह्मणोन पत्र. ६

कमाविसदार सदरहू माहालचे यांस पत्रें कीं,

सदरहू धर्मपट्टीचे सवातीनशें रुपये दरसाल

६ वसूल करून वैद्यांस देत जाणें.

१ परगणें अंकलेश्वर, पांडूरंग विश्वनाथ

१ परगणें सुपें, उधो गोविंद.

१ परगणें पारचोल, चिंतो त्रिंबक.

१ परगणें उरपाड, त्रिंबक शिवदेव.

१ परगणें हसोट, रामचंद्र विश्वनाथ.

———— ७

६

इ० स० १७५३-५४
**आर्बा खमसेन मया व अलफ**
जिल्हेज २९

[ २११ ] वेदमूर्ति राजश्री बाळकृष्ण वैद्य बिन चिंतामण वैद्य, गोत्र धारण, शाखा वाजश्नी, वास्तव्य अमदानगर, यांनीं हुजूर कसबे पुण्याचे मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, आपण वैद्यक उपाय कैलासवासी माहाराज स्वामी सन्निध बहुत केले, त्यावरून माहाराज कृपाळू होऊन मौजे सुभे खुजस्ते बुनीयाद येथील मुकासबाब देखील बाबती नूतन इनाम देऊन राजपत्रें करून दिलीं आहेत, तीं मनास आणून त्याप्रमाणें सरकारचीं इनामपत्रें करून दिलीं पाहिजेत ह्मणून. त्याजवरून मनास आणून, तुह्मी थोर सत्पात्र वैद्यकक्रियेमध्यें निपूण, तुमचें चालवणें अवश्यक जाणून तुह्मावर कृपाळू होऊन तुह्माजवळ राजपत्रें आहेत तीं मनास आणून, तुह्मास मौजें मजकूर येथील मुकासबाबदेखील बाबती कुलबाब कुलकानु हल्लीं पट्टी व पेस्तर पट्टी खेरीज हक्कदार व इनामदार करून राजपत्राप्रमाणें इनाम करार करून दिला असे. तरी मौजे मजकूर येथील मुकासबाव देखील बाबती तुह्मी आपले दुमाला करून घेऊन

---

211 The grant of a village in Inam by the deceased Satara Rájá to his physician Balkrishna Chintaman Dhàran, was confirmed by the Peshwa.

A. D. 1753-54

तुह्मीं व तुमचे पुत्र पौत्रादी वंशपरंपरेनें अनुभवून सुखरूप राहणें, ह्मणून रसानगी चिट्ठी पत्र येविशीं, १

मोकादम मौजे मजकूर याशीं पत्र-- १

—

२

चिटणिशीं पत्रें २

१ देशाधिकारी व लेखक वर्तमानभावी यांस परगणे कडेवलीत.

१ जमीदार तर्फ कडे प्रांत कडेवलीत यांस.

—

२ --

४

इ० स० १७५४-५५ खमस खमसेन मया व अलफ रमजान ११

[ २१२ ] रामाजी महादेव प्रांत साष्टी, यांनीं सुरण सुमार ७५ पाऊणशें पाठविले ते वैद्यखान्याकडे जमा झाले ह्मणोन जाब्र लिहून दिला असे.

इ० स० १७५४-५५ खमस खमसेन मया व अलफ जिलकाद २१

[ २१३ ] वेदमूर्ति राजश्री जयशंकर व वेदशंकर बिन भवानीशंकर वैद्य गुजराथी, उपनांव देव, गोत्र अवतखण, सूत्र वाजश्नी, यांनीं हुजूर कसबे पुण्याचे मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, आपले तीर्थरूप यांस मोजे तळेगांव अजनेर परगणे नाशिक येथील मोकासबाबेचा अंमल मळोजी पवार यांनीं धर्मार्थ आरोग्यशाळेबद्दल दिला, त्याप्रमाणें मोजे मजकूरची मोकासबाब आपले तीर्थरूपाकडे चालत आली, व आपणही मौजे मजकूरचा अंमल मोकासबाबेचा अनुभवित आलों. मळोजी पवार यांस देवाज्ञा झाल्यावर राजश्री जगजीवन पवारही सदरहू प्रमाणें चालवीत आले. सांप्रती जगजीवन पवार यांचा सरंजाम सरकारांत जप्त केला. ते समयीं मौजे मजकूर आपले कडील गांव जप्तीमुळें सरकारांत आला, तरी स्वामीनीं कृपाळू होऊन धर्मार्थ आरोग्यशाळेबद्दल मळोजी पवार यांनीं मोकासबाबेचा अम्मल दिला आहे तो मोकळा करून दिला पाहिजे. व आणखी सरकारांतून आरोग्यशाळेबद्दल मौजे मजकूरचा अम्मल करार करून दिलिया, ब्राह्मणादिक यातींस औषधें देऊन तेणेंकरून राजश्री स्वामी व स्वामीच्या

---

A. D. 1754-55.

212. 75 *Surans* ( सुरण ) received from Salsette were credited to the Medical Department.

A. D. 1754—55.

213 Maloji Powar previously granted a share of revenue in a village in Nasik to the ancestors of Jayashankar and Deoshankar, physicians, for opening a charitable dispensary. The Powar's saranjam was discontinued by Government, and the above grant was attached. It was now restored, with some addition, to the physicians on condition that if they failed to dispense medicines to the poor, the grant would be revoked.

राज्यास श्रेयस्कर आहे म्हणून. त्याजवरून मनास आणितां तुह्मी थोर, वैद्यक्रियेंत निपूण, गोर गरिबांस औषध द्याल तेणेंकरून राजश्री स्वामीस व स्वामींच्या राज्यास श्रेयस्कर, हें जाणून तुह्मांवर कृपाळु होऊन तुह्मांस धर्मार्थ आरोग्यशाळेबद्दल पेशजी मळोजी पवार यांनीं मोकासबाबेचा अम्मल मौजें मजकूरचा दिला होता, तो हल्लीं मोकळा करून पूर्ववत प्रमाणें तुम्हांकडे करार करून दिला असे, व सरकारतर्फेनें मौजे मजकूरचा अम्मल जाहागीर व फौजदारी व सरदेशमुखी व बाबती, घास दाणा व खरेदीसुद्धां वगैरे कुलबाब कुलकानु आरोग्यशाळेबद्दल देखील वेठबिगार करार करून दिला असे. तरी मौजे मजकूरचा अम्मल कुलबाब कुलकानु दरोबस्त देखील वेठबिगारसुद्धां आपले दुमाला करून घेऊन मौजे मजकूरचा जो आकार होईल त्याचा व्यय आरोग्यशाळेकडे करून सुखरुप राहणें. गांवचा तनखा रुपये ३०७॥ तीनशें साडेसात रुपये आहे, परंतु गांव गुज्यावीस सबब इस्तावा परगणें मजकुरास दिला आहे. त्या हिशेबी प्रमाणें चौथे वर्षी आठ नवशें रुपये आकार होईल. पैकीं वाजवी तह करून दिल्याप्रमाणें पवाराचे मोकासबाबेचा ऐवज वजा होऊन बाकी सरकार तर्फेचा ऐवज आकार सालहासाल होत जाईल. त्याचा धर्मार्थ औषधाचा बारमाही खर्च करीत जाणें. गरीबगुरीबांस औषध न दिलें, सरकारांत जप्त करून दुसरीयास गांव सांगावा असा करार करून दिला असे, ह्मणून मशार निल्हेचे नावें सनद .... १.

मौजे मजकूरास सनद १.

२

रसानगी चिट्टी.

देशाधिकारी लेखक वर्तमान भावी यास पत्र १.

जमीदार परगणे नाशिक यास पत्र १.

४

[२१४] मोरोजी शिंदे, जंजिरे रेवदंडा, यांस सनद कीं, फिरमाडतीग पाद्री वैद्य फिरंगी रेवदंडेकर यास नक्त रुपये २५ पंचवीस भात कैली खंडी (१) एक खंडी भात करार करून देविले असे. तरी सदरहू प्रमाणें पावता करणें आणि मशारनिल्हेचे नावें खर्च लिहित जाणें ह्मणोन सनद १.

इ० स० १७५५–५६
सित खमसेन
मया व अलफ
सफर १८

214 A Sanad to Moroji Sinde of fort Revdanda:—Fir Mad-Tig Padri (फीर माडतीग पाद्री वैद्य), a Portugese doctor, has been granted (annually) Rs. 25 in cash and rice one Khandi. The amount and the quantity of rice should be paid accordingly.

A. D. 1755-56.

[ २१५ ] विसाजी केशव, कमाविसदार कसबे सुरत, यांस सनद कीं, मीर आबुतालब याजकडून सरकारांत औषधें सुरतेहून खरेदी करून आणविलीं आहेत. यादी मशारनिल्हेचे पत्रांत आहे. त्याप्रमाणें आपले परिक्षेनें औषधें चांगलीं घेऊन पाठवितील. तुह्मीं औषधाचे खरेदीबद्दल कसबे मजकूर पैकीं रु० १००० एक हजार पर्यंत देणें आणि पावल्याचा कबजा घेणें ह्मणून सनद १.

इ० स० १७६०–६१
इहिदे सितैन
मया व अलफ
रबिलाखर १२

## १४ व्यापार व कारखाने.

### ( अ ) पेठा व बाजार वसविणें.

[ २१६ ] मातबरपुरा, कसबें नाशीक, येथील वसाहत करावयास तुह्मांस आज्ञा केली असे, तरी पुऱ्याची वसाहत करून इमानें इतबारें चौकशीनें अम्मल करून आकार होईल तो सरकारांत पावता करून पावलीयाचे जाब घेणें ह्मणोन भास्कर दिनकर यांचे नांवें. सनद. १

इ० स० १७५०–५१
इहिदे खमसेन
मया व अलफ
रजब ४

रसानगी चिट्टी.

[ २१७ ] शेट्ये, महाजन व वाणी बाकाल व उदमी वगैरे व्यवसाई कसबे मुखर्डे परगणे पाटोर्दे सरकार संगमनेर सुबे खुजिस्ते बुनियाद यांस कौल दिला ऐसाजे कसबे मजकुरीं कादिम बाजार आहे, परंतु कित्येक कसाल्यामुळें बाजाराची वसाहत होऊन आमदानी होत नाहीं. याजकरितां साहेबीं कृपाळू होऊन कौल दिल्यानें बाजाराची आमदानी

इ० स० १७५०–५१
इहिदे खमसेन
मया व अलफ
रव्वाल १

---

(215) Medicines worth Rupees 1000 were purchased for Government from Mir. Abu Tálab of Surat.

A. D. 1760—61.

## Trade and Manufactures

### (a) Establishment of Peths and Markets.

(216) A sanad issued to Bhàskar Dinkar directing him to populate the suburb called Mátbar Pura, at Násik, and to manage the same with honesty and fidelity, remitting the revenue realized therefrom to Government, and obtaining receipt for the same.

A. D. 1750—51.

(217) A Kowl is granted to the Setya, Mahájan, Shopkeepers, and traders, and persons following other occupations, of Kasba Muskhed, in Pargana Pátode, of Sirkar Sangamner to the following effect. There is an old bazar at the village, but owing to various causes it is now less frequented than before, and less thriving. It is represented that if the Peshwa were pleased to grant a Kowl, the bazar would pros-

A. D. 1750—51

होईल व सरकाराचीही उगवणी होईल ह्मणून. त्यावरून बराये अर्ज खातरेस आणून तुह्मांवर कृपाळू होऊन व बाजाराचे आबादानीवर नजर देऊन येणेंप्रमाणें कौल सादर केला असे.

गांवचे कदिमकुळें हल्लीं वस्तीस आहे त्यास तीन वर्षे सालमजकुरापासून थळमोड व थळभरीत माफ केलें असे. घर देणें मात्र उदीम पाहून घेतलें जाईल.—कलम— १

नवें कूळ ज्या सालीं येईल त्या सालापासून थळमोड व थळभरीत पांच वर्षे पावेतों माफ केलें असे. व घर देणेंही ज्या सालीं कूळ येईल, त्या सालापासून तीन वर्षेपर्यंत माफ केलें असे.— १

येणेंप्रमाणें जुन्या कुळाचा व नव्या कुळाचा करार केला असे. तरी तुह्मी कोणे गोष्टीची शंका, अंदेशा न धरितां कसबे मजकूरचे बाजाराची वसाहत करून आबादानी करणें. सदरहू कराराप्रमाणें कौलाचीं सालें भरलीयावर शिरस्ते खमोजी थळमोड व थळभरीत व घर देणें होतें जाईल त्याची उगवणी करून वसवस न धरितां सुखरूप रहाणें. जाजती आजार लागणार नाहीं, अभय असे ह्मणून कौल लिहून दिला असे.—

[ २१८ ] वाणी, उदमी, बकाल वगैरे व्यवसायी यास कौल दिला असे जे, कसबे नाशिक, परगणे मजकूर, येथें मातबरपुरा सरकारचा आहे. त्यास कौल दिलीयानें आबादानी होईल ह्मणोन, त्यावरून पुरे मजकुरचे आबादानीवर नजर देऊन हें अभयपत्र सादर केलें असे. तरी तुह्मी पुरे मजकुरीं बाजार व आडदिवशीं जाऊन सुखरुप उदीम व्यवसाय करून आमदरफ्ती करणें. तुह्मापासून हांशील घ्यावयाचा शिरस्ता पेशजी काकाजी नाईक घेत होते

इ० स० १७५०-५१
इहिदे खमसेन
मया व अलफ
जिल्काद २०

---

per, and that Government would also realize some additional revenue. Having given a favourable consideration to the matter, Government is pleased, as an act of favor to you and for the prosperity of the bazar, to issue the following Kowl:—

1. The old residents now living in the village are exempted for 3 years from import and export duty. A house—tax assessed, with due regard to the calling of each house-owner, will alone be levied.

1. A new—comer will be exempted from import and export duties for 5 years, commencing from the year of his arrival. He will also be exempt from the house-tax for 3 years from the year of his arrival. The above terms are offered to the old and new residents. Be assured of this, and establish the bazar of the village, and make it prosperous. After the term specified in the kowl is over, export and import duties and house-tax will be levied as usual. Rest assured that no additional taxation will be imposed.

218 A Kowl granted to traders, shop-keepers and persons following other occupations. It has been represented that if a Kowl be granted in regard to the Mátbar suburb at Nasik, which belongs to Government, the suburb will prosper. In view of the prosperity of the suburb this guarantee is issued. You should, without fear,

A. D. 1750—51

त्याप्रमाणें घ्यावयास भास्कर दिनकर गुमस्ते पाठविले आहेत, हे त्याप्रमाणें घेतील. या खेरीज जाजती उपसर्ग लागणार नाहीं. स्वराज्य व मोंगलाई कडील कमाविसदार तुह्मास हांशीलाचा तगादा लावणार नाहींत. तरी तुह्मी आपली खातरजमा राखून पुऱ्याची आबादानी करणें ह्मणोन सनद १.

[ २१९ ] शेट व माहाजन व समस्त बेपारी पेठ कसबें धारवाड यांनीं हुजूर येऊन विनंति केली कीं, किल्ले मजकूरच्या पूर्वेकडे नवी पेठ वसवावयास आज्ञा करून कौल दिला पाहिजे ह्मणोन. त्यावरून पेठचे वसाहतीवर नजर देऊन तुह्मांस कौल सादर केला.

इ० स० १७५३–५४
आर्बा खमसेन
मया व अलफ
रबिलाखर २३

विरत शेटी रददु शेव्या–व शिवलिंगापा हुबली व आयाणा वहिली व बसव लिंगापा आगडी व कोकाणा अणगिरे वेकाणा व मलकाणा निरगार व मुदापा व समस्त उदमी व पटण शेट गुणारी यांस आज्ञा केली ऐशीजे.

तुह्मी बे वसवसा पेठेची वसाहत करून सुखरूप उदीम वेवसाव करीत जाणें. सात वर्षे माफीचा कौल तुह्मांस दिला असे. सात सालानंतर तुह्मांपासून महसूल सावनूरच्या शिरस्तेप्रमाणें घेतला जाईल ह्मणोन कलम १.

पेठेंत टांकसाळ होनाची व रुपायांची घालावयाची आज्ञा करावी ह्मणोन विनंति केली त्यावरोन विरत शेट यांस आज्ञा केली असे, ईश्वराचे व हनुमंताचें देवालय बांधणें. पेठ वसल्यावर कांहीं जमीन दिली जाईल. मृगपाशेटीचा गुरु यांचा मठ बांधावयास आज्ञा करावी ह्मणोन तुह्मी विनंति केली, त्यास रयतेनिसबत मठ बांधणें.

पेठेची पोतदारी बिष्टो नारायण यास सांगावी, पेठेच्या तगाईस पंचवीस हजार रुपये त्याजपासून घेऊन बसाहत करून दुसाला सावकारी ऐवज फेडून देऊं ह्मणोन विनंति केली. त्यावरून मशार निल्हेपासून सदरहू प्रमाणें ऐवज घेऊन पेठेची लावणी करून दुसाला ऐवज फेडून घेणें. मशारनिल्हेस पेठेची पोतदारी

carry on your trade and other business in the said suburb on Market days, as also on other days. Bháskar Dinkar Gumáste will collect from you the dues which Kákáji Naik used formerly to receive. No other levies will be imposed. The Kamávisdárs of the Swarájya and Monglai Amals will make no demands upon you. Be assured of this, and increase the prosperity of the suburb.

( 219 ) A new suburb was ordered to be established at Dharwar to the east of the fort, and permission was given to open mints for coining Hons, and also silver coins. Traders settling in the suburb were promised exemption from duty for 7 years, after which period duty was to be levied at the rate prevailing in Sáwanur. It was further ordered that the residents of the suburb might try all offences committed in the suburb, sending up to Government only such as they could not decide among themselves.

A. D. 1753—54

तरी पेठेंत टांकसाळ घालणें.

पेठेंत गोण्या येतील त्यांस एक वर्ष हांशील माफ केला असे. दुसऱ्या वर्षी सावनूरच्या शिरस्त्याप्रमाणें हांशील घेतला जाईल.

वीरत शेटीचे बैल सर पंचवीस सुदामत माफ आहेत, त्याप्रमाणें करार करावे ह्मणोन विनंति केली त्यास चहुपेठांच्या शिरस्त्या प्रमाणें केलें जाईल.

अब्दागीर व दिवटी व चलवादी यास निशाण करार केलें असे. वागवीत जाणें.

सांगितली आहे. याजपासून पोतेदारीचें कामकाज घेणें कलम १.

रहदारी उभा मार्ग येथील हाशील पेशजीच्या शिरस्तेप्रमाणें घेतला जाईल. कापड, हत्ती घोडे, उंटें, गुरें, जवाहीर पेठ मजकुरीं येईल, त्यास जकात सावनूरच्या शिरस्तेप्रमाणें घेतली जाईल. पेठेंत अन्यायी, अपराधी आला तरी गोत मिळोन विल्हे लावावे, गोतांत न लागे तरी सरकारांत आणून हजर करावा. सरकारांतून इन्साफ केला जाईल.

येणेंप्रमाणें आंकडा कलमें सदरहू प्रमाणें करार केलीं असत. सदरहू प्रमाणें वर्तणूक करून पेठेची वसाहत करून सुखरुप रहाणें ह्मणोन कौल लिहून दिला. १

इ० स० १७५४-५५
खमस खमसेन
मया व अलफ
मोहरम २०

[ २२० ] सखापा नष्टे वाणी यास आज्ञापत्र कीं, तुह्मी हुजूर कसबे पुणीयाचे मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, मौजे नायगांव, तर्फ साडस, प्रांत पुणें, हा गांव कैलासवासी रामचंद्र मल्हार याजकडे मुकासा आहे. त्यास तेथील नूतन पेठ व बाजार भरावयास कौल देऊन, शेटेपण आपणास देऊन आमचे नांवें पत्र करून दिलें आहे, तें साहेबीं मनास आणून त्याप्रमाणें सरकारचें पत्र आमचे नांवें करून दिलीया, मौजें मजकूर कुलडाल मेळवून वसाहत करून आपण शेटेपण करून सुखरुप राहूं ह्मणून; त्याजवरून बराये अर्ज खातरेस आणून तुह्मांस कैलासवासी रामचंद्र मल्हार यांनीं मौजें मजकूरचे पेठेचें शेटेपण करार करून दिलें आहे, त्याप्रमाणें हल्लीं सरकारांतून तुह्मांस शेटेपण करार करून दिलें असे. तरी मौजे मजकूरचे पेठेची वसाहत करून कुलडाल नवे आणून त्यांजवर शेटेपणाचा हक्क दस्तुर चार जागा पेठा सरकारच्या आहेत तेथें ज्याप्रमाणें सरकारचा शिरस्ता चालत असेल, त्याप्रमाणें तुह्मी घेऊन पेठेची वसाहत करून तुह्मी सुखरुप राहाणें. अभय असे ह्मणून आज्ञापत्र १.

अभय पत्र कीं, शेटे व महाजन व समस्त महानाड वेपारी उदमी पेठ सदाशिव मौजे नाईगांव, तर्फ साडस, प्रांत पुणें, यांशीं पत्र कीं, सदरील प्रमाणें पेठ भरावयाबद्दल कौल दिला पाहिजे ह्मणून राजश्री सदाशिव रामचंद्र यानीं विदित केलें, त्यावरून पेशजी कैलासवासी रामचंद्र मल्हार यांनीं कौल दिला आहे त्याप्रमाणें सरकारचा कौल सादर केला असे. तरी

---

( 220 ) Sakhappa Naste having offered to establish a new suburb at Náyagaon, in Tarf Sadus of Prant Poona, the Watan of Shettia of the suburb was conferred on him. The settlers in the suburb were promised exemption from taxation for 7 years.

A. D. 1754-55.

तुह्मी पेठेची बसाहत करून सुखरुप राहाणें. सात साला कौल दिला असे, तर सात सालें भरल्यावर सरकारच्या पेठा चार जागा आहेत तेथें शिरस्ता जो असेल त्याप्रमाणें हक्कदस्तूर चालविला जाईल; सात सालांत थळमोड व थळभरीत व खरेदी प्रोक्त होईल त्यास जकातीचा तगादा लागणार नाहीं, पेठेची वसाहत करून अबादानी करून राहाणें. जाजती आजार लागणार नाहीं. अभय असे ह्मणून पत्र १.

रसानगी यादी. २

इ० स० १७५९-६०
सितेन मया व अलफ
रमजान २८

[ २२१ ] जैसिंग वल्लद सुभा जाट, वस्ती शहर औरंगाबाद, यानें हुजूर येऊन अर्ज केला कीं, किल्ले अमदानगर व किल्ले देवगिरी येथें नवी पेठेची वस्ती करून बाजाराची अमदानी करवयास उमेदवार आहे. तरी साहेबीं वाजारचे अमदानीवर नजर देऊन पांच वर्षे निम्मे हांशील रयतेस माफ व बाजारचें चौधरीपणाचें नूतन वतन आपणास करून द्यावें ह्मणजे उमेदवारीनें रयत बेपारी आणून नवी पेठेची वस्ती करून बाजाराची अमदानी करीन ह्मणून; त्यावरून मनास आणून रयतेवर बाजारचे अमदानीवर नजर देऊन व तूं सरकार चाकरीस उमेदवार, तुझे सरकारांत अगत्य जाणोन तुजवर कृपाळू होऊन हरदु जागा नव्या पेठा वसवावयाची आज्ञा केली असे. तरी खुष रजावंदिनें रयत आणून आमदानी करणें. तेथील पांच वर्षे निम्मे हांशील रयतेस माफ केला असे. रयतेस पाळणें व दोन्ही बाजारचे चौधरीपणांचें नुतन वतन तुजला करार करून दिलें असे. तरी सरकार चाकरी एकनिष्ठेनें करून चौधरीपणांचें वतन अनभवून सुखरूप राहणें. पांच वर्षे जाहालीयावर सुदामत शिरस्तेप्रमाणें हांशील देत जाणें. ह्मणोन सनदा.

२ जेसिंग मजकूर याचे नावें
१ किल्ले अमदानगर येथील
१ किल्ले देवगिरी ऊर्फ दौलताबाद येथील खेरीज मुसलमान करून वस्ती करणें.

---

२

२ अमलदारांस कीं, नवा बाजार भरावयाशी जागा देऊन वस्ती करवणें. पांच वर्षे निम्मे हांशील माफ केला असे. निम्मे पांच वर्षे घेत जाणें पांच वर्षे जाहालीयावर शिरस्ते प्रमाणें हांशिल घेणें व जैसिंग मजकूर यास चौधरीपण

---

(221) Jaising walad Subha Jat of Aurangabad offered to establish new suburbs at the forts of Ahmednagar and Deogiri. His offer was accepted and the Chowdari wantan of the suburbs was conferred on him. The settlers in the suburbs were granted a partial exemption from taxation for five years.

A. D. 1759—60.

दिलें असे. तरी त्याजपासून सेवा घेऊन हरएक विषयीं गौर करणें ह्मणोन.

१ नारोबा बाजी यांस किल्ले अमदानगर याविशी.

१ उद्धव विरेश्वर यांस किल्ले देवगिरी याविशी.

———

२

———

४

२ चिटनिशी कौल अभयपत्रें.

१ किल्ले अमदानगर येथील.

१ किल्ले दौलताबाद येथील खेरीज मुसलमान वस्ती करणें.

———

२

———

६

# १४ व्यापार व कारखानें.

## ( ब ) देशांत येऊन राहणाऱ्या व्यापाऱ्यांस उत्तेजन.

[ २२२ ] विठोजी कृष्ण कामत व पुंडलिक कृष्ण कामत शेणवी साऊकार हे कबिले सुद्धां वसईस येऊन राहून पांच सिबाडा, दर सिबाड वीस मुडे बाराची, या प्रमाणें आणून बारमाही उदीम वेवसाय करणार, त्यास पांच सिबाडांचे दर खेपस येतां जातां जो जिन्नस आणितील त्यापैकीं दामाशाईप्रमाणें दाहा मडे बाराची जकात माफ केली असे. सदरहूप्रमाणें जकात यांजपासून न घेणें. पुंडलीक कृष्ण कामत वसईस काबले सुद्धां राहाण्यास येतांच पालखी सामान सुद्धां व वस्त्रें देणें, व यांस राहावयास जागा व वखारेस जागा पाहून देणें, मशारनिल्हे तेथें येऊन राहिल्यावर त्यास गांव खोती एक देणें ह्मणोन—शंकराजी केशव नामनाथ प्रांत वसई यांस सनद १.

इ० स० १७४३-४४
आर्बा आर्बैन
मया व अलफ
जिलकाद १७

## Trade and Manufacture.

### (b) Encouragement to trades settling in the country.

(222) Vithoji Krishna Kamat a Shenvi merchant having offered to come with 5 ships to settle in Bassein as a trader, a palanquin and clothes of honor were ordered to be given to him, on his coming to Bassein. A partial exemption from octroi was also granted to him.

A. D. 1743-44.

इ० स० १७५१-५२
इसन्ने खमसेन
मया व अलफ
जिल्हेज

[ २२३ ] या महिन्यांत तीन वाणीयांस वसई व साष्टी येथें दुकानें करण्यास आले, चांगले सावकार सबब त्यांस घरें दिलीं आहेत.जमिनी देण्याविषयीं हुकूम आहे व जकात निम्मे माफ केली आहे.

इ० स० १७५२-५३
सल्लास खमसेन
मया व अलफ
जमादिलाखर १७

[ २२४ ] श्रीपतराव बापूजी यांस सनद कीं, उमद दुतज्यार मुल्ला महमद फकरुदिन साऊकार सुरतकर हे शहर अमदाबाद येथें हरएक जागांहून माल आणतील व शहरांतून नेऊन सावकारी करतील; त्यास सरसाल माल आकारेल त्यापैकीं हे मातबर सावकार या करितां एक लाख रुपयांच्या मालाचा हांशील माफ केला असे. तरी शहरांत सरसाल आकार होईल त्यापैकीं एक लाख रुपयांच्या मालाचा हांशील शहरातील माफ करणें. बाकी सिरस्ते प्रमाणे हांशील देणें ह्मणून सनद १.

इ० स० १७५४-५५
खमस खमसेन
मया व अलफ
मोहरम ८

[ २२५ ] दयाळदास जीवा सावकार मुंबईकर यांनीं विदीत केलें कीं, आपण वसईच्या वगैरे बंदरीं उदीम व्यवसाय करणार, त्यास बंदर मजकुरीं सावकार आहेत त्यांस जकातीची सूट द्यावयाचा शिरस्ता आहे, त्याप्रमाणें आपल्यास सूट द्यावी ह्मणजे उदीम करीन; त्याजवरून तुह्मांस लिहिलें असे, तरी मशारनिल्हे बंदर मजकुरीं उदीम व्यवसाय करितील त्यास जकातीची सूट बंदर मजकुरीं सावकार आहे त्यास द्यावयाचा शिरस्ता असेल त्याप्रमाणें यांस सूट देणें ह्मणून सनद.

१ शंकराजी केशव प्रांत वसई.
१ रामाजी महादेव नामजाद साष्टी.
१ मोरो शंकर कमाविसदार परगणें जंबुसर.

---

३ रसानगी यादी.

---

A. D. 1751—52.

(223) Three Baniya merchants having come and opened shops at Bassien and Salsette, houses and lands were given to them, and half the Octroi duty ( Jakàt ) leviable from them was remitted.

A. D. 1752—53

(224) Umad Dutujar Mulla Mahomed, merchant of Surat, was granted an exemption from octroi on goods up to Rs. 100,000 in value, that he might bring to Ahmedabad.

A. D. 1754-55

( 225 ) Sanads to the officers of Prant Bassein, Salsette, and Pargana Jambusar—Dayaldas Jiwaji merchant of Bombay states that he intends to carry on trade at the port of Bassein and others, and requests that like other merchants at the said ports he may be allowed the usual remission of octroi. This letter is therefore issued. In case the said person carries on trade at the above ports, he may be allowed exemption from octroi to the extent granted to other merchants.

# १९ व्यापार व कारखानें.

## ( क ) जलमार्गाचा व्यापार.

[ २२६ ] शंकराजी केशव प्रांत वसई यांस पत्र कीं. जुबाद तुज्यार साल्या चालही याजबरोबर तुह्मी पत्र पाठविलें, तें पावलें, लिहिलें वृत्त सादंत विदीत जहालें. मशारनिल्हे हुजूर येऊन आपलें वर्तमान सविस्तर विदीत केलें व कौलपत्र जें हातें तें दाखविलें; त्यावरून हे मातबर घराणदाज सरकारामध्यें रुजू राहोन एकनिष्ठतेनें वर्ततात, याजकरितां यांचे मातबरीवर दृष्टी देऊन यांचे जहाज इलाई सालई समेत माल तुह्मांकडून देविलें असे. तरी याजपासून सरकारचा ऐवज रुपये ३००८० तीस हजार रुपयांची निशा करून घेऊन जहाज समेत माल सुतळीचा तोडा जरा बाजरा याचे हवालीं करून पावलीयाचे कबज घेणें, याचा माल कांहीं तरफका जाहला असेल तो यांचा यांस देणें. जाहाजाची मरामत करून देणें ह्मणोन—सनद १.

इ० स० १७५०–५१
इहिदे खमसेन
मया व अलफ
रजब २२

रसानगी देणें चिठ्ठी.

[ २२७ ] रामाजी महादेव नामजाद प्रांत साष्टी यांस सनद कीं, कृष्णाजी रघुनाथ गायतोंडे यांचें व वसईचे सावकारांचें गलबत जिन्नस भरून बंदर वेराईहून वसईस येत होतें त्यास मार्गी येतां शिरगांवचे खाडींत गलबताचे लोकांचो व चाचे यांचे लोकांची गांठ पडली; चाचे यांचे लोकांनीं गलबत जिन्नस सुद्धां हिरावून घेतलें. तें गलबत तुह्माकडील आरमारचे लोकांनीं सोडवून आणीलें तें तुह्मांजवळ जिन्नस सुद्धां आलें आहे ह्मणोन हुजूर

इ० स० १७५३–५४
अर्बा खमसेन
मया व अलफ
जिलकाद २८

---

## (c) Maritime Trade.

( 226 ) A letter addressed to Shankaraji Keshav at Prànt Bassein—Your letter regarding Jubád Toozar Salia Chalahi was received and the contents thereof were known. The said individual presented himself before the Peshwa and represented his case, showing some Kowl-Patrás (agreement papers) from which it appeared that he belonged to a respectable family and that he was loyal to Government. Having regard to his position, his vessel or ship with its merchandize is ordered to be restored to him. Security should be taken from him for Rs. 30,000 due to Government, and the Ship with its cargo, should, without reservation, be made over to him and a receipt for the same taken. Any deficiency in his cargo should be made good. The Ship should be repaired and delivered to him in good condition.

A. D. 1750-51

( 227 ) A Sanad to Ramaji Mahadev, officer of Prant Salsette. A ship belonging to Krishnaji Raghunath Gayatonde and the merchants of Bassein, and loaded with merchandize, was coming from fort Werai to Bassein. On the way, in the creek of Shirgaon, the ship was met by a party of pirates, who took it away. It was

A. D. 1753—54

विदित जाहलें. तरी सावकारांचें गलबत जिन्नस भरून उदीम करावयास वसईस येत होते ते मार्गी चाचे यांनीं धरिलें, त्यांजपासून तुह्माकडील आरमारचे लोकांनीं आणिलें व तुह्मांसही कळलें का, सावकाराचे गलबत. येविशीं राजश्री शंकराजी केशव यानींही तुह्मांस पत्र लिहिलें होतें कीं, सदरहू गलबत सावकारांचें व कृष्णाजी रघुनाथ यांचें आहे तें सोडून द्यावें; त्यास तुह्मीं हुजूर केला कीं हुजूरचें आज्ञापत्र आलें ह्मणजे गलबत सोडून देईन; त्याजवरून तुह्मांस सनद सादर केली असे. तरीं सदरहू गलबत सावकाराचें व कृष्णाजी रघुनाथ यांचें आहे कीं काय हें तहकीयात चौकशी करून यांचें गलबत असेल तरी जो जिन्नस तुह्माकडे आला असेल तो मशार निल्हेच्या हवाला करून पावलीयाचें कबज घेणें. गलबत सुद्धां देणें ह्मणोन सनद १.

[२२८] आपाजी गणेश कमाविसदार परगणें जंबूसर यांस सनद; इंग्रजांकडील गलबत समुद्रांतून वाऱ्याचा उपद्रव होऊन गेलें तें जंबूसरास लागलें. त्यास तुह्मी जप्ती केली ह्मणून विदित जाहलें. त्यास सदरहू गलबत इंग्रजाचे माघारें देवले असे, तरीं मालसुद्धां गलबत त्यांचें त्यांस माघारें देऊन पावली याचे कबज घेणें ह्मणून सनद १.

इ० स० १७५५-५६
सितखमसेन
मया व अलफ
सव्वाल ५

गलबत रिकामें माघारें देणें. माल काय आहे तो हुजूर लिहून पाठवणें ह्मणोन सनदेंत लिहिलें असे.

[२२९] आपाजी गणेश कमाविसदार परगणें जंबूसर यांचे नांवें ताकीदपत्र कीं खानजी बोहरी, कसबे इंदूर, परगणे मजकूर, प्रांत माळवा, याचा माल मुंबईहून खरेदी हाऊन येतां मार्गी जंबूसराचें बंदर टकारी येथें लागलें; बोहरी मजकूर याचे गुमास्तेयांनीं गलबतांतून माल बाहेर काढूं लागले तेव्हां तुमचे लोकांनीं माल बाहेर काढूं न दिला. माल समुद्राचे

इ० स० १७५५-५६
सितखमसेन
मया व अलफ
जमादिलाखर १

---

subsequently recovered by the fleet under your command, and is now together with the merchandize in your possession. This Sanad is therefore issued, and you are directed, after satisfying yourself that the ship belongs to Krishnaji Raghunath and other merchants above referred to, to restore it to them together with all the merchandize that you may have received, and to take receipt.

(228) A Sanad to Appàji Ganesh Kamàvisdar of Pargana Jambusar. Government is informed that a Ship belonging to the English drifted in a hurricane to Jambusar, and was thereupon attached by you. You are directed to restore it to the English with its cargo, a list of which should be sent to Government.

A. D. 1755–56

(229) An order to Appàji Ganesh Kamavisdàr of Pargana Jambusar. A Ship laden with merchandize belonging to Khànji Bohari of Kasba Indore in Pargana Indore, Prànt Málwa, and on its way from Bombay, drifted in the harbour of Takàri in

A. D. 1755—56

काठीं ठेविला. दुसरे दिवशीं समुद्रास भरते आले त्यामुळें गलबतांत पाणी शिरलें, माल खारेपाण्यानें भिजला, याजकरितां तुह्मी तो माल आटकाविला ह्मणून वर्तमान विदित झालें. ऐशास तुह्मी तो शिरस्त्या प्रमाणें माल आटकाविलात. परंतु बोहरी याचा माल ह्यावयाविशीं राजश्री मल्हारजी होळकर यांणीं रदबदली केली त्यावरून हें पत्र सादर केलें असें. तरी सरकारची रयत सबब माल देविला असे. देणें फिरोन बोभाट येऊं न देणें ह्मणून ताकीद पत्र १.

[ २३० ] शंकराजी केशव, प्रांत वसई, याचे नांवें रसानगी यादी,—मनचरजी खुरसदजी शेट पारशी सुरतकर याणें हुजूर विदित केलें कीं घोगेकर साहुकाराचे जाहाज वलदेजाऱ्या पेव्यांत जातें त्यास हल्लीं सरकारची वाजवी कौलावण घेऊन कौल दिला पाहिजे. त्याजवरून तुह्मास सनद सादर केली असे. तरी तुह्मी वसईस कौल देऊन वाजवी कौलावण घेत जाणें आणि कौल देणें. वरकड कांहीं उपद्रव न लावणें ह्मणून सनद १.

इ० स० १७५७–५८
सवान खमसेन
मया व अलफ
जमादिलाखर ३

मनचरजी खुरसदजी शेट पारशी सुरतकर याणें हुजूर विदित केलें कीं आपली एक गुराब रौनबक्ष वलंदेजाऱ्या पेव्यांत त्याचे निशाण घेऊन दर्यांत जातात. त्यास हल्लीं सरकारांतून कौल देऊन कौलावण माफ केली पाहिजे ह्मणून; त्याजवरून तुह्मांस सनद सादर केली असे. तरी मनचरजीचे गुराबेस तुह्मी वसईस कौल देणें, कौलावण माफ केली असे. एक गुराबेची घेत जाणें. ह्मणून मशारनिल्हेचे नावें सनद १. एकूण सनदा २.

---

Jambusar. The agents of the Bohari began to unload the boat, but your men did not allow them to do so. On the second day, waves rushed into the ship, and the goods were drenched with water. Government is informed that the goods were thereupon attached by you. You have acted in accordance with the usual practice, but Malharji Holkar has interceded on behalf of the Bohari for the restoration of his property, and this letter is therefore written. The Bohari is a subject of Government, and his goods are therefore permitted to be restored to him. You should give no occasion for further complaint in the matter.

( 230 ) Sanad to Shankarji Keshav of Prant Bassein :—
Mancharji Kharsedji Shet Parsee of Surat informs the Huzur, that a Ship belonging to a merchant of Ghoga has to pass to the Dutch settlement, and requests that a permit may be granted on payment of the usual fee. This Sanad is therefore issued. You should grant a permit on receipt of the usual fee. No additional levy should be exacted,

A. D. 1757—58

Mancherji Kharsedji Parsee of Surat states that a vessel belonging to him, called 'Raunbax', sails through the sea to the Dutch settlement, under the Dutch flag, and requests that a permit be given to him free of any charge. The request is granted &c.

[२३१] इंग्रेज मुंबईकर यांजकडील सावकारांची सिबाड वगैरे सरकारचे बंदरीं लागली ती माघारी देणें ह्मणोन सनदा.

इ० स० १७६० ६१
इहिदे सितेन
मया व अलफ
जिल्हेज २४

परगणे अमोद व देहजबरें निसबत माधवजी नानाशेट यांस पत्र कीं महमद सोफी सावकार बंदर मुंबई याणें सिबाड सबदर कुवरजी बरजोरजी मुंबईकर याची जोरी करून माल भरून जंबूसरास रवाना केली. तेथें बंदरांत जाऊन सलामत पोचली. तेथें बतेल्याची व सिबाडाची ठप जाहाली; बतेल्यावरील तांडेलानें सिबाडेचा नांगर कापिला; तेथन सिबाड जाऊन गधार पैजेची भाटी परगणे मजकूर येथें लागली; परंतु जाया न जाहाली व शिकस्त ही न जाहली; असें असतां माधवजी नानाशेट यानीं माल उपसून नेला त्यास मालसुद्धां सिबाड मावारी दिली पाहिजे ह्मणोन. त्यावरून सिबाड माघारी द्यावयाचा करार करून ही सनद तुह्मास सादर केली असे. तरी सावकार मजकूर याची सिबाड व माल उतरून घेतला असेल तो याजकडून भला माणूस येईल त्याचे पदरीं घालून कबजा घेणें ह्मणोन सनद १.

रसानगी यादी.

परगणे बलसाड निसबत महादाजी अनंत यांस सनद कीं, केसो भंडारी बंदर मुंबई याणें सुरतेचे बंदरीं कुंपनीचा माल तमाखू गाठडी एकशेएक वगैरे जिन्नस व रूपजी धनजी सावकार मुंबईकर याचें कापड गाठडी एक वगैरे होडी बनाम शिवप्रसाद याजवर भरून मुंबईस रवाना केली ती तुफानामुळें बलसाडचे बंदरीं लागली, त्यास

---

(231) Sanads directing the restoration of Ships belonging to merchants under the protection of the English of Bombay which had drifted to Government stations.

A. D. 1760—61

One Sanad to the Pargrna of Amod and Dehjabare under Madhavji Nana-Shet. Mahomed Sofi, merchant of Port Bombay, hired a ship belonging to Kuwerji Barjorji of Bombay, and sent it laden to Jambusar which it reached safely. While at Jambusar it came into collision with another ship. The commander of the 2nd ship cut off the anchor of the first ship which then floated to Gadhar &c. Though it had suffered no wreck, Mahadaji Nanashet removed the goods it contained. It is directed that the ship with goods should be made over to any respectable person deputed by the merchant in question to receive the same.

The other Sanad to Pargana Balsad under Mahadaji Anant. A boat belonging to Keso Bhandari of port Bombay and filled with 101 packages of Tobacoo &c. belonging to the Company and one package of cloth belonging to Rupji Dhanji, Merchant of Bombay, was sailing from Surat to Bombay; while at sea it was overtaken by a storm and was swept off into the port of Balsar. The Mamlatdar of that place thereupon removed the goods it contained. A request has been made to Government for the restoration of the boat and the goods. You are therefore directed to hand them over to any respectable person that may be deputed by the English for the purpose and to take a receipt from him.

तेथील मामलेदारांनीं माल उतरून घेतला आहे. तो होडीसुद्धां माघारा देविला पाहिजे ह्मणोन हुजूर विदीत जाहालें. त्यावरून सनद तुह्मांस सादर केली असे. तरी इंग्रजांकडील भला माणूस येईल त्यास होडी व त्यांतील माल तमाखू वगैरे जिन्नस तुह्मीं घेतला असेल, तो त्यांचे पदरीं घालून कबज घेणें ह्मणोन सनद १. एकूण सनदा २.

# १९ व्यापार व कारखाने.

## (ड) सरकारी दुकानें.

इ० स० १७४३-४४ आर्बा आर्बैन मया व अलफ जमादिलावल १७

[ २३२ ] सरकारचे दुकानचे सकलाद तागे व पटु तागे यांच्या गाड्या सुमारें ३ तीन जारूडा शहरास फरोक्त करावयाबद्दल जात असत. तरी मार्गी मुजाइम न होतां सुखरूप जाऊं देणें ह्मणोन दस्तक.

इ० स० १७६०-६१ इहिदे सितेन मया व अलफ सफर २९

[ २३३ ] शामराव आंबाजी प्रांत वाई यांस पत्र कीं, श्रीनिवास पंडित प्रतिनिधी यांजकडे सरकारचे दुकानचें कर्ज आहे, तें देत नाहींत; सरकारचा ऐवज तो उगवला पाहिजे; त्यास पंडित मशारनिल्हेकडे वांई प्रांताचे नऊ गांव आहेत त्या गांवांवर रोखे करून पाठविले असत. तरी त्यांजकडे कर्ज आहे त्या ऐवजीं वसूल घेऊन गोपाळ केशव यांजकडे देणें. ह्मणोन गांवांस पत्रें कीं, स्वराज्याचा अंमल श्रीनिवास पंडित प्रतिनिधी यांजकडे न देणें; शामराव आबाजी यांजकडे देणें ह्मणोन पत्रें ९. १ मौजें जांब. १ मौजें भाडलें. १ मौजें जळगांव. १ मौजें सेंदुरजन. १ मौजें हिवरें. १ मौजें किनई. १ मौजें पाटखळ. १ मौजें सोनगांव. १ मौजें चेचोली.

——
९

——
१०

याप्रमाणें दहा चिटणिसीं पत्रें दिलीं असत.

# XIV Trade & Manufactures

## ( d ) Government shops.

( 232 ) A. D. 1743—44. Cloth from the Government Shops was sent to the city (not named) for sale. Order was issued that it should not be obstructed on the road.

( 233 ) A. D 1760—61. A letter to Shamrao Ambaji of Prant Wai. Shriniwas Pandit Pratinidhi owes some money to the Government Shops, which he does not pay. The Pandit possesses 9 villages in Prant Wai Orders have been issued to these villages to withhold the payment of *swaraj amal* due to the Pratinidhi, and to pay it to you. You should receive the amount in repayment of the debt, and make it over to Gopal Keshav.

१ प्रत पोथी व वेष्टणें २ एकूण

१ द्वारकामहात्म पत्रें ८९

१ अर्बुदमहात्म पत्रें ४३

२ १३२

१ अग्नीपुराण पत्रें ३२२ एकूण वेष्टणें २ एकूण पुस्तक.

१ प्रत पोथी वेष्टणें २.

१ केदारखंड पत्रें ९९

१ ब्रह्मोत्तरखंड ५४

१ मार्गशीर्षमाहात्म पत्रें २५

१७४

१ प्रभासखंड पत्रें २१२ वेष्टणें २.

१ प्रत स्कंदपुराणांतर्गत वेष्टणें २.

१ सेतुमाहात्म पत्रें १२७

१ अवंत्यमाहात्म पत्रें १०७

२३४

१ ब्रह्मपुराण पत्रें ४९१ वेष्टणें सुमार २ एकूण.

१ कुमारिकाखंड पत्रें १६४ वेष्टणें २ एकूण.

३ पद्मपुराणांतर्गत वेष्टणें ६

१ प्रत पोथी सृष्टीखंड ६९४.

१ प्रत पोथी

१७५ गीतामहात्म्यपैकीं कोरीं पत्रें ९ बाकी एकूण.

२३ पातालमहात्म्य.

१९८

१ प्रत पोथी

१ भूमीखंड १४५

१ पातालखंड १६८

२ ३१३

३ प्रकरणें ५ पत्रें १२०५

१ भविष्योत्तरपुराण पत्रें सुमार २३८ वेष्टणें २ एकूण.

१ प्रत पोथी वेष्टणें २.

१ मार्कंडेयपुराण २०८.
१ पुरुषोत्तममहात्म्य १२२.

२ ३३०.

१ प्रत पोथी सुतसंहिता पत्रें १६६ व वेष्टणें २ एकूण.
१ नागरमहात्म्य पत्रें ३९४ व वेष्टण सुमारें २ एकूण.
१ प्रत पोथी वेष्टण १ एकूण.
१ लिंगपुराण पत्रें १७२.
१ सृष्टीखंडाचीं पत्रें मागाहून आलीं तीं पोथींत असत. २७

२ १९९

१ वायुपुराण पत्रें ३६० एकूण वेष्टण १ एकूण.
१ ब्रह्मावर्तखंड ४ येथें पत्रें सुमार ३९० एकूण वेष्टण १.
१ वामनपुराण पत्रें २६२ वेष्टण १.
१ मच्छपुराण पत्रें ९१९ एकूण व वेष्टण १ एकूण.
१ गरुडपुराण पत्रें २९७ वेष्टण सुमार १ एकूण.
१ वऱ्हाहपुराण पत्रें सुमारें ३९७ वेष्टण १ एकूण.
१ कूर्मपुराण पत्रें २४० वेष्टण १.

२३ प्रकरणें ३३ पत्रें ७७६९ वेष्टणें.
तपशील.
१९ छिटाचीं.
२३ इलाचे व मशरुचीं

३८

गांठोडीं ३ तीन यास वेष्टणास सनगें सुमार.
१ खादीचें जुनें बासन.
२ गजन्याचीं जोटीवजा बासनें.

३

सदरहू सदाशिव महादेव कमाविसदार परगणे देवल दिंमत मल्हारजी होळकर यांचे स्वाधीन कोनेर त्रिंबक यांचे गुजारतीनें केलीं असत. रसानगी रुबरू सदरहू लिहिल्याप्रमाणें पोथ्या ठेवल्या असत. खरगोणास पावत्या करूं ह्मणून मशारनिल्हेनें यादीवर लिहून दिलें असे.

[ ३२० ] शंकराजी केशव व धोंडो केशव व बाळाजी केशव व केसो महादेव, महादाजी केशव यांचे पुत्र गोत्र अत्री सूत्र आश्वलायन उपनाम फडके देशकुळकर्णी व गांवकुळकर्णी परगणे माहीम यांहीं हुजूर कसबे पुणें येथील मुक्कामीं येऊन विनंती केली कीं, आपण जंजिरेवसईचे मसलतीस श्रमसाहस बहुत केलें; याजकरितां पेशजीं स्वामीनीं नूतन वतन देशकुळकर्ण व गांवकुळकर्ण परगणे मजकूर येथील करून दिल्हें, ते समयीं मौजे दहिवलें परगणे मजकूर हा गांव दरोबस्त दिल्हा होता. त्यास तो गांव भुताला आपणास पाळत नाहीं. याजकरितां दुसरा गांव मुबदला इनाम देऊन इनामपत्र करून दिल्हें पाहिजे ह्मणून. त्यावरून मनास आणून तुह्मांवर कृपाळू होऊन मौजे मजकूर भुताला गांव तुह्मांस पाळेना हें जाणोन मौजे मजकूर सरकारांत ठेऊन मुबदला गांव मौजे नगावें परगणे मजकूर हा गांव तुह्मांस कुलबाब कुलकानू इनाम दरोबस्त दिल्हा असे. तरी तुह्मीं मौजे मजकूर आपले दुमाला करून घेऊन तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें इनाम अनभवून सुखरूप रहाणें ह्मणून मशारनिल्हेचे नांवें सनद १.

इ. स. १७४९–५०
**खमसेन मया व अलफ. सवाल १६**

[ ३२१ ] छ २७ सवाल रामचंद्र कृष्ण यांस पत्र कीं, दासोजी पवार याणें येथें येऊन सांगितलें कीं, पंढरपुराहून आलों. आपणास श्री विठोबानें पाठविलें कीं, काशीपंत धरणकरी यांस पंचवीस मोहरा तूं तेथें जाऊन घेऊन येणें. त्यावरून दासोजीबराबर मकाजी जगदळा व सतु वाडकर खिजमतगार देऊन पाठविला आहे. तुह्मांस स्वप्न पडलें तर पंचवीस मोहरा काशीपंतास नेमून देणें, मजुरा पडतील ह्मणोन सनद १.

इ. स. १७४९–५०.
**खमसेन मया व अलफ. रबिलाखर १५.**

[ ३२२ ] वेदमूर्ति राजश्री वीरेश्वर दीक्षित यज्ञ करितात. त्यांस च्यार सहस्र ब्राह्मणांचें साहित्य सामोग्री पुर्णाच्या पोळ्यांचें देखील साहित्य शिरस्तेप्रमाणें देविलें असे. देणें. याखेरीज फिरकोळ साहित्य पानपत्रावळ व यज्ञाचीं कुंडें व मंडप करून देणें ह्मणोन जिवाजी गणेश यांस सनद. रसानगी विसाजी कृष्ण जोग.

इ. स. १७४९–५०
**खमसेन मया व अलफ. जमादिलावल ८.**

---

320 Shankaraji Keshav Fadke and his brother having exerted himself during the invasion of Salsette, a village was granted to him in Inam. He subsequently represented that the village was inhabited by witches, and prayed that another village might be given to him in exchange. His request was complied with.

A. D. 1749-50.

321 Dasoji Powar came from Pandharpur and informed the Peshwa that he had been sent by the Deity Vithoba, to fetch 25 Mohars for Kashipant who was sitting *Dharna* at the door of the temple. The Peshwa sent the man with his attendants to Ramchandra Krishna, and directed him to pay 25 Mohars to Kashipant, if he ( Ramchandra ) happened to be inspired in a dream to that effect.

A. D. 1749-50.

322 Vireshwar Dixit being about to perform a religious sacrifice, orders were issued to supply him with provisions for feeding 400 Brahmins, and with other necessaries.

A. D. 1749-50.

[३२३] राघो गोविंद यांस सनद कीं, आप्पाजी चिमणाजी देहडाराय यजुर्वेदी ब्राह्मण वस्ती कसबे पुणतांबें उमर वर्षे २० यास कांहीं भ्रम होता यामुळें सातारीयास गेला. तेथें बनसीपुरीयाजकडील गोसावीयांजवळ गेला. त्यांणीं डोकें बोडून गोसावी केला. त्यास १९ दिवस झाले. उपरांतिक भ्रम गेला तेव्हां गोसावी याजवळ भांडों लागला. हरदुजण भांडत पुणें-याचे मुक्कामीं हुजूर येऊन वर्तमान विदित केलें. त्यावरून मनास आणितां गोसावी यांजकडे अन्याय लागला. त्याचें पारिपत्य केलें. त्यास आप्पाजी चिमणाजी हा वैशाखमासीं गोसावी जाहला. दिवस बहुत झाले नाहींत. याजकरितां याचे मतें ब्राह्मण व्हावें ऐसा चित्तास पश्चात्ताप झाला. त्यावरून पुण्याचे थोर शिष्ट ब्राह्मण यांस आपलें वर्तमान आपाजीनें सांगितलें. त्यावरून त्यांच्या मतें यास चांद्रायण प्रायश्चित्त द्यावें ऐसा सिद्धांत ब्राह्मणाचे मतें जाहला. त्याची याद साहित्याची आलाहिदा आहे. त्यावरून हें पत्र तुह्मांस सादर केलें आहे. तरी तुह्मीं पुणतांबें व टोकें व प्रवरासंगम या क्षेत्रांचे ब्राह्मणांचे विद्यमानें व पुणेंयांतील ब्राह्मणानें लिहून दिल्हें आहे त्याप्रमाणें सर्वांच्या मतें प्रायश्चित्त द्यावें ऐसा सिद्धांत झाला. तरी गंगातीरीं यास प्रायश्चित्त देऊन ब्राह्मण होय तें करणें. आपाजीस प्रायश्चित्तानिमित्य रुपये २०० दोनशेंपर्यंत तुह्मीं आपले विद्यमानें खर्च लावून उत्तम प्रकारें यांचें साहित्य करणें. दोनशें रुपयाशिवाय जास्ती खर्च लागला तरी याचा हा मिळवून देईल ह्मणून सनद १.

इ. स. १७५०-५१
इहिदे खमसेन
मया व अलफ.
साबान २१.

---

323 A Sanad issued to Ragho Govind,—Appaji Chimnaji, Dehadraye Yajurvedi Brahmin, inhabitant of Kasba Puntambe aged 20 years became insane and went to Satara. There he went to a Gosavi (ascetic) of the Bansipuri clan, who shaved him and made him a Gosavi. After a fortnight, the fit of insanity having passed away, he began to quarrel with the Gosavi. Both of them came to Poona, and represented to the Huzur what had occurred, on enquiry it was found that the Gosavi was to blame and he was accordingly punished. Appaji Chimnaji became Gosavi in the month of Vaishakh. He has since repented and wishes to be a Brahmin again. He related his story to the respectable Brahmins of Poona, who gave it as their opinion that he could be admitted into the caste on the performance of a 'Chandrayan' (penance). A list of materials required for the penance has been prepared. You are therefore requested to have the penance cerimony performed on the banks of the Godavari in the presence of the Brahmins of the sacred places of Puntambe, Toke and Pravarasangam, in accordance with the opinion of the Brahmins of Poona, and to do everything necessary to make the said Appaji a Brahmin. You are authorized to spend a sum upto Rs. 200 (two hundred) on occount of the penance which should be performed in your presence. If more money be required the said Appaji will collect the same for himself—Sanad 1.

A. D. 1750-51.

Government orders communicated through Nago Ram.

इ. स. १७५१–५२. इसन्ने खमसेन मया व अलफ. साबान १.

[ ३२४ ] समस्त हाटगर यांचे नांवें आज्ञापत्र कीं, सोमया जंगम मठ साखरखेडले यांणीं हुजूर विदित केलें कीं, हाटगर आपले शिष्य, लिंगधारण आह्मीं करावें ऐसें असतां, पांच सात जणांनींहीं लबाडी करून जानवीं घातलीं व लिंगधारण तेच आपले आपल्यांत करूं लागले, ह्मणून श्रीहरिमंदिरीं यांची आमची पंचाईत झाली. ब्राह्मणाचे साक्षीनें हाटगर खोटे झाले. जानवीं काढविलीं. याजउपरी लिंगें धारण आह्मांपासून करून घ्यावें ऐसें ठरविलें आहे. पूर्ववत्प्रमाणें त्यांणीं आमचें शिष्यत्व करावें ऐसें निवाडपत्र झालें आहे. तें मनास आणून त्याजप्रमाणें ताकीद केली पाहिजे ह्मणून. त्याजवरून तुह्मांस आज्ञापत्र सादर केलें असे. तरी पूर्ववत्प्रमाणें निवाडपत्र जाहलें आहे त्याबरहुकूम तुम्ही वर्तत जाणें. जानवीं न घालणें. आपल्या आपल्यांत लिंगधारण न करणें. लबाडी कराल तरी मुलाहिजा होणार नाहीं ह्मणून पत्र.

येविशीं साहित्यपत्र संभाजी आठोळे धुरंधर समशेरबहादर यास.

सदर्हुप्रमाणें दोन पत्रें देऊन सोमया जंगम याजकडे नजर करार केली. रसानगी चिठ्ठी रुपये १००. सदर्हू एकशें रुपये माहादशेट वीरकर यांणीं तूर्त द्यावे याप्रमाणें करार.

इ. स. १७५१–५२ इसने खमसेन मया व अलफ. रबिलावल २९

[ ३२५ ] प्रांत कल्याण भिवंडी निसबत चिरंजीव राजेश्री सदाशिव चिमणाजी यास सनद कीं, कल्याणप्रांतीं भूमीकंप जाहला. त्याचे शांतीस थोर शिष्ट ब्राम्हण मेळऊन शांत करणें म्हणोन सनद १.

---

A. D. 1751-52.

324 An order issued to all the Hatgars to the following effect. Somaya Jangam of the Sakhar-Khedle Math, has represented to the Huzur, that the Hatgars are his disciples, that they are to wear the Linga under his direction, that notwithstanding, 5 or 7 members of the community put on the Janwa thread, that others performed the ceremony of wearing the Linga by themselves, that therefore a Panchayat was held in the temple of Shri Hari, that in the presence of Brahmins, the Hatgars were proved to be in the wrong, that the Janwa threads worn by them, were then removed, and it was decided that they should wear the Linga under the Jangam's direction, and that a deed was drawn up directing them to act as the disciples of Jangam. The Jangam has requested that orders in conformity with the deed may be issued by Governmevt. This order is therefore issued. You should act in accordance with the deed of decision already drawn up. You should not wear Janwas, nor should you wear the Linga except under the direction of the Jangam. If you disobey, severe notice will be taken of your conduct.

A letter to Santaji Atole Dhurandher, Shamsher Bahadur, asking him to assist in carrying out the above order.

The above two letters are issued. A Nazar of Rs. 100 is ordered to be levied from Somaya Jangam.

A. D. 1751-52.

325 A Sanad to Sadashiv Chimnaji of Prant Kalyan Bhiwandy:–There has been an earthquake in Prant Kalyan. You should collect pious Brahmins, and have the necessary ceremony performed to appease the diety.

[ ३२६ ] राजश्री येवजी लोहट हवालदार व कारकून किल्ले विसापुर यास सनद किल्ल्यावर दुखणेयाची साथी येऊन शें सव्वाशें माणूस दुखणाईत पडले; पंचवीस माणूस मेले; उपाय केला परंतु गुण येत नाहीं. सर्वांचे मतें अद्भुत शांत करावी येविशीं आज्ञा असावी ह्मणोन लिहिलें, तरी अद्भुत शांत करणें. कलम १.

इ. स. १७५३-५४ अर्बा खमसेन मया व अलफ. सवाल २८.

[ ३२७ ] चिरंजीव निळकंठ महादेव यांस अनुष्ठानाचे ब्राह्मणांस साहित्य प्रांत पुणेपैकीं देणें ह्मणोन सनदा.

इ. स. १७५३-५४ अर्बा खमसेन मया व अलफ. मोहरम १०.

श्रीमोरेश्वर येथें, श्रीसोमयादेव येथें, श्री सिद्धेश्वर परगणा पारनेर, श्री बल्लाळेश्वर तर्फ पाल हवेली, श्री यवतेश्वर सातारा, श्री जेजुरी येथें, श्रीदेव नारायण किल्ले पुरंदर येथें, श्रीबनेश्वर येथें. श्री भगवती वेहर, श्री गणपती रांजणगांव तेरीज आसामी ४० साहित्य.

१ श्रीदेव.
५ अनुष्ठानाचे ब्राह्मण.
१ आचारी.
१ खटपट्या.

---

८

आठ आसामींस साहित्य.

[ ३२८ ] राजश्री शंकराजी केशव प्रांत वसई यांस सनद कीं, तर्फ आगाशी प्रांत मजकूर येथील रयती व पाटील हुजूर येऊन आपले वेठबेगारीचा वगैरे कलमाचा अर्ज केला. तो मनास आणून येणेंप्रमाणें करार करून दिल्हा असेः— कलम तर्फमजकुरीं सामवेदी ब्राह्मणाचीं घरें आहेत त्यास घरपट्टी घेतात. स्वामींचें धर्मराज्य, कोठें ब्राह्मणास घरपट्टी घेत नाहीं. तरी कृपाळू होऊन

इ. स. १७५३-५४ अर्बा खमसेन मया व अलफ. मोहरम २८.

---

A. D. 1753-54. 326. There being much sickness at the fort, permission was given to perform a kind of sacrifice to appease the deity.

327. Brahmins were deputed to perform certain religious rites to propitiate the following deities :—

A. D. 1753-54.

1. Shri Moreshwar
1. Shri Somayadeo,
1. Shri Shiddeshwar, Pargana Parner
1. Shri Balaleshwar Taraf Pal Haveli
1 Shri Yeoteshwar of Satara.
1. Shri Jejuri
1. Shri Deo Narayen fort Purandhar
1. Shri Baneshwar
1. Shri Bhagwati of Wehar.
1. Shri Ganapati Ranjangaon

328. There were families of Samvedi Brahmins in Taraf Agashi in Prant Bassein. These Brahmins were directed to perform the daily ablutions, the daily prayers, and the other observances enjoined by the Brahmin religion. Orders were issued to punish

A. D. 1753-54.

घरपट्टी माफ करावी ह्मणून विनंती केली. त्यावरून या सामवेदी ब्राह्मणांनीं स्नानसंध्या करून ब्राह्मणधर्माचे रीतीप्रमाणें आचरण करावें. न करील त्यास शासन करावें. याप्रमाणें करार करून घरपट्टी माफ केली असे. तरी तगादा न करणें कलम १.

सामवेदी ब्राम्हणांत जे भिक्षुक ब्राम्हण आहेत, त्यांस घरपट्टी पाळ (माफ) आहे. वेठ मात्र पडते. ती माफ करावी म्हणोन विनंती केली. यावरून सामवेदी ब्राम्हणांत जितके उपाध्यपण चालवीत असतील आणि ब्राम्हणकर्म करून आचरण करीत असतील, त्यांचीं पन्नास पाऊणशें घरें असतील त्यांस पंधरवडा सुद्धां वेठ दरोबस्त माफ केली असे. तर तगादा न करणें कलम १.

इ. स. १७५४-५५.
**खमस खमसेन मया व अलफ. सफर ४.**

[३२९] राजश्री आपाजी बाबूराव राजउपाध्ये यांणीं विदित केलें कीं, पुणेंप्रांतीचें गांवची पाटिलकी राजश्री छत्रपती स्वामी यांची आहे. त्यास तेथील गुमास्तगिरी राजश्री बाबूराव आपाजी यांजकडे होती. त्यास त्यांणीं सालमजकुरीं श्री गंगेंत जलसमाध घेतली. सबब त्यांचे पुत्र यांजकडे गांवची मोकदमीची गुमास्तगिरी करार केली असे. तरी तुम्ही मशारनिल्हेशीं रुजू होऊन मौजे मजकूरचा निमे मोकदमीचा हकदम मानपान कुल जें असेल त्याचा वसूल सुरळीत देणें म्हणून पत्रें गांवांस.

१ मौजे वडगांव तर्फ पाटस येथील निमे मोकदमीविशीं सनद.
१ मौजे देऊळगांव तर्फ पाटस दरोबस्त पाटिलकीविशीं सनद.
१ मौजे सिदापुर तर्फ पाटस प्रांत पुणें येथील निमे मोकदमीविशीं सनद.

---

३

[३३०] नारो बाबाजी नामजाद परगणे नेवासें वगैरे महाल यांस पत्र कीं, राजश्री

इ. स. १७५४-५५.
**खमस खमसेन मया व अलफ. साबान १७.**

सटवोजी जाधवराव यांजकडील चौकीदार मौजे सेदणापूर परगणे हरसुल यांणीं त्रिंबकच्या यात्रेपासून हसील घेतला ह्मणून हुजूर विदित जाहालें. त्याजवरून सेदणापुरच्या चौकीची जप्ती करावयास तुह्मांस आज्ञा केली असतां मशारनिल्हेच्या तमाम चौक्या जप्त केल्या ह्मणून हुजूर विदित जाहलें. ऐशास

---

those who failed to do so. Those who complied with the above direction were exempted from house tax and liability to forced labour.

A. D. 1754-55. 329. The father of Appaji Baburao Raj-Upadhye became an ascetic, and immolated himself by drowning in Godavari at Pratisthan.

330. The chaukidar of Said-Napur in Pargana Harsul in the employ of Satwaji Jadhavrao levied a tax from pilgrims going to Trimbak.

A. D. 1754-55. The chauki was therefore attached. Satwaji Jadhavrao having agreed to send the Chaukidar to the Huzur, the attachment was ordered to be removed.

एक चौकी जप्त करविली असतां, अवघ्याच जप्त करावयास प्रयोजन काय? सेदण्याचे चौकीदार हुजूर आणून द्यावयाचा करार सुभानजी जाधव यांणीं केला आहे. याजकरितां चौकीयांची मोकळी केली असे; तरी तुह्मी जप्ती मोकळी करणें. चौकीदार धरून आणले असतील ते सोडून देणें. चौक्यांचा ऐवज तुह्मीं घेतला तो शिवाय देणें. फिरोन देणें. सेदणाएरचा चौकीदार हुजूर आल्यावर येविशीं मनास आणून आज्ञा करणें ते केली जाईल ह्मणून सनद १.

इ. स. १७६५–६६
**सीत खमसेन मया व अलफ. जिल्हेज १४.**

[ ३३१ ] वेदमूर्ति राजश्री शंकरभट सुरकर उपनांव लोकाक्षी हे मौजे सावखेडें येथें गंगातीरीं यज्ञ करणार, त्यांस यज्ञाचें साहित्य तुह्मांकडे येणेंप्रमाणें बीतपसील:—नक्त रुपये ६०० गाई सवत्स खरेदी करून देणें. गाई ७ सर २ वृषभ ५ पशु यज्ञास. सामोग्री मध्यम. प्रती, शाकभाजीसुद्धां दोन हजार असामींची देणें. किता जिन्नस खरेदी करून देणें. येणेंप्रमाणे

येणेंप्रमाणें नक्त रुपये साहाशें व सामोग्री दोन हजाराची मध्यम प्रती व चौदा जिन्नस खरेदी करून देणें व यज्ञाचें मंडपसाहित्य, पानपत्रावळ, लांकूडफाटे, व वैरण व कुंभारकाम, सुतारकाम व बुरुडकाम, दर्भ समिधा व गंवडीकाम व बिगारी वगैरे किरकोळ उपसाहित्य तुह्मीं खासा जाऊन करणें, अगर शाहाणा कारकून पाठवून यज्ञास कोणे गोष्टीचें कमी न होय ती गोष्ट करणें. याखेरीज सोमवेलीचे गाडे दोन देणें ह्मणोन राजश्री नारो बाबाजी नामजाद परगणे नेवासें वगैरे महाल यांस सनद १.

[ ३३२ ] विष्णु महादेव यांचे नांवें पत्र कीं, तुह्मी उदेपुरीहून पुस्तकें खरेदी करून पाठविलीं, ते गुजारत भिकाजी आप्पाजी पुस्तकें ग्रंथ सुमारः—

इ. स. १७५५-५६.
**सीत खमसेन मया व अलफ. रमजान २४.**

१ वराहपुराण १४०००,१ रेवाखंड १५०००,१ वामनपुराण १००००, १ मच्छपुराण १५००००,१ ब्रहन्नारदी ४५००,१ लिंगपुराण १२०००, १ विष्णुपुराण १७०००, १ भविष्योत्तरपुराण १२०००,१ मिताक्षरा १४०००,१ रामायण वाल्मिकी २८०००,१ अग्नीपुराण १२०००,१ ब्रह्मवैवर्तक २२०००,१ दुर्गापुराण ८०००,१ काशीखंड २९०००१, शुश्रूतवैदिकी पत्रें.

येणेंप्रमाणें १५ पुस्तकें एकूण ग्रंथ दोन लक्ष साडेबारा हजार सरकारांत पावला ह्मणोन जाब लिहून दिल्हा. रसानगी जयराम चोपदार नांवें १.

---

A. D. 1755-56.

331. Shankerbhat Lokakshi wished to perform a sacrifice at Savkhede on the banks of the Godavari. Orders were issued to give him Rs. 600 in cash, provision for feeding 2000 men, 7 cows with calves, 2 bullocks, 5 animals for sacrifice, and 2 cartfulls of the Soma plant.

A. D. 1755-56.

332. This gives a list of books brought from Udepur. These were purchased there by Vishnu Mahadeo for the Peishwa.

[३३३] समस्त सुतार सरकार जुन्नर व सरकार संगमनेर व सरकार बागलाण व दौलताबाद सुरू सन सीत खमसेन मया व अलफ यांस पत्र कीं, खंडोजी बाणराव सुतार मौजे रेडगांव व सिरवडें परगणे चांदवड याणें हुजूर येऊन विदित केलें कीं, आपल्या दोघी बायका लग्नाच्या आहेत. त्यांचे पोटीं संतान नव्हतें. त्यास तिसरी बायको जातीची सुतारीण, तिशीं शास्त्रविवाह करून केली आहे. तिचे पोटीं पुत्र जाहला आहे. त्याचें नांव हैबती. त्याची गोत पतकरून जातींत घ्यावयाची गोतास आज्ञा दिल्ही पाहिजे ह्मणोन, त्याजवरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तुह्मीं समस्त गोत मिळोन हैबती मजकुराची गोत पतकरून जातींत घेणें ह्मणोन पत्र १.

इ. स. १७५५–५६.
**सीत खमसेन मया व अलफ. रबिलाखर ६.**

येणेंप्रमाणें पत्र देऊन खंडोजी बाणराव याजकडे सरकारची नजर करार केली. बरहुकूम करारी यादी रुपये १००१ एक हजार एक रुपया करार केला असे. तूर्त घ्यावे ऐसा करार.

[३३४] मल्हारजी मोगल बकाल वस्ती मौजे नांदेड तर्फ कर्यात मावळ याणें हुजूर विदित केलें कीं, आपला धाकटा भाऊ रामजी मोगल वस्ती कसबे पुणें येथें आहे. त्यास पुत्र नाहीं, पंगुल आहे. याजकरितां आपला पुत्र पंधरा वर्षांचा आहे तो घेऊन दत्तविध करून रामजी मजकूर श्रीयात्रेस जाणार. तरी येविषयींचें अभय झालें पाहिजे. त्यावरून हें अभयपत्र सादर केलें असे. तरी तुझा पुत्र खुषरजावंदीनें घेतो तर देणें. वसवस न धरणें म्हणोन अभयपत्र १.

इ. स. १७६०–६१
**इहिदे सितेन मया व अलफ. जिल्काद ३.**

रामजी मोगल याचे नांवें अभयपत्र कीं, मल्हारजीचा लेक खुषरजावंदीनें घेऊन दत्तविधान करून लेंकराचे लेंकरी नांदोन सुखरूप राहाणें. १.

[३३५] हैबतराव माणकेश्वर यांणीं हुजूर विदित केलें कीं, काजी माणिकशाहा बिन राजाशा काजी परगणे खटाव याचा इनाम कसबे मजकूरीं आहे. त्यास राजश्री कृष्णाजी त्रिंबक यांणीं इनामाची जप्ती करून इनामतिजाई व दर बिघा रुपयाचा तगादा केला आहे. त्यास काजीमजकूर थोरले श्रीमंतांचे स्वारीबरोबर आहे. घरीं त्याचा कबिला आहे, त्यास सदरहूचा

इ.स. १७६०–६१
**इहिदे सितेन मया व अलफ. सवाल ९.**

---

333. A letter to all the carpenters in Sirkar Junnar, Sirkar Sangamner Sirkar Baglan, and Daulatabad. Khandoji Banrao carpenter, of Redgaon and Sirwade in Pargana Chandwad has informed the Huzur that his two wives being childless, he married a third woman, a carpenter by caste, by the marriage ceremony known as 'Shastra Viwaha' (शास्त्रविवाह), and that this woman has given birth to a son named Haibati, and requests that orders may be issued to the caste men to purify. Haibati and to admit him into the caste. This order is therefore issued. All of you should assemble, and after purifying Haibati, should admit him into the caste.

A. D. 1755-56.

(The Nazar ordered to be levied from Khandoji Banrao was Rs. 1001.)

A. D. 1760-61. 334. Malharji Mogal, a trader was permitted to give his son in adoption to his brother,

A. D. 1760-61. 335. The Peshwa is referred to on this date, in a sanad given by Raghunathrao Dada, his younger brother, as तीर्थरूप.

तगादा कारितात. तरी थोरले श्रीमंताची स्वारी पुण्यास येई तोंवर काजी मजकूराचे कबिल्यास तगादा न होय तें करावें म्हणोन, त्याजवरून हें पत्र तुम्हांस लिहिलें असे. तरी तीर्थरूप पुण्यास येत तोंपावेतों सदरहू इनामतिजाईचा व दरबिघा रुपयाचा तगादा तूर्त काजी मजकूराचे घरीं न करणें. पुण्यास तीर्थरूप आल्यावर तगादा करणें म्हणोन कृष्णाजी त्रिंबक यास चिटणीसी पत्र १.

## २१ शहर पुणें व पेठा.

इ. स. १७२९-३०
सलासीन
मया व अलफ.
रजब १.

[३३६] १ घर बांधावयास मुहूर्त केला त्यास दक्षणा विद्यमान विसाजीपंत.

।· कित्ता घरास मुहूर्त केला. त्यास दक्षणा गुजारत येसू तडा, दक्षणा देव व पीर.

।· दक्षणा स्नानासमयीं तसलमात विसाजीराम.

इ. स. १७३१-३२
इसन्ने सलासीन
मया व अलफ.
साबान ५.

[३३७] कारकून खासगत रुपये. १९॥ वास्तुशांति.

२॥। शेले २ गुजारत थोराजी.
१ दक्षणा तसलमात वामनभट कर्वे.
११॥। पुण्याहवाचन समयीं.
२ नांदीश्राद्ध.
१ गणपतीपूजन.
१ मातृकापूजन.
७॥। भूयसी.

---

११॥।

---

१९॥

---

## XXI Poona and its suburbs.

A. D. 1729-30.

336. Foundation was laid of a house (apparently Shanwar palace) offerings were made to Hindu and Mahomedan deities.

A. D. 1731 32.

337. Religious ceremonies were performed to celebrate the completion of a house (apparently Shanwar palace.)

[३३८] नारो मल्हार व मोरो नरहर मेंडजोगी कुळकर्णी पेठ मलकापूर ऊर्फ आदितवार कसबे पुणें प्रांतमजकूर यांस सनद कीं, तुह्मीं हुजूर पुण्याचे मुक्कामीं येऊन विनंती केली कीं, पेठमजकुरचें कुळकर्ण आपलें आहे. त्यास पेठ मजकूर राजक्रांतीमुळें बहुत दिवस उद्वस्त होती. सांप्रत स्वामींचा कौल मुलकास जाहला त्यामुळें पेठेची वसाहत जाहाली. आमचें कुळकर्णाचें कामकाज आहे तें करीतच आहों. ऐसीयासी कुटुंबाचा योगक्षेम चालला पाहिजे. त्यास पूर्वीच्या दाखल्याप्रमाणें हक्काची वाट करून ध्यावी, तर वतनाचे कागदपत्र होते तेही राजक्रांतीमुळें गेले. याजकरितां देशमुख व देशपांडे व शेटे महाजन कसबेमजकूर यांसी बोलावून आणून तहकिकात करून हक्क करार करून द्यावयाची आज्ञा केली पाहिजे ह्मणून. त्याजवरून देशमुख व देशपांडे व शेट महाजन कसबे मजकूर यांसी बोलावून आणून तहकिकात करून पेठ मजकुरीं तुह्मांस कुळकर्णाचा हक्क रयतनिसबत सालीना रुपये ६० साठ रुपये करार करून दिल्हे आहेत. तरी सदरहूप्रमाणें घेऊन पेठमजकुरीं कुळकर्णाची वृत्ती वंशपरंपरेनें करून सुखरूप राहणें ह्मणोन पत्रें. १ शेटे महाजन यांस. १ मोरो मल्हार व मोरो नरहर.

इ. स. १७४०–४१
इहिदे आर्बैन
मया व अलफ.
रमजान ६

[३३९] चिंतो गणेश व कृष्णाजी गणेश व अंताजी गणेश देशपांडे प्रांत पुणें यांचा वतनी वाडा कसबे मजकूरीं पुरातन पांचजण भावांचा आहे. त्यांत आपली वाटणी एक तक्षीम आहे. तें आपल्यास राहावयास पुरत नाहीं. दुसरा वाडा दिल्हा पाहिजे ह्मणोन विनंती केली. त्यावरून कसबे मजकुरीची पहिली जुनी पांढर कुसाबाहेर बहुत दिवस राहिली होती, त्याजवर कुसुं घालून पांढर गांवांत घेऊन लोकांस वाडे दिल्हे, तेसमयीं तुह्मांस बेवारसी जागा नेमून वाडा दिल्हा असे. लांबी उत्तरदक्षिण हात ७५ रुंदी पूर्वपश्चिम हात ५५ पंचावन, याची चतु:सीमा:—
पूर्वेकडे निम्मे वाडियाबरोबर. दक्षिणेकडे गल्ली तिकडे तुमच्या वाडीयाची पर-

इ. स. १७४४–४५.
खमसे आर्बैन
मया व अलफ.
जिल्काद २४.

---

338. Peth Malkapur, otherwise called Aditwar in Poona had long been remained desolate under the former Governments. It was populated during the Peshwa's administration. The right of Naro Malhar and Naro Narhar to officiate as Kulkarni of the suburb was recognized, and they were permitted to receive Rs. 60 as their remuneration from the ryots.

A. D. 1740-41.

339. The house of the Deshpandes of Prant Poona, which was devided among 5 brothers, was found by them to be insufficient and they asked that a new building might be given to them. A strip of land in the village site was lying vacant outside the city fortifications. This site was built upon and included within the fortifications, and was given out to people for building purposes. A portion of it was given to the Deshpande family in question.

A. D. 1741-42.

उत्तर भागीं शिवरामभट शालग्राम यांस नवा वाडा दिल्हा असे. त्याच्या पाठीमागें जागा राहिला तो कोसाचा त्यामुळें बखळ राहिली असे १

सांतील खिडकी १.

उत्तरेकडे तुमच्या वाडीयाचा दरवाजा पुढें गल्ली, पश्चिमेकडे गोविंदराव शितोळे देशमुख प्रांत मजकूर यास नवा वाडा दिल्हा असे.

येणेंप्रमाणें चतु:सीमापूर्वक वतनीवाडा दिल्हा आहे. तेथें तुह्मीं व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें नांदोन सुखरूप राहणें ह्मणून वतनपत्र दिल्हें. १

[ ३४० ] रामाजी नाईक व बाळाजी नाईक भिडे पोतदार यांचे नांवें सनद कीं, पेठ बुधवार कसबे पुणें येथील कौल पुरला, सालमजकूरीं महसूल व हासील ध्यावयासी तुह्मांस आज्ञा केली. त्यावरून तुह्मीं विनंती केली कीं, जीवनमाफक मक्ता करार करून घ्यावा, त्याप्रमाणें उगवणी करून देऊं, ह्मणोन. त्यावरून मनास आणून मोहतर्फा व ठाण व घरपट्टी व जकाती थलमोड थलभरीत व फुरोई देखील कलाल व गोली व बेलदार व लोणारी व चुनेवाले व छपरबंद लाकडवाले व लोहार वगैरे खुम तुह्मांला मक्ता करार केले. इस्तकबील अवल साल तागाईत आखेर साल रुपये २५००

इ. स. १७४४–४५.
**खमस आर्बैन मया व अलफ.**
**जिलकाद १५.**

तपशील. ६०० तूर्त रसद. १९०० दरमाहे शुद्ध प्रतिपदा; (४०० पौष शुद्ध प्रतिपदा; ३०० माघ शुद्ध १; ३०० फाल्गुन शुद्ध १; ३०० चैत्र शुद्ध १; ३०० वैशाख शुद्ध १; ३०० जेष्ठ शुद्ध १;)

एकूण २५००

येणेंप्रमाणें करार केले असे. सरकारांत ऐवज पावता करून कबजे घेणें. भिक्षुक ब्राह्मण व सरकारचा चाकर फक्त असेल, उदीम वेवसाव करीत नसेल, त्यास पाळावें. फुरोई कुळांकडे पंचवीस रुपयेपावेतों आकार होईल तो तुह्मीं घेणें. जास्ती आकार होईल तो सरकारांत घेतला जाईल. याप्रमाणें करार असे. कुळांचा सरकारांत वसूल आला असेल तो अखेर हिसे यांत मजुरा दिला जाईल ह्मणोन सनद.

---

340. The kowl granted to the Budhwar suburb having run out, the following taxes leviable from suburb were farmed out to Ramaji Naik and Balaji Naik Bhide for Rs. 2,500.

A. D. 1744-45.

1 Mohotarfa—tax on profession.
1 Wan—Pasturage fee.
1 House tax.
1 Octri on goods imported and exported.
1 Fines.
1 Taxes on liquor manufactures, milk-man, stone-cutters, charcoal-makers, chunam-makers, Matchers, Wood-sellers, blacksmiths &c.

The following were the conditions of the farm—

1 Brahmin priests and Government servants who followed no other calling, should be exempted from taxation.

1 Fine upto Rs. 25 should be received by the farmer, and over that amount by Government.

[ ३४१ ] करारनामा पेठ आदितवार व पेठ बुधवार कसबे पुणें येथील बेलदार व कुंभार व दगडवाले व उक्तेकरी गवंडी व चुनेवाले व विटवाले व लोणारी व लोहार वगैरे कारखानदार लोक दर खुमास, दर चुलीस, रुपये ३ तीन रुपयेप्रमाणें पट्टी करार केली असे. घराची टीप पेठेचा कारकून व राजश्री जिवाजी गणेश याजकडील कारकून मिळोन घ्यावी. त्याचा वसूल राजश्री जिवाजीपंत यांणीं सरकारांत पावता करावा. याखेरीज नथु गाडीवान याजकडील पंचोत्रीचा तगादा बेलदार वगैरे लोक यांस करूं नये. येणेंप्रमाणें साल दरसाल करार केले असे. सुरू सन सीत आर्बैन मया व अलफ. येणेंप्रमाणें करारनामा लिहोन दिल्हा असे. ताहा नारो आपाजी दिम्मत शिवराम कृष्ण खासगी.

इ. स. १७४६–४७
सबा आर्बैन मया व अलफ. साबान २

[ ३४२ ] हरशेट व सोमशेट वीरकर यांणीं हुजूर येऊन विनंती केली कीं, आपण पुरातन साहेबांच्या सरकारांत लष्करचे शेटेपणाची सेवाचाकरी एकनिष्ठपणें केली आहे व पुढेंही करावयास उमेदवार आहों. त्यास राजश्री स्वामींची शेरी कसबेमजकुरीं होती. त्यापैकीं पडीत जमीन होती. तेथील वसाहत करावयास कैलासवासी राव यांणीं आज्ञा केली. त्याप्रमाणें कष्ट मेहनत करून वाणी बकाल वगैरे उदमी वेवसाई मेळवून वसाहात करून शुक्रवारपेठ नांव ठेवलें आहे. तेथील शेटेपण नूतन वतन करार करून दिल्हें पाहिजे ह्मणून. त्याजवरून मनास आणून तुह्मीं बहुत दिवस सरकारांत लष्कराचे शेटेपणाची सेवाचाकरी एकनिष्ठपणें केली आहे, व पुढेंही करावयासी उमेदवार आहां, व पेठेची कस्त मेहनत करून वसाहात केली आहे. हें जाणोन तुह्मांवर कृपाळू होऊन तुह्मांस पेठमजकूरचें शेटेपण नूतन वतन करार करून दिल्हें असे. शेटेपणाचे हक्क बीतपसील:—

इ. स. १७४८–४९
तिसा आर्बैन मया व अलफ. मोहरम १२.

---

341. It was ordered that the levies from the stone-cutters, potters, masons chunam-makers, brick-layers, blacksmiths &c., in the suburbs of Budhawar and Aditwar of Poona should be limitted to Rs. 3 for each cooking place (for each house), and that no additional tax such as the Panchotra, due to Nathuram chowdari from stone-cutters &c., should be leveid from them. The work of enumerating the houses as entrusted to Jiwaji Ganesh and to the Peth Karkun conjointly.

A. D. 1746-47.

342. Under the orders of the late Peshwa (Bajirao), Harshet and Somshet established a new suburb on a tract of waste land in a fielp belonging to the Satara Raja. The suburb was named Shukrawar, and the watan of Shettya was conferred on the two persons above referred to. The perquisites of the watan were as follows :—

A. D. 1748-49.

1 One betel-nut on every weekly market-day from each Baniya's shop.
1 Five leaves every day from each shop of the leaves-seller.
1 Nine Taks ($\frac{1}{8}$ of a seer) of oil every week from every oil-man's shop.
1 Half a sheer of gram for each bag of grain sold in the market.

वाणी याचे दर दुकानीं बाजाराचे दिवशीं आठरोजीं सुपारी १ एक येकूण कलम १

तेली याचे दर दुकानास तेल आठरोजीं वजन कच्चे ८८८९ नव टाक कलम १

पेठेंत किराण्याची अमदरफ्त होईल त्यास दर गोणीस किराणा वजन पक्कें पावशेर ८८। कलम १

कोष्टी व साळी पेठेंत जे राहतील व माग चालवितील त्यांनीं सारे मिळून सालीना पासोडी १ द्यावी कलम १

पेठेंत सण दसरा व दिवाळी व शिमगा व वर्षप्रतिपदा दर सणीं दर दुकानीं गहूं, तांदूळ वजन पक्कें ८८। पावशेर कलम १

तुमचे आधोली बाजारांत जो नेईल आणि माप होईल तेव्हां त्याजपासून दर गोणीस मुठभर दाणे द्यावे. कलम १

तांबोळ्याचे दर दुकानीं दररोज पानें सुमार ५पांच एकूण कलम १

बाजारांत अमदरफ्ती होईल त्यास दर दुकानीं दर गोणीस गल्ला कैली८८८= अर्धा शेरप्रमाणें कलम १

पेठेंत माल येईल त्यास दर दुकानास मुठभर शेत्र द्यावी. कलम १

पेठमजकुरीं चांभारवस्तीस राहतील त्यास सारे चांभार मिळोन पायपोस जोड २दोन कलम १

पेठेंत लग्नें होतील त्यास दर लग्नीं खोबऱ्याची वाटी एक द्यावी.कलम १

खाटीक व खारखंडे वगैरे बाजारांत येतील त्यांजपासून शेवादाखल मास व बोंबील वगैरे द्यावें. कलम १

तुमचीं उभयतां शेट्यांचीं घरें पाळावीं कलम १

एकूण तेरा कलमें सदरहूप्रमाणें करार केलीं असे. तर तुह्मी व तुमचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनभऊन शेटेपणाची सेवाचाकरी करून सुखरूप राहणें. वतनसंबंधें तुमचे माथां शेरणी करार रुपये १००१ एक हजार एक रुपया करार केला असे. वसूल देऊन सुखरूप अनुभव करणें ह्मणोन वतनपत्र १. सदरहू रुपयास मुदत फाल्गुनअखेर केली असे.

---

1 Quarter of a seer of groceries for every bag of groceries sold in the suburb.

1. A handful of vegetables from every vegetable selling shop in the suburb.

1 One *Pasodi* (a kind of rough cloth) a year from all weavers in the suburb.

1. Two pairs of shoes from all the shoe-makers in the suburb.

1 A quarter of a seer of wheat and rice from every shop on the following festivals :—Dasara, Diwali, Shimga, and Warsh Pratipada.

1 A piece of cocoanut at every marriage celebrated in the suburb.

1 A handful of grain for every bag of corn measured by the measure of the Shetyas.

1. Flesh and dried fish to be taken when offered for sale in the market by butchers and fish sellers.

1. The houses of the Shetyas to be exempted from house tax.

A present of Rs. 100, was taken in consideration of the grant of the Watan.

इ. स. १७४८–४९
तिसा आर्बैन
मया व अलफ
जमादिलावल ४

[ ३४३ ] खर्च पोतापैकीं धर्मादाय मुक्काम पर्वती येथें श्रीदेवाच्या स्थापना केल्या देव. १ श्रीदेवेश्वर बाण १ रुप्याचे महादेवाची मूर्त व सुवर्णाच्या मूर्ती मांडीवर १ उजवे मांडीवर गणपती १ डावे मांडीवर पार्वती.

२

१ श्रीपाषाणाचा गणपती. १ श्रीपर्वताई भवानीची अर्चा केली.

४

सदरप्रमाणें देवस्थापना करण्यास छ २९ जमादिलाखरपासून छ ३ जमादिलावल पर्यंत खर्च ५२२२॥ रुपये व छ ४ जमादिलावल रोजीं खर्च ३७९७॥ जाला असल्याचा दाखला सदर तारखेस आहे.

इ. स. १७५०–५१.
इहिदे खमसेन
मया व अलफ.
सफर १९.

[ ३४४ ] गंगाराम व दयाराम वल्लद मोहनदास खेत्री यांस कौल लिहून दिल्हा कीं, तुवां हुजूर येऊन विनंती केली कीं, कसबे पुर्णे येथें गुरुवार पेठ भरावयाची आज्ञा जाली तर वाणी, बकाल वगैरे उदमी वेवसाई आणून वसाहत करीन. साहेबीं कृपाळू होऊन पेठमजकूरचें शेटेपण आपल्यास वतनी करून दिल्हें पाहिजे ह्मणोन. त्यावरून पेठमजकूरच्या आबादानीवर नजर देऊन शेटेपण वतनी तुह्मांस करून दिल्हें असे. तरी वाणी, बकाल वगैरे उदमी वेवसाई आणून पेठमजकूरची आबादानी करणें आणि शेटेपणाचा हक्कदक व कामकाजवर पेठाचे शिरस्ते-

---

A. D. 1751-52. (343) The following idols were placed at Parvati on this date:—

1 Deweshwar Ban.
1 Mahadeo (silver) with two golden images one of Ganpati, on its right lap and the other of Parvati on its left lap.
1 Ganpati ( stone).
1 Parvati Bhawani ( this image was already there ).

The expenditure on this account was Rs. 5222 As. 8 and Rs. 3797-8.

A. D. 1750-51. 344. A Kowl issued to Gangaram and Dayáram valad Mohandas Khetri to the following effect:—

You came to the Huzur and represented that if you were permitted to establish a mart in Guruwar Peth of Poona, you would induce traders and shop-keepers and persons following other occupations to reside there and prayed that the Watan of Shettya of the Peth might be given to you. In view of the prosperity of the Peth, the Watan of Shettya is conferred on you. You should populate the Peth with traders, shop-keepers and others, and you and your descendants should perform the duties of the office of Shettya and enjoy its rights without obstruction. The fee to be levied from you in consideration of the grant of the Watan is fixed at Rs. 1001, you should pay the amount to Government, and take a receipt for the same.

प्रमाणें तुह्मीं व तुमची पिढी दरपिढी अनभऊन सुखरूप राहणें. वतनसंबंधें तुमचे माथां शेरणी रुपये १००१ एक हजार एक करार केला असे. सरकारांत पावते करून पावलीयाचा जाब घेणें. येणेंप्रमाणें मजुरा असेत ह्मणोन कौल दिल्हा असे.

१ येविशीं जमीदार प्रांत पुणें यांस ताकीद पत्र.

[३४५] रामचंद्र व शामा हलवाई रोजेकर पेठ आदितवार कसबे पुणें यांसः—लक्ष्मण सोनार याची जागा बेवारस आदितवार पेठेंत होती, ती सरकारांतून हरदु-

इ. स. १७५१।५२ **इसने खमसेन मया व अलफ जिल्काद २७.**

जणांस विकत दिल्ही. किंमत रुपये २५० अडीचशें. लांब हात ६० व रुंद हात १०॥ साडेदाहा याप्रमाणें करार करून दिल्ही असे. सदरहूचे रुपये सरकारांत खासगीकडे जमा असेत. जागा अनभऊन सुखरूप राहणें ह्मणोन मशारनिल्हेचे नांवें पत्र १.

[३४६] खर्चाचे पोटीं हुजूर स्वारींत हवेली या सदरांत इमारती

इ. स. १७५२–५३. **सलास खमसेन मया व अलफ.**

हाय याचे पोटांत.

तळे पर्वती

बेरीज रुपये नक्त

१३३५२॥। खनिजकाम गुजारत बेलदार गुजारत मजुरदार
११७५४।= १५९८।=

१६५ मजूरी माणसें
३७ खेरीज छपरें ९ दर ३ प्रमाणें
१॥ खणीतास मुहूर्त केला ते समयीं बकरें १
१०॥= खरिदी पाटया गुजारत बुरूड
४॥ किरकोळ

१३५७१।=

ऐन जिन्नस

१८२॥।१। गल्ला कैली बाजरी कणीक पीठ मापें वजनी वजन पक्कें

---

A. D. 1751-52. 345. A piece of ground 60 Hâts by 10/2 Hâts in Aditwar Peth of Poona was sold for Rs. 250.

A. D. 1752-53. 346. The details of expenditure on Parvati tank are given as under :

| | Rs. |
|---|---|
| *In cash—* | |
| Digging ( stone workers and labourers ) ... ... ... | 13352-12 |
| Labourers ... ... ... ... ... ... ... | 165 |
| Huts ... ... ... ... ... ... ... | 37 |
| Goat purchased at the time of commencing the work ... | 1—8 |
| Baskets ... ... ... ... ... ... ... | 10-10 |
| Miscellaneous ... ... ... ... ... ... | 4—8 |
| | 13571-6 |

८।१॥ १८१।॥१॥ ८॥१

| आंबाडी | कात | ताग | गूळ | डिंक | तेल |
|---|---|---|---|---|---|
| ८८२ | ८८॥ | ८॥८॥ | ८॥। | ८८३॥ | ८८१८९ |

[ ३४७ ] विनायकभट व गोपाळभट व रंगभट व दिनकरभट बिन गदाधरभट उपनांव ढेकणे गोत्र अत्री सूत्र अश्वलायन वास्तव्य कसबे पुणें यांचा वाडा कसबेमजकुरीं सुदामत सरकारच्या थोरल्या वाड्याचे उत्तरेच्या दरवाज्यापुढें होता. तेथें त्यांणीं घर बांधोन व परसांत आड खणोन बांधिला होता. ऐशीयास सरकारच्या दरवाज्यापुढें यांच्या घरामुळें अडचण जाहाली. याजकरितां याची सुदामत जागा देखील घर बांधिलें व धोंडे व माती व आड बांधिला होता तो सरकारांत घेऊन त्याचे मुबदला यास जागा जुना कोटाचे खंदकाचे दक्षणेस बेवारसी होती. तेथें व्यंकाजी अच्युत जाखरे वगैरे सुखवस्तीस राहत होते. त्यास त्यांणीं त्या जागीं त्यांत आड खणून दोन हात तोंड बांधिलें होतें. ते गेलीयावर राजश्री रामाजी मल्हार यांणीं दुकानें बांधून सोनार व हलवाई वगैरे दोन चार दुकानदार रहगुदरी ठेऊन त्यांजपासून भाडें घेत होते. त्यास ते जागा बेवारसी जाणून त्या जागीयांत घरें बांधलीं होतीं त्याची किंमत हुजरून राजश्री जिवाजी गणेश यांस पाठवून घराची किंमत रुपये ८०० आठशें करार करून वेदमूर्तीपासून सरकारांत वसूल घेतला आणि जागा यांस दिली. बीतपसील धोंडे मातीसुद्धां चतुःसीमा हदमहमुद.

इ. स. १७५४–५५.
खमस खमसेन मया व अलफ मोहरम २१.

लांबी पूर्वपश्चम देखील भिंती हात सुमार ७१ — रुंदी उत्तर दक्षण भिंतीसुद्धां हात सुमार २५

---

*In kind*—

| Grain | Khandi | Maunds | Payli | |
|---|---|---|---|---|
| Bajri | 1 | $1\frac{3}{4}$ | $1\frac{3}{4}$ | by measure. |
| Wheat flour | 0 | $6\frac{1}{2}$ | 0 | |
| Other flour | 0 | 0 | 0 | |

347. The house built by Vinayak Bhat Bin Gadadhar Bhat Dhekne of Gotra Atri Sutra Ashwalayan and his brothers at Poona in front of the Northern gate of the Government palace, being inconveniently near the palace, was taken by Government and an ownerless site to the south of the moat surrounding the fort, which was built upon and rented to a goldsmith and a confection and other traders by Ramji Malhar was given in exchange for it. The buildings over the ownerless site were valued at Rs. 800, and the amount was recovered from Dhekne. The site measured 71 hats from east to west, and 25 hats from north to south, and was bounded as under:—

A. D. 1754-55.

EAST.—A lane of 4 hats, and beyond that the house of Trimbak Sadashiva Patwardhan Dixit.

WEST.—A road to the river running from North to South, beyond that the shop of Mahashewa Naik Shetwadekar and the house of Ganoba Shenvi.

SOUTH.—A high road running from East to West, and beyond that the house of Narsinhbhat Trimbak bhat Dhekne.

NORTH.—The house of Parasharam Bhat Dandekar.

येणेंप्रमाणें लांबी एकाहात्तर हात व रुंदी पंचवीस हात यांस दिली असे. सदरहू जागीं यांस शेजार येणेंप्रमाणें बीतपसील.

पूर्वेस गल्ली चार हात. गल्लीपलीकडे राजश्री त्रिंबक सदाशिव पटवर्धन दीक्षित यांचा वाडा असे. कलम १

दक्षणेस रस्ता थोरला आहे तो पूर्वेस व पश्चमेस गेला असे. रस्त्याचे दक्षणेस राजश्री नरसिंहभट बिन त्रिंबकभट ढेकणे यांचा वाडा असे. कलम १

पश्चमेस नदीस जाण्याचा रस्ता दक्षण उत्तर असे. रस्त्यापलीकडे पश्चमेस महादेव नाईक सेतवाडेकर यांचें दुकान असे. व गणबा शेणवी याचा वाडा असे. कलम १

उत्तरेस परशरामभट दांडेकर यांचें घर असे. कलम १

येणेंप्रमाणें चतु:सीमापूर्वक जागा यांस नेमून दिल्हा असे व वेदमूर्तींचे जागींयास शेजाराचीं कलमें चार करार असे. तरी तुह्मीं सदरहु जागीयाचा चकनामा चतु:सीमापूर्वक वेदमूर्तींस करून देऊन यांस यांचे पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें घराची जागा चालवीत जाणें. प्रतिवर्षी नूतन पत्राचा अक्षेप न करणें. या पत्राची प्रती लिहून घेणें. अस्सलपत्र वेदमूर्तीजवळ भोगवटीयास परतोन देणें. ह्मणून शेटे व महाजन कसबे पुणें प्रांतमजकूर यांस आज्ञापत्र १

सदरहूप्रमाणें भटजीच्या नांवें मुख्य पत्र १

इ. स. १७५४–५५
**खमस खमसेन मया व अलफ.**
**सवाल १०.**

[ ३४८ ] चिरंजीव राजश्री निळकंठ महादेव प्रांत पुणें खर्च एकबेर्जीत हवेली यांत महाल इमारत.

बेरीज

तळें कात्रज

१६४७७ नक्त

२०९। कारकून
११३५३ खरेदी चुना.
७७३ खरेदी कोळसे.
८०० भाडें.
२१६ खणीत कामाबद्दल.

---

A. D. 1754-55. 348. The details of expenditure on Katraj Tank are given as under:—Rs. 16477 in cash.

| | | | |
|---|---|---|---|
| 209-4 | Karkun | 11353 | Chunam |
| 773 | Coal | 800 | Hire |
| 216 | Digging charges | 1960 | Labourers |
| 1040-8 | Stone-cutters | 57 | Blacksmiths |
| 68-4 | Miscellaneous | | |

Grain &c.

| | | | | Maund | Sheer |
|---|---|---|---|---|---|
| Grin by measure | ... | ... | ... | $4\frac{3}{4}$ | $4\frac{1}{2}$ |
| Articles by weight | ... | ... | ... | | |

१९६० मजूरी माणसें
१०४०॥ पाथरवट.
९७ घिसाडी.
६८। किरकोळ.

१६४७७

ऐन जिन्नस.

८१ गल्ला कैली ( पोटीं जिनसाचा तपसील आहे. )
८४॥४॥९॥ वजन पक्के ( पोटीं सामानाचा तपसील आहे. )
६२९॥ सुमारी सुमार बट ४७०॥ ठोकर १० कागददस्ते १ टाक्या १४८

इ. स. १७५५-५६ सीत खमसेन मया व अलफ.

[ ३४९ ] राजश्री पंतप्रधान व चिरंजीव राजश्री निळकंठ महादेव प्रांत पुणें खर्च एकबेर्जीत हवेल इमारतीहाय याचे पोटांत कारखाना तळें मौजे कात्रज.

६९१०३।- ऐननक्त ऐननक्त काापड तिवटें किंमत
६५०४९॥= ६५३।≡
ऐनजिनसी
७॥०।०।≡ गल्ला कैली खंडी ( पोटीं तपसील आहे )
१०८१॥९।११। वजनी वजन पक्कें ( सामानाचा तपसील आहे )
१९७४॥। सुमारी सुमार टाक्या बट खादी तांबे चरसे टाकरें कागददस्तें
१८९८ ४।. ॥. ३ ७ ८ ९४

इ. स. १७५५-५६ सीत खमसेन मया व अलफ. जिल्हेज १०

[ ३५० ] हरशेट वीरकर शेट्ये पेठ शुक्रवार कसबे पुणें याचा बाग शुक्रवार पेठेंत होता. तो सरकारांत घेऊन खास बारदारास अलंगा बांधोन दिल्या. त्याचे मुबदला बाग करावयास प्रांत पुणेंपैकीं जमीन बिघे ८१० दहा दिली असे. पुण्यापासून पांच कोसाआलीकडे जमीन नेमून देणें ह्मणोन चिरंजीव राजश्री निळकंठ महादेव यांस सनद १ रसानगी यादी.

---

A. D. 1755-56. 349. The details of expenditure on Katraj Tank are given as under:—

Rs. 65049-14 In cash.
Rs. 653-7 Turbans.

| Khandis | Maunds | Sheers | |
|---|---|---|---|
| $7\frac{1}{2}$ | $\frac{1}{4}$ | 13/4 | Grain by measure |
| 10 | $1\frac{1}{2}$ | $5\frac{1}{4}$ | Articles by weight. |

A. D. 1755-56. 350. A garden in Shukrawar Peth belonging to Hurshet Wirkar was taken by Government for building residences for certain Government servants ( खासबारदार Khasbardar.)

# पेशव्यांचे मुक्काम.

## बाजीराव बल्लाळ पेशवे.

### १७१९-२० ते १७३९-४०

**अशरीन मया व अल्लफ. १७१९-२०**

| महिना | ता. | मुक्कामाचा गांव. |
|---|---|---|
| साबान | १-५ | मौजे तिसगांव, नजीक औरंगाबाद. |
| | ६ | टेंभापुरी. |
| | ७-८ | प्रवरासंगम, गंगातीर. |
| | ९ | माळी चिंचोरे. |
| | १० | सोनई बाह्मणी. |
| | ११ | निंबळक पिंपळद, तर्फ नगर. |
| | १२ | सोनई, परगणे नेवासे. |
| | १३ | सारोळें. |
| | १४ | येलथानें. |
| | १५ | पारगांव. |
| | १६ | माळशिरस, प्रांतसुपें. |
| | १७ | जेजुरी. |
| | १८-२० | सासवड. |
| | २१-२३ | सिरवळ. |
| | २४ | आहिरें. |
| | २५ | आहिरेंहून तडवलें. |
| | २६ | गोडवली. |
| | २७-२८ | किल्लेसातारा. |
| | २९ | सातारा, दर्शन महाराज श्रीछत्रपतीचें छ मजकुरी जाहलें असे. |
| रमजान | १-३० | किल्ले सातारा. |
| सवाल | १-११ | किल्ले सातारा. |
| | १२ | माहुली भाद्रपद शुद्ध पौर्णिमा ग्रहण |
| | १३-२९ | किल्ले सातारा. |
| जिल्काद | १-२५ | किल्ले सातारा. |
| | २६ २७ | माहुली, कृष्णातीर. |
| | २८ | किल्ले सातारा. |

**अशरीन मया व अल्लफ. १७१९-२०**

| महिना | ता. | मुक्कामाचा गांव. |
|---|---|---|
| | २९ | माहुली, कृष्णातीर, |
| जिल्हेज | १-२३ | माहुली, कृष्णातीर. |
| | २४-२९ | माची, किल्ले सातारा. |
| मोहरम | १-२२ | किल्ले सातारा. |
| | २३ | माहुली संगम, कृष्णातीर, सातान्याहून आले. |
| | २७ | कऱ्हाड नजीक गांव. |
| सफर | २ | बत्तीशशिराळें |
| | १० | राजापूर, कृष्णातीर. |
| | १३ | कृष्णा दक्षिणतीर, शिवार-राजापूर. |
| | १४ | आकिवाट येथून मौजे मांजरी |
| | २० | सत्ती, कृष्णा उत्तरतीर. |
| | २७-२८ | सेगुणसी. |
| | ३० | अंकली. |
| रबिलावल | १ | घोसरवाडी-वेदव्रती. |
| | ६-१४ | कोल्हापुर. |
| | १८-२४ | करवीर. |
| | २५-२८ | कोल्हापुर. |
| | २९ | कोडोली पारगांव. |
| रबिलाखर | २ | वारणातीर. |
| | ३ | वरूणबहे, कृष्णातीर. |
| | ४-५ | उरण. तारिख ४ रोजीं पंतप्रधान स्वामींचे दर्शनास गेले. |
| | ६-१० | बहे, कृष्णा उत्तरतीर. |
| | १२ | कंळबें, प्रांत कोल्हापुर. |
| | १३ | मंडलगे. |
| | १५ | भडगांव. |

## अशरीन मया व अल्लफ. १७१९–२०

महिना ता. मुक्कामाचा गांव.

१७ हमबाचा वाडा.
१८ सारवाडी.
२४ वसगडे, नजीक पंचगंगातीर.
२७ वसगडें.
जमादिलाव १-३ मसूर.
४–६ माहुली.
७ दहीगांव.
८ खेड, प्रांत पुणें.
९–१९ सासवड.
जमादिलाखर. ९ समडोली, प्रांत मिरज.
१३–२९ मसूर.
रज्जब १–९ मसुर.
१० कठापूर.
११ देहूर, प्रांत वाई.
१२ जेऊर, नजीक पिंपरी नीरा.
१३-१४ कोथळे, प्रांत सुपें-निरा.
१६–१९ सासवड.
२४ थेऊर.

## इहिदे अशरीन मया व अल्लफ १७२०–२१

रज्जब २९ अस्तगाव, प्रांत कडेवळीत.
३० अष्टी.
साबान ४ चांदें परगणें नेवासें.
१० कसबे वाळूंज येथून कूच करून औरंगाबादे नजीक हरसुळावर मुक्काम.
११ हरसुळ.
२१-२८ वतालतळे.
रमजान १९ पोहुर, नजीक किलीजखान.
२४–२८ ते पाचपीर, नजीक किलीजखान
सवाल १–२ पाचपीर, नजीक किलीजखान.
३ मुकाम नजीक बाळापूर.

## इहिदे असरीन मया व अल्लफ १७२०–२१

महिना ता. मुक्कामाचा गांव.

४ पाचपीर, नजीक किलीजखान, कोस तीन.
५ पिंपरी, परगणें बाळापुर प्रांत वऱ्हाड.
६ निंबगांव, प्रांत वऱ्हाड.
७ नजीक पिंपरीबोरे.
८–९ फरबपूर नजीक पिंपरी.
११ पिंपळगांव, प्रांत खानदेश.
१३ गोंदेगांव, परगणें भडगांव, खानदेश.
१४ चाळीसगांव, प्रांत खानदेश.
१५ पिंपरखेड, परगणें राजदेहर, प्रांत खानदेश.
१६ हीसाल बेडकी, परगणें पाटोदे.
१७ गंगाउत्तरतीर.
१८ खामगांव, परगणें चांदवड, गंगा-उत्तर व दक्षणतीर.
१९ नजीक सिन्नर.
२० सिन्नर.
२१ प्रवरातीर उत्तर घाटमाथा.
२५–३० तळेगांव.
जिल्काद १-४ तळेगांव.
५ तळेगांवांहून कुच करून हिंगणगांवीं आले.
६ लोणी.
७ सासवड.
८–१७ सासवड.
१८–२९ सुपें.
जिल्हेज ११ सुपें.
१९ ठाणे बारामती, वेढ्यासी.
मोहरम २-३० ठाणे बारामती.
सफर २ बारामती.
५–७ कांबळेश्वर.
८ कांबळेश्वर.

## इहिदे अशरीन मया व अल्लफ १७२०-२१

| महिना | ता. | मुक्कामाचा गांव. |
|---|---|---|
| | ११ | सातारा. |
| | १९-२९ | माची, किल्ले सातारा. |
| | २७ | जेजुरी. |
| रबिलावल | ११ | प्रवरासंगम, उत्तरतीर. |
| रबिलाखर | २ | औरंगाबाद, दिल्ली दरवाजा. |
| | ३-६ | औरंगाबाद, दिल्ली दरवाजा. |
| | ७ | टाकळी, प्रांत वाळुंज. |
| | ८ | माडकी बडकी, प्रांत वेरूळ. |
| | ९ | जळगांव, प्रांत खानदेश. |
| | १० | बारापाडे याचे शिवारा अलीकडे, मौजे पेडखल. |
| | ११ | जळगांव, परगणें पाटोदे. |
| | १२ | पिपवाडी, परगणें देहर, प्रांत [खानदेश. |
| | १३ | खडकी, परगणें देहर. |
| | २० | रणई परगणें डांगरी. |
| | २२ | माड, परगणें डांगरी, प्रांत खान[देश. |
| जमादि-१- | १६ | टाकरे प्रांत सुरत. |
| लावल | १९ | अमरशाडी, प्रांत मांडली. |
| जमादि-१- | १४ | टिकरवा, परगणें बशराई, प्रांत |
| लाखर | | सुरत. |
| | १४-२० | निंबोरें, परगणें बसराई. |
| | २६ | धोंवा राजपिंपलें. |
| | २७ | कुकडदरा, प्रांत राजपिंपलें. |
| | २८-२९ | चिपली, प्रांत राजपिंपलें. |
| रज्जब | २९ | अस्तगांव, प्रांत कडेवलीत. |
| | ३० | अष्टी. |

## इसन्ने अशरीन मया व अल्लफ १७२१-२२

| महिना | ता. | मुक्कामाचा गांव. |
|---|---|---|
| साबान. | १ | भोगांव, गंगातीर, प्रांत बीड. |
| | ३-४ | भोगांव, गंगातीर प्रांत बीड. |
| | ९-१० | रुई, परगणे अंबाड. |
| | ११ | गोदी प्रांत बीड. |
| | १२ | चिंचोली परगणे बीड. |

## इसन्ने अशरीन मया व अल्लफ १७२१-२२

| महिना | ता. | मुक्काकाचा गांव. |
|---|---|---|
| | १३ | उकर्डे, प्रांत बीड. |
| | १४ | राजूरी, पाटोदेचकला, प्रांत बीड |
| | १५ | बीड सागवी, प्रांत बीड. |
| | १६ | वाकी, तर्फ कडे, प्रांत कडेवलीत |
| | १७ | चांदें, तर्फ चांभारगोंदें, प्रांत कडेवलीत. |
| | १८ | अजनुज, तर्फ पेडगांव, प्रांत कडेवलीत. |
| रमजान. | ६ | करंजे, नजीक किल्ले सातारा. |
| | ९-११ | किल्ले सातारा. |
| | २१ | माची किल्ले सातारा. |
| | २७-२९ | माची किल्ले सातारा. |
| सवाल | ५-७ | माची किल्ले सातारा |
| | १६।१७ | माची, किल्ले सातारा. |
| | २८-३० | माची, किल्ले सातारा. |
| जिलकाद | १-११ | माची, किल्ले सातारा. |
| | १२-१३ | शिवापुर, नजीक किल्ले सातारा. |
| | १४ | शाहुनगर, नजीक किल्ले सातारा. |
| | १८-२० | शाहुनगर, नजीक किल्ले सातारा. |
| | २३-२८ | शाहुनगर, नजीक किल्ले सातारा. |
| जिल्हेज | १-५ | शाहुनगर |
| | ६-८ | शाहुनगर, नजीक किल्ले सातारा. |
| | ९।१० | शाहुनगर. |
| | ११ | शाहुनगर, नजीक किल्ले सातारा. |
| | १२ | शाहुनगर. |
| | १३।१४ | शाहुनगर, नजीक किल्ले सातारा. |
| | १५-२१ | शाहुनगर. |
| | २२-३० | शाहुनगर, नजीक किल्ले सातारा. |
| मोहरम | १ | शाहुनगर, नजीक सातारा. |
| | २ | निंब, संमत मजकूर. |
| | ३-४ | भोईंज, प्रांत वांई. |
| | ५-९ | शाहुनगर, नजीक किल्ले सातारा. |

### इसन्ने अशरीन मया व अल्लफ १७२१-२२

| महिना | ता. | मुक्कामाचा गांव. |
|---|---|---|
| | १० | शाहुनगर. |
| | ११-१३ | सातारा. |
| | १५-१६ | वाई. |
| | १७-१९ | शाहुनगर नजीक किल्ले सातारा. |
| | २० | दहींगांव. |
| | २१ | पिंपरी, नीरेच्या तीरीं. |
| | २२-२४ | कोथळे, नजीक जेजुरी. |
| | २५-२७ | कोथळें, प्रांत सुपें. |
| सफर | १-२ | कोथळे, प्रांत सुपें. |
| | ३-४ | कोथळें नजीक जेजुरी. |
| | ५ | थेऊर कोलवडी, मुलथडी. |
| | ६-७ | लोहगांव, तळ्यावर झाला. |
| | ८-१० | चिंचवड. |
| | ११ | वडगांव. |
| | १२-१९ | साते, सन्निध वडगाव. |
| | २०-२२ | साते, तर्फ नाणे मावळ. |
| | २३ | साते, नजीक लोहगड. |
| | २४-२९ | साते, तर्फ नाणे मावळ. |
| रबिलावल | ४ | वलव्हण, नजीक लोहगड. |
| | ८-११ | कुलाबा, नजीक समुद्रतीर. |
| रबिलाखर | १ | नेवली, तर्फ खंडाळे, नजीक कुलाबा. |
| | ११ | नेवली, संनिध कुलाबा. |
| | १३ | सन्निध कसबे नागोठणे. |
| | १४ | घाटाखालीं, कोकणाहून येतात. |
| | १४ | भोरकस, तर्फ पौडखोरें. |
| | १६ | लवळे, प्रांत पुणें. |
| | २३ | वाळुंज, तर्फ करपठार. |
| | २५ | कोथळे, सन्निध जेजुरी. |
| | २८-२९ | कोथळे, सन्निध जेजुरी. |
| जमादिलाव | १८ | शाहुनगर, सन्निध सातारा. |
| रजब | १ | पिंपळखेड, तर्फ अष्टी. |

### इसन्ने अशरीन मया व अल्लफ १७२१-२२

| महिना | ता. | मुक्कामाचा गांव. |
|---|---|---|
| | २ | बेलगाव, प्रांत कडेवलीत. |
| | ३ | पिंपळगाव, प्रांत बीड. |
| | ८ | आकोलें, परगणें शेवगांव. |
| | ९-१२ | आकोलें, परगणें शेवगांव, |
| | १३-१५ | कोरडगाव. |
| | १७ | कोरडगांव. |
| | १८-१९ | बोरगाव. |
| | २१-२२ | गोवलवाडे, तालुके माहुर प्रांत बीड. |
| | २३ | सिरापुर, तालुके माहुर, प्रांत बीड. |
| | २४ | पारगांव, प्रांत बीड. |
| | २७-२८ | पारगांव, प्रांत बीड. |

### सलास अशरीन मया व अल्लफ १७२२-२३

| महिना | ता. | मुक्कामाचा गांव. |
|---|---|---|
| साबान | १९ | कुरकुंभ, तर्फ पाटस. |
| | २०-३० | कसबे सुपे. |
| रमजान | १-२९ | सुपे. |
| सवाल | १-३ | सुपे. |
| | ४ | निंबुत. |
| | ५ | वाटार. |
| | ६-३० | शाहुनगर, किल्ले सातारा. |
| जिलकाद | १-३० | शाहुनगर, किल्ले सातारा. |
| जिल्हेज | १-२९ | शाहुनगर, किल्ले सातारा. |
| मोहरम | १-७ | शाहुनगर, किल्ले सातारा. |
| | ८-११ | करंजे, नजीक सातारा. |
| | १२-१३ | व्हिंग, प्रांत वाई. |
| | १४ | खंडाळें बावडें, परगणें शिरवळ. |
| | १५-२० | सासवड. |
| | २१ | सुपें, सायंकाळीं. |
| | २२-२९ | सुपें. |
| | ३० | खामगावटेक, तर्फ सांडस, |

